॥ ॐ श्रीसद्‌गुरुसमर्थ ॥

शारदाश्रममाला

# श्रीविष्णुदासांची कविता

## खंड १ ला



संपादक

नरहर सदाशिव जोशी उर्फ खरशीकरशास्त्री

द्वितीयावृत्ति



शके १८६१ ] किंमत २ रुपये [ सन १९३९

॥ ॐ श्रीसद्‌गुरुसमर्थ ॥

# संपादकाचें हृद्गत



श्रीमज्जगज्जननी, त्रिभुवनसुंदरी श्रीरेणुकामाउलीचें कृपेनें तिचे अत्यंत लाडके पुत्र श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीसद्‌गुरु पुरुशोत्तमानंदसरस्वति ऊर्फ श्रीविष्णुदासकविमहाराज यांच्या कवितेच्या पहिल्या खंडाच्या पुनर्मुद्रणाचा योग लाभला आहे याजबद्दल माझें हृदय प्रेमानें उचंबळून येत आहे.

## श्रीविष्णुदासांची वाङ्मय-प्रसिद्धि

शके १८१२ त श्रीविष्णुकविमहाराजांचे धाकटे बंधु श्रीगुरुदासमहाराज ऊर्फ अनंतराव मामा यांनीं सातारा येथें बालामृत प्रेसमध्यें हातानें लिहून शिळा-प्रेसवर 'श्रीविष्णुकविकृत पदें' या नांवाचें सुमारें ५० पदें, अष्टकें, आरत्यांचें लहानसें पुस्तक छापलें होतें. त्या पुस्तकास कृष्णाजी रावजी धांद्रफळे ऊर्फ श्रीविष्णुदासकवि यांनींच प्रस्तावना लिहिली आहे. त्यानंतर शके १८३९ त महाराजांचे समाधीनंतर 'श्रीपुरुषोत्तमानंदस्वामी—माहूर,' यांचें चरित्र हा लेख ता. १०।२।१९२८ चे इंदुप्रकाशांत मीं प्रसिद्ध केला. त्या लेखाधारें श्री. वामन नारायण देशपांडे या सरस्वतिपुत्रानें 'माहूरचे विष्णुकवि' हा लेख मुमुक्षूंत प्रसिद्ध केला. नंतर नांदेडच्या आख्यानरत्नमालेंत व मुमुक्षूंत महाराजांच्या अनेक आख्यानांपैकीं बभ्रुवाहनाख्यानास गद्याचा पोषाक घालून मीं प्रसिद्ध केलें. नंतर कवितेचा पहिला खंड शके १८४८ मध्यें श्री. देशपांडे व महाजन यांनीं प्रकाशित केला. शके १८५० मध्यें 'श्रीविष्णुकविमहाराजांचें चरित्र' हें पुस्तक मी मुमुक्षूंत प्रसिद्ध करून स्वतंत्र पुस्तकें छापविलीं; व शके १८५८ त कवितेचा दुसरा खंड माझेकडून प्रसिद्ध झाला; व आतां पहिल्या खंडाचें पुनर्मुद्रण करण्याचें भाग्य मला लाभलें आहे. श्रीसंतवाङ्मयभक्त श्री. पांगारकरमहाराज आपल्या मुमुक्षूंतून ही कविता वारंवार प्रसिद्ध करीत असत. याशिवाय बऱ्याच ठिकाणीं किरकोळ पदें, अष्टकें प्रसिद्ध केलीं आहेत.

कवितेचा १ ला खंड यवतमाळचे सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. यशवंत खुशाल देशपांडे, एम्. ए., एल्‌एल्. बी, वकील, व श्री. दत्तात्रय बापूजी महाजन, बी. ए., ( हल्लीं तहशीलदार ) या महोदयांनीं प्रसिद्ध केला. यवतमाळच्या शारदाश्रमाचे एकनिष्ठ उपासक श्री. देशपांडे हे आहेत; त्यांनीं शारदाश्रमातर्फे पहिला खंड

आश्रमाचें १ लें पुस्तक म्हणून प्रसिद्ध केलें व प्रस्तुत पुस्तक हें त्याचें पुनर्मुद्रण आहे. पहिल्या भागाचें एकसुद्धां पुस्तक शिल्लक राहिलें नाहीं इतकी लोकप्रियता त्या भागास लाभली व शारदाश्रमासही पुनर्मुद्रणाचा योग आलेला पाहून शारदाश्रमाचाही लौकिक वाढण्यास साह्य झालें आहे.

पहिल्या खंडांत कविता छापली ती लोकांचे मुखांत असलेली व कानांत गुणगुणणारी अशी वेंचक घेतली होती. त्यांत उपदेशपर भाग बराच आहे. दुसऱ्या खंडांतील कविताही अतीव मनोहर आहे. मातृवात्सल्य, कारुण्य, भक्तिप्रेम, स्वानुभवोद्गार यांमुळें दुसऱ्या खंडांतील कविताही भारदस्त असून प्रेमानें ओथंबलेली आहे. सर्वच कविता प्रासादिक असून संत, साधु, विद्वान् साहित्यिकांनीं कवितेचा अत्यंत आदर केला आहे.

पहिल्या आवृत्तीपेक्षां या आवृत्तींत अष्टपदी हें पद जास्त घातलें आहे व प्रथमावृत्तींत ' वंदे मातरम् ' हें पद दोन वेळ छापलें होतें तें एक कमी केलें आहे. शिवाय अकराव्या भागांत नं. १८६ ते १९१ सहा उत्कृष्ट लावण्या जास्त घातल्या आहेत. या लावण्या अत्यंत मनोहर आहेत. प्रथमावृत्तींतील पुरवणीविभाग काढून त्यांतील कविता त्या त्या भागांत घातली आहे. कवितेची विषयवार निवडही उत्तम झाली आहे हें सहज लक्षांत येईल.

प्रथमावृत्तीस सुप्रसिद्ध साहित्यिक कै. अच्युत सीताराम साठे, एम्. ए., एल्एल्. बी., ॲडिशनल जज्ज, नागपूर, यांनीं विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहिली आहे. त्या वेळीं ( मार्गशीर्ष शु. ८ शके १८४९ ) ता. २।१२।२७ रोजीं मी नागपूर येथें त्यांना कविता म्हणून दाखवीत असतां तेथें पुष्कळच सरस्वतिपुत्र जमले होते. ही कविता ऐकून सर्वांस फार आनंद झाला. ' नका खाउं हें जहर दादा पैसा सरकारी ' हा पोवाडा मीं म्हटला. त्यावर त्या मंडळींनीं हा पोवाडा छापण्याचा आग्रह केला, तेव्हां तो पुरवणीविभागामध्यें छापला. बाकीची उपदेशपर व भक्तिप्रेमपर कविता ऐकून बुलढाण्याचे सुप्रसिद्ध इतिहासभक्त श्री. यादवराव काळे, बी. ए., एल्एल्. बी. ( माजी अध्यक्ष, प्रांतिक असेंब्ली-मध्यप्रांत ) यांनीं ' ही कविता प्रत्येक घरीं जाऊन तुम्हीं गाऊन दाखवा व तिच्यांतील वर्म जनतेस दाखवून जनांत भगवत्प्रेम उत्पन्न करा.' अशी अत्यंत कळकळीची मला सूचना केली. ही त्यांची सूचना मीं मान्य केली.

## काव्याची प्रसिद्धि

कविता छापण्यापूर्वीपासूनच कवितेची प्रसिद्धि झाली होती. कवींचे ह्यातीं-

तच कवितेचा प्रसार मध्यप्रांत, वऱ्हाड, मोगलाईपासून गोमंतकापर्यंत झाला होताच. हरिदास, पुराणिक कवितेची उपासना करीत आहेतच. पण ही कविता गायक स्त्रियांनाही गाऊन दाखवून जनतेचें लक्ष कवितेकडे वेधलें आहे.

कीर्तन-प्रवचनांतून मी कवितेचा भरपूर उपयोग करीत आहेच. त्याशिवाय कवितेचें काव्यगायन पुष्कळ ठिकाणीं करीत असतों. या काव्यगायनांत श्रोतृवृंद तल्लीन होत असतो. मातेचें वात्सल्य व मुलाचें कारुण्य कवितेंत भरपूरपणें रसरसलेलें आहे, व त्या त्या ठिकाणीं श्रीमातृप्रेम प्रत्यक्ष दिसून श्रीमन्माता जगदंबेचें वात्सल्य सहज प्रतीतीस येतें.

## लावण्या

लावण्यांचें लावण्य अतीव सुंदर आहे. कांहीं लावण्यांत उच्च दर्जाचें भक्तिप्रेम विखुरलें आहे. सर्वच लावण्या अर्थी आहेत असें मी म्हणत नाहीं; पण मला ज्या वेळीं अत्यंत कारुण्य कीर्तन-प्रवचनांत प्रगटवावें लागतें तेव्हां लावण्यांचा फारच उपयोग होतो. या पुस्तकांतील लावण्यांसह ७५ लावण्यांचें स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध करणार आहे. लावण्यांवरही मीं काव्यगायनें केलीं आहेत. तीं लोकांस फार पसंत पडलीं आहेत. ही लावणी आहे असें सांगितलें म्हणजे श्रोते आश्चर्यचकित होतात.

## पुढील ग्रंथाची रूपरेषा

महाराजांची बरीच कविता अप्रकाशित आहे. अगोदर आख्यानें छापण्याची योजना होती; पण या खंडास जास्त मागणी असल्यामुळें हा खंड अगोदर छापण्यास घेतला. यानंतर लावण्या छापून नंतर आख्यानें छापण्याची योजना आहे. एकंदर अप्रकाशित कवितेचीं ५०० तरी पृष्ठें होतील. इतकें करून घेण्यास श्रीमन्माता समर्थ आहे. त्यानंतर महाराजांचे बंधु श्रीगुरुदासमहाराज यांची उत्कृष्ट कविता प्रकाशित करण्याचा विचार आहे. जराव्याधी इत्यादिपासून संरक्षून हें कार्य सिद्धीस नेणार श्रीसद्गुरु समर्थ आहेत.

## आभारप्रदर्शन

श्री. पुरुषोत्तम केशव पेंडसे मास्तर, यवतमाळ, यांनीं या पुस्तकास प्रकाशित करण्यासाठीं द्रव्यसाह्य केलें आहे. पेंडसे श्रीमंत नाहींत पण श्रीविष्णुकवींच्या काव्याबद्दल त्यांचा आदरभाव आहे त्याचेच फल या मदतीचे रूपानें दिसत आहे. ही गोडी त्यांना, दोन वर्षांपूर्वी श्रीरामेश्वरयात्रा आम्हीं स्पेशल ट्रेननें

केली त्या वेळीं माझे संगतीनें फार लागली. त्यांचे साह्याबद्दल त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

श्रीविष्णुदासांचे प्रेमी व माझे सन्मित्र सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. य. खु. देशपांडे, वकील, यांनीं शारदाश्रमातर्फे पुरस्कार लिहिला आहे; अत्यंत प्रेमादरानें कविता छापण्यास मला प्रोत्साहन दिलें याजबद्दल त्यांचा मी फार ऋणी आहे. या कवितेबद्दल त्यांचें प्रेम वर्णनातीत आहे. शारदाश्रमसंस्थेनें पुरस्कारलेलें हें पुस्तक आहे. शारदाश्रमाचा उत्कर्ष वाढविणार माझी श्रीमन्माता समर्थ आहे.

प्रुफें तपासण्याचें कार्य माझे मित्र श्री. नागेशराव महाजन, रहिमतपुरकर, यांनीं आपुलकीनें केलें असून त्यांचा मी फार आभारी आहें. श्रीविष्णुदास व श्रीगुरुदास-महाराज याच्या फोटोंचे ब्लॉक गोरखपूर येथील सुप्रसिद्ध कल्याण मासिकाच्या संपादकांनीं पाठविले आहेत याबद्दल त्याचे हार्दिक आभार मानतों.

श्री. पेंडसे यांचा ब्लॉक श्री. दादासाहेब देशपांडे यांचेकडून नागपूरहून आला आहे. बाकीचे ब्लॉक चि. गोविंद जोशी यानें तयार केले आहेत. त्याच्या ब्लॉकच्या धंद्यांत उत्कर्ष करणार श्रीसद्‌गुरु समर्थ आहेत.

श्रीक्षेत्र माहूर येथें श्रीविष्णुदासमहाराजाचा आश्रम आहे. नुकतेच मठास अधिष्ठित केलेले श्री. प. प. रामानंदसरस्वतिस्वामी हे अधिकारसंपन्न आहेत. त्यांच्यामुळें मठाचा उत्कर्ष होऊन जनतेचें लक्ष मठाकडे आकर्षिलें जाईल अशी कृपा करणार श्रीजगदंबा समर्थ आहे.

हनुमान प्रेसच्या मालकांनी छपाईचें काम चांगलें करून दिलें आहे. शुद्धि-संस्काराची यादी अगदीं लहान झाली ही गोष्ट प्रुफें तपासणारे श्री. महाजन यांस व प्रेसला भूषणावह आहे.

या खंडाचें पुनर्मुद्रण होण्याचा योग आल्यामुळें श्रीगुरुमहाराज यांच्या भांडारांतील भक्ति, ज्ञान, उपदेश, करुण, वात्सल्य इत्यादि प्रसादपर अमोल ठेवा प्रेमळांसाठीं उघडा करून ठेवितां आला आहे. त्याचें रसिकांनीं सेवन करून माझ्या सद्‌गुरुप्रीत्यर्थ झालेल्या सेवेनें ते तृप्तीचे ढेंकर देवोत, अशी प्रार्थना श्रीमन्माता जगदंबेच्या चरणीं करून ही सेवा समर्पित करतों.

श्रीदत्तजयन्ती, शके १८६१,
प्रमाथीनामसंवत्सरे

श्रीमन्मातृकृपांकित
**नरहर सदाशिव जोशी**
ऊर्फ **खरशीकरशास्त्री**

# शारदाश्रमातर्फे पुरस्कार



श्रीविष्णुदासांची कविता, भाग १ ला, या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचा शारदाश्रमातर्फे पुरस्कार करण्यास आनंद वाटतो. या ग्रन्थाच्या प्रथमावृत्तिप्रसंगीं संपादकीय कार्य आम्हीं आणि आमचे स्नेही श्री. द. बा. महाजन, बी. ए., यांनीं स्वीकारलें होतें. हा प्रासादिक, भक्तिरसपूर्ण ग्रन्थ लोकादरास पात्र होऊन त्याची दुसरी आवृत्ति काढावयाचा योग आला, ही समाधानाची गोष्ट आहे. द्वितीयावृत्तीच्या संपादनाचें कार्य श्रीविष्णुकवींचे भागिनेय आणि शिष्य श्री. नरहरशास्त्री खरशीकर यांनीं स्वीकारलें ही फार आनंदाची गोष्ट आहे. शास्त्रीबुवांचा कवींच्या काव्यसंग्रहाचा व्यासंग दांडगा असून, त्या कवितांचा ते प्रवचनांतून आणि कीर्तनांतून उपयोग करितात; कवींचा काव्यांतून पसरलेला उदात्त विषय समजावून सांगणारा अधिकारी पुरुष शास्त्रीबुवांपेक्षां अन्य कोणी सांपडणार नाहीं. तेव्हां हें संपादनाचें कार्य त्यांनीं हातीं घेतलें हें त्यांना भूषणावह आहे.

पहिल्या आवृत्तीपेक्षां या आवृत्तींत बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा केल्या असून, तो ग्रन्थ पहिल्या आवृत्तीपेक्षांही संग्रहणीय झाला आहे, हें श्रीविष्णुकवींच्या काव्याचा आस्वाद घेणाऱ्या रशिकांस दिसून येईल. प्रस्तुत कवितासंग्रहाकडे काव्य या दृष्टीनें पाहणाऱ्या मराठी भाषेच्या रसिकांसही या संग्रहाचें महत्त्व कळून येईल व त्यांस आढळून येईल कीं, श्रीविष्णुदासमहाराजांनीं कवितानिर्मिति करून, मराठी वाङ्मयामध्यें महत्त्वाची भर घालून, मराठी वाङ्मय समृद्ध केलें आहे. या सर्व दृष्टींचा विचार करूनच शारदाश्रम, यवतमाळ, या संस्थेनें प्रस्तुत कवितासंग्रहाची प्रथमावृत्ति प्रकाशित केली होती आणि या द्वितीयावृत्तीचा संस्थेतर्फे पुरस्कार लिहिण्याची आम्हांस आज्ञा केली आहे. आम्हांस उमेद आहे कीं, रसिक जनता प्रथमावृत्तीप्रमाणें या आवृत्तीचाही आदर करतील आणि

श्री. नरहरशास्त्री यांना महाराजांचा उर्वरित कवितासंग्रह प्रकाशित करावयास उत्तेजन देतील. हीहि गोष्ट नमूद करणें अवश्य आहे कीं, शास्त्रीबुवांनीं कवीच्या कवितासंग्रहाचा दुसरा भाग गेल्या वर्षी प्रकाशित करून कवीचा संपूर्ण कवितासंग्रह प्रकाशित करावयास ते बद्धपरिकर झाले आहेत.

यवतमाळ,
ता. १०।१२।३९

यशवंत खुशाल देशपांडे,
एम्. ए., एलएल्. बी., एम्. आर्. ए. एस्.
एक कार्यवाह, शारदाश्रम, यवतमाळ.

---

॥ श्रीमन्माता ॥



नको साधनधन कांहीं

काम स्तवनाचें नाहीं

तुला रेणुके बाई,

आई, बोलणें पुरें ॥

## प्रथमावृत्तीतील

# संपादकीय निवेदन



यवतमाळ येथील शारदाश्रमांत सहकार्य करणाऱ्या शारदोपासकांच्या परिश्रमांचें फल हें प्रस्तुत पुस्तक होय.

आम्हीं बालपणीं " चोहींकडुनि आलें आभाळ ग । लेंकरूं आपुलें संभाळ ग ", " कृष्णा माझा छंद सारा । अतां सोड सोड रे ", " यशोदा गौपिगौळ्याचि गोप सगळ्यांची सहनंदाची घडि मोडलि आनंदाची " इत्यादि अनेक गोड, प्रेमळ व वात्सल्यभाक्ति इत्यादि गुणांनीं युक्त पदें ऐकलीं होतीं. त्यानंतर आम्हीं शिक्षणक्रम संपवून वकिलीच्या धंद्यास सुरुवात केल्यावर मातापुरकर वे० गणपतराव मडके ह्यांच्या मुखांतून श्रीविष्णुदास कवींची अनेक विषयांवरील पदें आम्हांस ऐकावयास मिळालीं. त्या कवनांची सरसता पाहून आमचें लक्ष कवीकडे वेधलें. वे० गणपतराव ह्यांचा बराच काळ कवींच्या सान्निध्यांत गेल्यामुळें त्यांचेकडून कवींनें विविध विषयांवर व विशेषतः भक्तिमार्गावर बरीच कविता केली असल्याचें कळून आलें. त्यानंतर सन १९१३ इ० च्या सुमारास माहूरच्या बाजूस दौऱ्यावर असतांना आम्हांस माहुरास जाण्याचा योग आला तेव्हां, श्रीविष्णुदास ऊर्फ पुरुषोत्तमानंदसरस्वतिमहाराज ह्यांचे दर्शनाचा लाभ त्यांच्या आश्रमांत झाला; तथापि त्या वेळीं आम्हांस महाराजांच्या कवितेच्या प्रकाशनाचा मान मिळेल अशी कल्पनाहि आली नाहीं.

श्रीविष्णुदास कवि समाधिस्थ झाल्यावर वे० गणपतराव मडके ह्यांनीं आम्हांस, त्यांनीं कवींच्या बाडावरून व त्यांना मुखोद्गत असलेल्या पदांतून निवडलेल्या, पदांची एक वही आमचेजवळ आणून दिली व ती प्रसिद्ध करण्याचा आम्हांस आग्रह केला; परंतु ७-८ वर्षेंपर्यंत ती कविता प्रसिद्ध करण्याचें जमलें नाहीं. कवि समाधिस्थ झाल्यानंतर कांहीं काळानें आमचे सहकारी शारदोपासक श्री० वामन नारायण देशपांडे ह्यांनीं 'मुमुक्षु'मध्यें विष्णुकवींच्या कवितेसंबंधानें एक छोटासा लेख प्रसिद्ध केला. हाच कवींचा नियतकालिकामधील प्रथम उल्लेख होय. त्यानंतर कांहीं वर्षांनीं ह० भ० प० लक्ष्मणराव पांगारकर ह्यांनीं

गोमंतकांतील प्रवासांत मिळविलेलें " शिकला बात बेत सारा जुंपला बैल संसारा " हें विष्णुकवींचें लोकप्रसिद्ध पद छापलें. कवींच्या कविता निजाम-संस्थानांतील मराठवाडी आणि चांदा व वऱ्हाडचा अर्धा भाग ह्यांत प्रसिद्ध होत्या एवढेंच आम्हांस माहीत होतें. परंतु कवींच्या कविता गोमंतकापर्यंत पसरल्या होत्या हें प्रथमच आम्हांस तेव्हां कळलें. त्यानंतर आम्हांस कळलें कीं, साहित्याचार्य श्री० श्रीपाद कृष्ण कोल्हटकर ह्यांनीं १८९७ इ० च्या सुमारास प्रसिद्ध केलेल्या वीरतनय नाटकांतील एका पदास ह्या कवींच्या " निरभ्रशुभ्र नक्षत्रतुल्य ही ललना कोणाची" ह्या सुप्रसिद्ध लावणीची चाल दिली होती; इतकेंच नव्हे तर ती लावणी त्यांस पुण्यास कॉलेजमध्यें शिकत असतां उत्तम तऱ्हेनें म्हणतां येत होती. कवींच्या अनेक आख्यानांपैकीं विशेष लोकप्रिय जें बभ्रुवाहना-ख्यान तें वे० शा० सं० नरहरशास्त्री खरशीकर ह्यांच्या साहाय्यानें नांदेड परभणी-कडे आख्यानरत्नमालेंत हरिदासांच्या सोयीकरितां कांहीं दिवसांपूर्वी छापून प्रसिद्धहि केलें होतें. परंतु, आजपर्यंत ह्या कवींच्या कवितेचा जो प्रसार झाला तो हस्तलिखितावरून व गायकांच्या मुखानेंच झाला.

वे० गणपतराव मडके ह्यांनीं ७-८ वर्षांपूर्वीं आम्हांस ह्या कवींची कविता छापून प्रसिद्ध करण्याची कल्पना दिली होती. ती यंदाचे वर्षी अनायासेंच मूर्त स्वरूपांत आली. आमचे तरुण व उत्साही स्नेही श्री० दत्तात्रय बापूजी महाजन, बी. ए., दिग्रसकर, ह्यांनीं श्रीविष्णुदास कवींचा कवितासंग्रह छापून काढाव-याचा असा निश्चय केला; आणि त्या हेतूनें कवितांचीं बाडें आपल्या स्नेही-मंडळीजवळून जमा करावयास सुरुवात केली. यवतमाळास वाङ्मयाची सेवा करणारें शारदाश्रम नांवाचें शारदोपासकांचें मंडळ निघाल्याचें त्यांनीं ऐकलें होतें. तेव्हां, त्या आश्रमामार्फत आपल्या कार्यास कांहीं साहाय्य व्हावें ह्या हेतूनें श्री० वामनराव देशपांडे इत्यादि सहकारी मित्रांच्या विचारानें ही योजना त्यांनीं आम्हांस कळविली. शिवाय वे० गणपतराव मडके ह्यांनीं आधीं पूर्ण तयारी केली होतीच. तेव्हां ह्या उभयतां तरुण मित्रांनीं योजिलेल्या विष्णुदास कवींच्या कविताप्रकाशनाच्या कार्यास आम्हीं संमति दिली व त्रिवर्गाच्या सल्ल्यानें एक योजना तयार करण्यांत आली.

ती योजना अशी कीं, विष्णुदासकाव्याचें संपादकत्व आम्हीं व श्री० दत्तोपंत महाजन ह्यांनीं स्वीकारावें, व विष्णुदास कवींच्या माहूर येथील आश्रमांतील त्यांचे अधिष्ठित शिष्य श्रीभार्गवानंदसरस्वति ह्यांची संमति मिळवून त्यांचे-जवळून आश्रमांत असलेलीं कवितांचीं अस्सल बाडें मिळवून त्यांतून प्रथम निवडक कविता छापून प्रसिद्ध कराव्या. श्रीविष्णुकवींचा शिष्यसंप्रदाय मोठा आहे; व कवींच्या कवितांची आवड असणारा रसिकवर्ग विस्तृत आहे, तेव्हां अशा मंडळीकडून छपाईच्या कार्याकरतां निधि जमवावा व पुस्तक प्रकाशित झाल्यावर त्यांपैकीं २५० प्रती आश्रमाच्या उपयोगाकरतां अधिष्ठित स्वामींच्या स्वाधीन कराव्या, व बाकीच्या पुस्तकांच्या विक्रींतून शिल्लक राहिल्यास संपादकांच्या इच्छेनुरूप त्याचा विनियोग आश्रमकार्यार्थ करण्यांत यावा.

ही योजना मठाधिष्ठित स्वामींस पसंत पडून त्यांनीं कविताप्रकाशनाच्या कार्यास अनुमति देऊन सर्व बाडें श्री० दत्तोपंतांमार्फत आमच्या स्वाधीन केलीं. निधि जमविण्याच्या कामीं आम्हांस अनेक उत्साही गृहस्थ उपयोगी पडले. त्यांत स्वतः स्वामी भार्गवानंद, श्री० दत्तोपंत महाजन, श्री० अंबादास माणिकराव अनासिंगकर, श्री० पांडुरंग गोविंद ढोले पाटील, रोहणा, श्री० वामनराव देशपांडे, हे प्रमुख आहेत. कवितांच्या संग्रहाच्या निवडीमध्यें कवींचे शिष्य श्री० अंबादास-पंत अनसिंगकर, श्री० वामनराव देशपांडे व वे० नरहरशास्त्री खरशीकर, हे प्रामुख्यानें उपयोगी पडले. वे० शा० सं० खरशीकर जोशी हे कवींचे भागिनेय (भाचे) असून त्यांनी कवींचें चरित्र आणि कांहीं प्रमुख पदांच्या चाली खास कवींच्या म्हणण्याच्या पद्धतीवरून देण्यास साहाय्य केलें आहे. ह्या कवितेच्या पुस्तकास मार्मिक प्रस्तावना लिहून विदर्भस्थ चिकित्सक विद्वान् सुप्रसिद्ध वाङ्मयप्रेमी श्री० अच्युत सीताराम साठे, एम्. ए., एल्‌एल्. बी., सबजज्जसाहेब, ह्यांनीं श्रीविष्णुदास कवींची नवरसपरिप्लुत प्रतिभासंपन्न प्रसाद-गुणयुक्त कविता महाराष्ट्रांतील रसिक साहित्यभक्तांसमोर मांडली आहे. सुवर्ण-मय कोंदणानें निसर्गसुंदर रत्नाची शोभा अधिकच खुलवून दाखविली आहे. पुस्तकांत पदानुक्रमणिका पदांच्या चालींसह अकारविल्हे सूचि देऊन पुस्तक वाचावयास साहाय्य व्हावें म्हणून प्रयत्न केला आहे. कवींचें विविध विषयां-वरील कविताभांडार बरेंच विस्तृत आहे. तथापि त्यांतील निवडक भागच

ह्या पुस्तकांत घेतला आहे. रसिकांस हा प्रयत्न आवडल्यास कवींच्या आश्रमातर्फे आणखी कविता छापवून प्रसिद्ध करावयाचा आश्रमचालकांचा विचार आहे. तथापि ह्या कार्यास उत्तेजन देणें हें रसिक व सहृदय वाचकांच्या सहानुभूतीवरच अवलंबून आहे.

तथापि श्रीविष्णुदास कवींचा हा निवडक पदसंग्रह छापून प्रसिद्ध करावयाचा मान आम्हांस दिला ह्याबद्दल कवींच्या आश्रमाचे अधिष्ठित शिष्य श्रीभार्गवानंदसरस्वति ह्यांचे आभार मानणें अवश्य आहे. तसेंच कवींच्या विविध कविताभांडारांतून भक्तिज्ञानवैराग्य, शृंगारकरुणवत्सल इत्यादि, रसपरिप्लुत प्रसादगुणयुक्त ठेवा रसिक साहित्यप्रेमीयांच्या पुढें ठेवला आहे. त्याचा स्वीकार करून शारदाश्रमांतील शारदोपासकांनीं केलेली अल्पस्वल्प सेवा रसिकजन गोड करून घेतील, ही इच्छा प्रकट करून हें निवेदन संपवितों.

यवतमाळ,
ता० २-१-२८ इ०

आपला साहित्यसेवक,
यशवंत खुशाल देशपांडे.

# प्रस्तावना[1]

>:0:<

१. आर्यावर्तातील अलंकारशास्त्रज्ञांनीं नवनवोन्मेषशालिनी काव्यप्रतिभेचें फार सूक्ष्म विवेचन केलें आहे. लोकव्यवहारानें रूढ झालेले शब्दसंकेत, शब्दसमुच्चयांची परस्पर आकांक्षा, व निरावलंबी योग्यता, वाच्यलक्ष्यव्यंग्य, असे अर्थाचे त्रिविध प्रकार इत्यादि काव्यविषयांचें अनेक ग्रंथकारांनीं अनेक प्रकारें विवेचन करून कविसृष्टीचा अनुपमेय अधिकार जगताला पटवून दिला. आपल्या विवेचनावर आपणच संतुष्ट झाले, तरि अतृप्तच राहिले. चतुराननाच्या विविध भूतजाताशीं सरस्वतिपुत्रांच्या कुशल कृतीची तुलना करावयाचें धाडस त्यांनीं केलें, आणि त्यांनीं असा निर्णय दिला कीं, धातृनिर्मितीपेक्षां कविवाङ्निर्मिति ही उच्च दर्जाची. सकलशास्त्रपारंगतांच्या परिणतविचारप्रणालींमधून निघालेल्या ह्या सिद्धांताला विवेकभ्रंश असें कोणी म्हणतील; म्हणून शास्त्रज्ञांनीं मार्मिकतेनें दाखविलें आहे कीं, धातृसृष्टि कर्मनिबद्ध म्हणून निश्चितस्वरूप आहे, पण कवि-सृष्टि नियमादिबंधविरहित व निरंकुश आहे. पहिली सुखदु:खमोहमय, पण दुसरी अव्यभिचारी आनंद देणारी; एक षड्रसांची तर दुसरी नवरसांची; एक परिमाणु-प्रतिष्ठित, तर दुसरी स्वयंप्रकाशित; आणि यामुळें सृष्टिजातापेक्षां सारस्वतजाताचें महत्त्व अधिक. काव्यज्ञांचे हे बोबडे लडिवाळ बोल बाजूला बसवले, तरी धातृ-सृष्टीच्या प्रभावळींमध्यें काव्यदेवतेची प्रतिमा मेरुस्थानीं बसेल याबद्दल फारसा वाद शक्य नाहीं.

२. काव्यशक्ति अथवा काव्यप्रतिभा ही संस्कारविशिष्ट बीजरूपानें प्रत्येकाच्या हृदयांत राहते. मनुष्य रागावतो, हसतो, कारुण्यपूर्ण होतो, उपहास करतो, त्या त्या वेळेला भावनेच्या उत्कटतेप्रमाणें शब्दसमुच्चय अथवा अभिनय किंवा उच्चार या सर्वांत फरक होतो. कवीला उच्च दर्जाची फलसिद्धि व्हावयाला उपजतबुद्धि अथवा प्रतिभा ही अनन्यश्रेष्ठ दैवीसंपद् होय. प्रेमपूर्ण असल्या व

---

[1] यांतील पदांचा संदर्भ दाखविणारे लहान आंकडे प्रथमावृत्तींतील आणि कंसांत दाखविलेले मोठे आंकडे चालू आवृत्तींतील समजावे.

हटातटाच्या नसल्या म्हणजे साळ्यामाळ्यांच्या साध्याभोळ्या कथा याहि प्रभूला वात्सल्यपूर्ण कानांनीं प्याव्या लागतात. अंतरात्मा काव्यरंगांत बुडाल्यावांचून जगदात्मा प्रसन्न होत नाहीं; काव्याचा प्रसार होत नाहीं, प्रसार झाला तरी लोकमान्यता होत नाहीं. या प्रतिभेला पुढें संस्कार व्हावे लागतात. लोकानिरीक्षण, शास्त्राभ्यास, प्राचीन ग्रंथव्युत्पत्ति, हे सर्व प्रतिभेच्या हिऱ्याला टांकीचे घाव होतात, आणि हे घाव पुष्कळसे पडून प्रतिभेचा अष्टपैलू कोहिनूर बनतो. लोकनिरीक्षण म्हणजे स्थावरजंगमात्मक अखिल विश्वसंभाराचें अविरत अध्ययन. मनुष्यसमाजाची स्वभावसिद्ध वृत्ति, पशुपक्ष्यांची रहाटी, विश्वांतला प्रेमभाव व आत्मभाव, सर्वसम्मत शिष्टाचार, रूढ व अभिष्टाजात भाषणसंप्रदाय, मूर्तिभेदा इतकाच पसरलेला प्रकृतिभेद, ऋतुकालपरिस्थितिपरत्वें येणारी स्वभावभिन्नता, पापपुण्याच्या कल्पना, जातिमूलक व व्यक्तिमूलक वासना, व पृथक्चेष्टा, या सर्वांची माहिती कवीला पाहिजे. उपमादृष्टान्तउत्प्रेक्षा इत्यादि काव्यालंकार यामुळेंच उपजतात व उठावदार दिसतात.

यानंतर दुसरी गोष्ट शास्त्राभ्यासाची. छंद, व्याकरण, अलंकार, कोश, कथा, कलाविज्ञान, पुरुषार्थचतुष्टयविवेक, विविधविद्या, पशुपक्षिवर्ग, इत्यादिकांचें थोडें थोडें ज्ञान पाहिजे. कोशांत एका वस्तूला पन्नास शब्द असतील, पण छंदाला अथवा श्लेषादि अलंकाराला सापेक्ष असा त्यांतील एकादाच सांपडेल. शब्दांची जोडणी, छंदाची घाटणी, अलंकाराची थाटणी, या प्रत्येकांत कुशलता लागते. वीररसाला साकी, व शोकरसाला स्रग्धरा लावली, तर काव्यपाक नासतो, सुग्रणपणाला ग्रहण लागतें. व्याकरणप्रयोग अशुद्ध असले तर काव्यांतील नागरपणा नष्ट होतो; आणि आमच्या काव्यकुलाचा हाच कुलाचार असा कुटिल दुराग्रह धरून शिष्टपद्धतीविरुद्ध कुलपद्धतीची तळी उचलावी लागते. अभिजात प्रसंगांचें वर्णन द्यावयाला अभिजातांचा सहवास लागतो. पेशव्यांच्या पंक्तीला जे जेवले त्यांनीं रुक्मिणीनें भीमसेनाला केलेल्या मेजवानीचें वर्णन देतांना कौतुकानें दीडशें पक्वान्नांचें वर्णन केलें आहे. दोन घांस पोटांत गेले कीं आकंठ ढेकरा येऊं लागणाऱ्या आम्हीं आधुनिक अन्नविद्विष्टांनीं पांच पक्वान्नांचीं नांवें सांगितलीं कीं, आमच्या विद्वत्तेची पराकाष्ठा झाली. मुक्तेश्वरांनीं एका ठिकाणीं शंभर दागिन्यांचें वर्णन केलें आहे, व बागबगीचांचीं वर्णनें देतांना रघुनाथपंडित वगैरे कवींनीं बहुश्रुततेची पूर्ण साक्ष दिली आहे. दोन-चार फुलझाडें, अथवा पांच-सात दागिन्यांचीं

नांवें, यापेक्षां जास्त भार आम्हां आधुनिकांच्या दृष्टीवर अथवा स्मृतीवर परमे· श्वरानें टाकला नाहीं, इतके आम्ही भाग्यवंत! शृंगारमानससरोवरांतील मंदहास्या मदालसा हंसी ज्यांच्यासमोर सांडत्या यौवनाच्या ललित लावण्यानें डोलत असत, भुवनभयभंगव्यसनी भ्रूकटाक्षांच्या सस्मित तीर्यक्पातानें जे कामिनीकपोलाच्या अरुणरक्तिमेला संध्यारागाची स्वामिनी सजवीत, त्यांचेच वंशज आम्ही जेव्हां जोरदार भिंगें वापरणार तेव्हां आम्हांला सूर्यदर्शन होणार. काव्यांत धर्मप्रवचन करावें तर आमचें तत्त्वज्ञान कादंबऱ्यांतील सिद्धांतांपुरतें बसवलेलें; पहिल्या तारखेला उत्पन्न व खर्चाचा ताळेबंद घालावयाचा यापलीकडे आम्हांला अर्थज्ञान नाहीं; काम्याची कल्पना निश्चित नाहीं; यामुळें आमचा काम धर्मविरुद्ध, व मोक्षाचें ओझें आम्हीं संतांच्या खांद्यावर जन्माअगोदरच दिलेलें. आमच्या अनुभवाच्या नाडया सुटून त्यांची हृदयाशीं मात्र थोडथोडी धुगधुग लागते. सर्वस्वीं आम्ही आंखडल्यासारखे, यामुळें आमचें काव्यतेज धगधगीत न दिसतां प्रेतकळेचें दिसतें. अमर्याद अनुभवाचें खत आमच्या ज्ञानवृक्षाला लागेल तेव्हां तो गगनचुंबी फोफावेल, तथापि त्याचें कलेवर जिवंत राखण्याइतकी सेवा आम्हीं केली पाहिजे, आणि यासाठीं कवि होण्याचें तिसरें आवश्यक साधन पूर्वग्रंथांचें परिशीलन होय. त्या ग्रंथांतून उत्तमोत्तम कल्पना सांठवल्या आहेत. त्या आत्मसात् होतील तो सुदिन, तो आत्मसाक्षात्कार. आपण निःसत्त्व असलों तर वाडवडिलांच्या कीर्तीचा उपयोग नाहीं हें खरें, पण सत्त्वहि नाहीं व कुलकीर्ति नाहीं तो अगदींच अभागी. गुरुपरंपरेप्रमाणें कविपरंपरा अखंड राखली पाहिजे. " प्रौढिप्रकर्षेण पुराणरीति । व्यतिक्रमः श्लाघ्यतमः पदानाम्." काव्यांतील पदांनीं पुराणरीतीचा उच्छेद करतांना अधिक उत्कर्ष दाखवला तरच तो उच्छेद श्लाघ्य आहे. पण त्यासाठीं अगोदर पुराणरीतीचा पराकाष्ठेचा परिचय संपादिला पाहिजे.

३. कविवृद्धांशीं सादर दृढपरिचय हें आमच्या प्राचीन कवींचें ब्रीद होतें असें त्यांच्या ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें. व्यासवाल्मीकींना अगोदर वंदन करावयाचें, नंतर आधुनिक संतसद्गुरूंना नमन करावयाचें, नंतर ग्रंथपरिपोष करावयाचा. वंदन या शब्दांत वंदनादि आत्मनिवेदनापर्यंत नवविधा भक्तीचा समावेश झाला. यांत ग्रंथश्रवण आलें, अर्चन म्हणजे गुणगायन व श्रद्धा आली. पादसेवन म्हणजे नित्यपठण आलें, भजनकीर्तन आलें, दास्य म्हणजे सेव्यसेवक भाव अथवा गुरुशिष्य-

भावाची कबुली आली, आणि शेवटीं आत्मनिवेदन म्हणजे या ज्ञानकुलगंगेच्या पितृत्रयीमध्यें आपला समावेश करून घेण्याची अनिवार लालसा झाली.

" राजा चाले तेथें दळ जाय सांगातें । हें काय निरुतें बोलों लागे."

राजा आला म्हटलें म्हणजे अष्टप्रधान, चतुरंगदळ, शिपाईप्यादे, हत्तीघोडे, इत्यादि लवाजमा बरोबर आला हें शब्दवाच्य करावयाला नको. एक 'राजा' शब्दाची असीम व्याप्ति मनानें कल्पावी लागते, त्याप्रमाणें वेदन शब्दानें अध्ययन व उपासना यांचा कडेलोट समजावयाचा. 'प्रतिबध्नातिहि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः' पूज्यांच्या पूजेंत अंतराय केला तर भाग्यहानि होते, हें तत्त्व आमच्या कवींच्या अंगीं बाणलें असल्यामुळें जी हजार वर्षांमागच्या ज्ञानेश्वरमहाराजांची शब्दसंपत्ति व ललितभाषापद्धति तीच या काळांत देवनाथमहाराज अथवा गुलाबराव यांची दिसते. काव्यगंगा ही वेदग्रंथांपासून आतांच्या कवींपर्यंत सारखीच पवित्र, तिच्यांत उच्चनीचतेचा भेदभाव नाहीं, पूर्वापरभिन्नता नाहीं. पात्राची खळाळी अथवा जलाशयाचा अथांगपणा स्थानमाहात्म्यामुळें बदलेल, पण ज्ञानसूर्याचें प्रतिबिंब सर्वांत सारखेंच प्रकाशित होतें. आमच्या कवींची ही चिरसुसंस्कृत भावना असल्यामुळें परंपरोच्छेद कोठेंहि झाला नाहीं. कवींची परंपरा अखंड राहिली.

" अभयकर देउनि माथां, प्रकटोनि अंतरीं ।
मतिमंद वाचस्पतिसम बोल करी ॥
आणिक संतभक्त, किती प्रकट गुप्त ।
मागें झाले पुढें होती, त्यांचे पायीं दंडवत ॥
वर्णावें काय वाचे, कांहीं न लगेचि अंत ।
अवतार त्यांचि धरिले तारावया पतित ॥ " — देवनाथ.

हे साधुसंत, हे पतितोद्धारार्थ ईश्वरानें युगायुगीं धारण केलेले प्रकटगुप्त अवतार, महाराष्ट्राच्या पुण्यभूमींत आणि विशेषेंकरून वैदर्भाच्या धर्मक्षेत्रांत जागोजाग झाले. अण्णासाहेब भाव्यांच्या सारस्वतभारतांत त्याचा तपशील पहावा. हे पेशवाई अखेरपावेतों झाले, नंतर झाले, होत आहेत— आम्हांला दिसत नाहींत, कारण दृष्टीवर पडळ आलें, पण त्यामुळें त्यांचें अस्तित्व गेलें नाहीं. एकनाथपंचकांतील सुप्रसिद्ध वैदर्भसंत बिठाबाईरेणुकानंदन एका पदांत म्हणतातः—

" उगवला दिनकर विश्व देखे डोळां ।
न देखे आंधळा तरि काय सूर्य नव्हे ? ॥
वाजे गाजे ध्वनी विश्व ऐके कानीं ।
न पडे बधिराश्रवणीं तरि काय नादु नव्हे ॥
पंचमालापस्वरें गान करिती कोकिळा ।
नायके कावळा तरि काय वसंतु नव्हे ॥
तैसा आदिपुरुषाचा दासू विठा रेणूकानंद ।
न मानिती दुर्जन तरि काय साधू नव्हे ? "

काळाच्या क्रूर कार्पण्यामुळें साधूंचें चारित्र्य आपल्या मनावर ठसलें नाहीं, तरी तें नष्ट होत नाहीं. कालाच्या महापुरांतला, हजारोंना तो उदरसन्निविष्ट करीत असतां त्यांत जे धैर्याच्या पोहण्यानें स्वाधिष्ठित झाले, त्यांचा भविष्यकाळ खात्रीनें सदभिमान बाळगील. अशा अलीकडे दिवंगत झालेल्या कवींमध्यें श्रीपुरुषोत्तमानंदसरस्वति ऊर्फ विष्णुकवि माहूरकर यांचा समावेश होतो. हे सातारा येथील असून त्यांचे पूर्वज नगर जिल्ह्यांत धांदरफळें या गांवीं राहणारे. तेथील चिंतामणिबोवानामक सत्पात्र ब्राह्मणाचे हे पणतु. यांचें चरित्र व चारित्र्य याच ग्रंथांत वैदर्भवाङ्मयाचे लाडके पुत्र श्री० यशवंत खुशाल देशपांडे, वकील, यवतमाळ, यांनीं सविस्तर वर्णिलें असल्यामुळें येथें जास्त विस्तार करीत नाहीं. फक्त त्यांच्या काव्यप्रसादाबद्दल दोन शब्द लिहितों

४. लहानपणीं विष्णुकवींना लावण्यांचा छंद असावासें दिसतें. आणि शेवटीं दहाव्या भागांत लावण्या दिल्या आहेत त्या त्यांच्या विविध रुचींची साक्ष पटवतात. मध्यप्रांतांत जेलरचें काम केलेले श्री० नारायण तात्याजी कुंटे हे कळवितात कीं, पंचवीस-तीस वर्षामागें कांहीं वऱ्हाडच्या लावण्या अमेरिकेंत पाठवण्यांत आल्या, त्यांमध्यें या संग्रहांतील नंबर १५१ ( १६८ )

" निरभ्रशुभ्र नक्षत्रतुल्य ही ललना कोणाची ?
चपळ दृष्टि सुविलोल, लोचनीं उपमा हरिणीची '

या लावणीची फारच प्रशंसा झाली होती. या ग्रंथाचे खालीलप्रमाणें दहा

काव्यखंड कल्पिले आहेत. ( १ ) नमनपर-पदें १-४, ( २ ) देवीपर ५-४२, ( ३ ) देवतापर ४३-६१, ( ४ ) कृष्णलीला ६२-७५, ( ५ ) आख्यानपर ७६-७९, ( ६ ) तत्त्वज्ञान ८०-९४, ( ७ ) पाळणे ९५-१००, ( ८ ) आरत्या १०१-१२७, व अष्टकें १२८-१३६, ( ९ ) आत्मवृत्त पोवाडा १३७, आणि ( १० ) लावण्या १३८-१६८.

या कवितांतून पुरातन कवितांचें पारायण व तेणेंकरून आलेली अथांग लीनता, हीं जागोजाग दृष्टीस पडतात. भाषा अति गोड, साधी व सुबोध, आणि खेड्यापाड्याच्या लोकांच्या तोंडीं जी निसर्गसुंदर परंपरागत भाषा नित्य बसलेली असते ती या पदांतून जागोजाग आल्यानें कानांला हीं पदें फार मधुर वाटतात. श्रोते तर तल्लीन होतच असतील, पण वक्ता देखील आपल्या स्वच्छ व प्रशांत काव्यस्रोताकडे पाहून क्षणभर दंग होत असेल यांत शंका नाहीं. अंतरंगाचे सर्व पडदे दूर करून कवीनें आपलें हृदय आपल्या आराध्यदैवताला पूर्ण दाखविलें, व सरस्वतीनें कवीला वरप्रसाद दिला, असा भास होतो. जागोजाग वेदांताचे सिद्धांत आहेत; आणि त्यांतील कांहीं फार उच्च दर्जाचे आहेत. फार मोजक्या शब्दांत धर्मतत्त्व सांगण्याची कवीची हातोटी बेमालुम आहे. आणि धर्मतत्त्वाबरोबर व्यवहारतत्त्वाचीही जोड दिली आहे. श्रीरेणुकेच्या स्तवनाची घनाक्षरी पद ८–( ९ ) वामनपंडितांची आठवण देते.

“ काय इच्छिसि तें सांग । शक्ति पाहुनियां माग ।
स्नेहधर्मानें वाग । बये राग सोडुनि ॥
तुझा धुंडितां गांव । कोठें लागे ना ठाव ।
म्हणुनि जपतों तुझें नांव मला । पाव रेणुके ॥
सकल धर्मांचे बोल । काय बोलुनियां फोल ॥
नये भक्तीचें मोल । ब्रह्मगोल तोलितां ॥

तर १३ (४१) पद तुकारामबोवांची आठवण देतें.

तसेंच अभंग नं० ३० (४२) ३२ (२८) हि पहा.

---

१. या आवृत्तींत यांत फरक झाला आहे.

' आपुलीया हातें कापावी ही मान । जगांत अपमान करूं नको ॥
श्वानापरी ठेवी आपुल्या संग्रहीं । परी परगृहीं धाडूं नको ॥
वाढवावें प्रेम, पुरवावे कोड । ममतेचा मोड मोडूं नको ॥
भवनदीमाजी चाललों वहात । आतां मागें हात काढूं नको ॥
विष्णुदास म्हणे अगे जगन्नाथे। जननीचें नातें सोडूं नको ॥

५. देवीचा साक्षात्कार व्हावा, यासाठीं कवीनें तिला फारच करुणास्वरानें आळवलें आहे —पद १५ ( १२ ) :—

सोडुनि ब्रह्मस्वरूपासी
मी जिव झालों, पहावयास्तव तुझिया रूपासी ।
सोडुनी गृह-धन-धान्यासी
आलों साठीं तुजसाठीं मी झालों संन्यासी ।
वासना जडालि तुझ्या पायीं
म्हणुनि पवढ्या खटकर्मांच्या पडलों अपायीं ॥........।
भ्रमरवत् भ्रमकाननिं भ्रमलों
श्रमलों, दमलों, म्हणुनि भवाश्रमिं विश्रांतिस आलों ।
लागला तुझा हृदयिं लोलो
विष्णुदास म्हणे सद्गुरुकृपेनें पुरुषोत्तम झालों ॥

कवीचें पहिलें नांव कृष्णा होतें. मग त्यांनीं विष्णुदास हें नांव धारण केलें, आणि मातापुरवासिनी अंबाबाईचा हृदयीं लोलो लागल्याकारणानें ते आज खरोखरीचे पुरुषोत्तम झाले. पद १७ (१४), १८ (१५), २३ (२०) ते २५, (२२) हे भाषा-सौंदर्याचे गोड मासले होत. आईच्या बळावर लहान लेंकरूं अजाणपणें आईशींच भांडतें, तसाच कवि अंबाबाईशीं भांडत आहे पद २६ (२३). पद २८(२५) मध्यें सांसारिक श्रीमंतांच्या सांपत्तिक विलासांशीं कवीनें आपल्या अफाट दारिद्र्याची तुलना फार मार्मिकपणें केली आहे. तुम्ही वाटल्यास श्रीमंती मागा, आम्हांला गुणगायन पुरे, ही मागणी फार उच्च भक्तीची निदर्शक आहे. परमात्म्यानें सुदामदेवाला द्वारकेतून रिक्तहस्तानें परत पाठवलें त्याबद्दल निराश न होतां त्या परमभागवतानें उलट अतितृप्त अंतःकरणानें धन्योद्गार काढले आहेतः—

दरिद्र मी वित्ताच्या लोभें होईन मत्त उदंड ।
आतांचें परि मग न घडेल प्रभुचें स्मरण अखंड ॥
यास्तव करुणानिधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें
धन दिलें हें बरवें केलें दीन जनाच्या तातें " ॥ (मोरोपंत.)

तसेच उद्गार या पदांत विष्णुदासांचे आहेत. जो जीव ब्रह्मपदाला सोडून केवळ मातेच्या सगुणस्वरूपाचें दर्शन व सेवासुख घेण्याकरितां पृथ्वीवर अवतरला, त्याच्या भावना अशाच शांत व पुण्य असावयाच्या. ' आम्हि कुपुत्र म्हणउनि घेऊं । तूं नको कुमाता होऊं ॥ पद २९ (२६) हा मातेशीं प्रेमकलह, आमचें दैन्य दिसलें तर तुला कमीपणा येईल–पद ३६ (३२).

" त्रिभुवनराणीच्या गांवीं । आम्हीं काय भिक्षा मागावी ? ॥
कल्पवल्लिच्या फळाला हीं । कुहरी फुटली नवलाई " ॥

कसेंहि झालें तरी मी लेंकरूं आईच्या मांडीवरच झोंपीं जाईन.

" भेटतां भार्गवरामासी । पावतिल प्राण आरामासी ।
जोगवा मागिन सुखवासी । अथवा राहिन उपवासी ।
परि मी येइन तुजपाशीं । वांचवी अथवा दे फांशी ।
वल्कलें अथवा दे साडी । अतां या दुःखांतुनि काढी ॥ प.३९(३४)

पण या उपास्यदेवताच्या भेटीला उशीर लागला, आणि कुडी गेली तर ? मग सगळीच फसगत झाली.

" देह गेलीया शेवटीं । आशा राहील शेवटीं ॥
आधीं काढूनिया कांटीं । मग शिरीं हाणीं काठी ॥
कांहीं उरल्या अन्याय । मग त्याचा करणें न्याय ॥ प. ४७(५२)

६. चौथा भाग कृष्णलीलेचा आहे. कृष्णजन्माचें अखिल जगताला किती महत्त्व आहे, तें कवि वर्णितात पद ६२ (१०५):—

' राधे गोविंद गोविंद । गोविंद राधे ॥ १९ ॥
याचे अनुपम गुण गाढे । त्रिभुवनीं याचे हो पवाडे ।
याचे नांवें वस्तीवाडे । मोक्षाचे धरणीं ॥ २० ॥
हा अवतरला जगदोद्धारा । याच्या युगायुगीं ऐसा धारा ।
कोण शहाणा मोजील धारा । पावसाच्या ॥ २१ ॥

देवकीउदरांतुनी जन्मला । यशोदेनें प्रतिपाळिला ।
शेवटीं उपयोगासी आला । पांडवांच्या ॥ २४ ॥

अक्रूर, शबरी, अन्याश्रम ७५ (७२)–७७ (७९) हीं पदें फार गोड आहेत, तसेंच बकासुराचें पद ७८ ( ८३ ) यांत सत्पुरुषांना दिलेलें अभय व त्यांचें वर्णन लाक्षणिक रीतीनें कवीलाच लागतातः—

" जो निश्चळ रत हरिनामीं, हार तत्कामीं, तत्पर साचा ।
प्रिय माधव भक्तिरसाचा ..................... ॥
चाल ॥ जरि अभ्रामधिं रवि लपला
तरि झाकि न प्रकाश अपुला
गूण पुरुषाचा । प्रिय माधव............ ॥

श्रीदेवनाथमहाराज, अथवा विष्णुदास, यांसारखे सत्पुरुष जरी आधुनिक समाजचारित्र्यापासून फार दूर वावरत असले, तरी भक्तिरसप्रियमाधव इतरांना स्फूर्ति देऊन त्यांना पुढें आणतो. ' देवाचिये सेवें आळवावें देवा । येर अहंभावा सांडुनीया ' या उक्तीप्रमाणें या सत्पुरुषांनीं निष्काम हरिगुणगायन केलें, आणि आपण स्तुतिपात्र झाले. सहाव्या भागांतील कटाव पद ८० ( ८६ ) हा अमृत-रायांची आठवण देतो. " रुंदावलि बहु सुखांत कंबर " अशा गर्भश्रीमंताच्या लक्ष्मीचें वर्णन फार सुंदर आहे. त्यांचा ' पूर्वजन्मींचा ऋणि विश्वंभर ' याबद्दल कवीला तिळमात्र विषाद नाहीं. कवीचा इशारा एवढाच कीं, ' भगवंता । भज सोडुनिया सर्व अहंता ' पद ८१ ( ८७ ) मध्यें आयुष्याच्या विविधावस्था शेक्सपीयरप्रमाणेंच वर्णिल्या आहेत, कल्पना मात्र सर्व पौर्वात्य. पद ८२ (८८) हें देवनाथमहाराजांच्या ' अमोल काया जाइल वाया ' या पदाची आठवण देतें. शेतकऱ्याची व संसारियाची तुलना पद ८८ ( ९४ ) ही फार मनोहर आहे, आणि परब्रह्माची पांखराशीं तुलना पद ९३ ( ९९ ) मुळालाहि शोभा आणील.

" आठव्या समुद्रामध्यें बांधलें वसनदारीचें घर
चक्रावांचुनि उदंड मडकीं फिरवितसे गरगर ।
त्याला धरायासाठीं हिंडतें ब्रह्मांचें लेंकरूं
विष्णुदास म्हणे त्यासि धरिल जो तोच आमुचा गुरू " ॥

७. भाग सातवा व आठवा यांतील आरत्या व अष्टकें इत्यादिकांची गोडी अनुभवल्यावर वाचकाला एकदम कवीच्या आत्मचरित्राचा पद १३७ ( १५३ ) संबंध येतो. आणि कवीला आपल्या सुशील भार्येच्या विरहानें जें अपरिमित दुःख झालेलें आहे, त्याचा वाचकहि वांटेकरी होतो. ' रंगपटावर स्त्री-पुरुषांची फुटली रे जोडी । आतां काय खेळण्याची गोडी '. आपल्या गांवीं कांहीं दिवस सुखाचा संसार केल्यावर कवीला देशपर्यटनाची अनिवार लालसा उद्भवली. हे भलत्याच एकाद्या दिवशीं दगा देऊन जातील, म्हणून बाईनें सात दिवस अहर्निश जागरणें केलीं. आणि आठव्या रात्रीं तिला जरा झोंप लागली; आणि बोवा लागलीच परदेशांत गेले. बाईनें मागें अति आकांत केला. उपासतापास, गुरुजनसेवा, व्रतें-वैकल्यें, अश्रूंचे अखंड निर्झर, यांनी देह कृश करून घेतला, आणि सर्व लोक तिच्यासाठीं हळहळून तिचें शांतवन करावयाला लागले. " पर्जन्य पडतो परी न दिसतें गगनाला भोक । ईश्वरी चारित्र अवलोक " असें प्रेमळांचें प्रोत्साहन प्राणधारणाला परिषोषक झालें. कांहीं दिवसांनीं बाईना धन्याचा पत्ता लागून त्या माहेरीं आल्या. संसारसुखाचें स्वल्पस्वप्न त्यांनीं पाहिलें. कांहीं दिवस आनंदाचा कडेलोट झाला.

' तप्त अंगावर सदा पाझरे चंद्रामृत किरण
पावलें स्वस्थान्तःकरण
लक्ष्मीपतिनें धनधान्यादिक भरपूर सुवर्ण
पुरविलें बहुवस्त्राभरण
जी जी वासना धरिली ती ती केली परिपूर्ण
झाला सकळ शोक हरण
देवें कंटकवनीं लाभली कल्पद्रुमझाडी
आतां काय खेळण्याची गोडी ॥

गुणी माणसांना ईश्वर आपल्याकडे लवकर ओढून नेतो. बाई सर्व रीतींनीं आनंदांत असतां त्यांना देवाघरचें मूळ आलें.

प्रपंचभुवनांगणीं सुशोभित द्राक्षाची वेली
मंडपीं होती पालवली ॥
प्रारब्धानें मुळासकट ती उपटुनिया नेली
जगांतनि नाहींशी झाली ॥

**संसाराची सर्व उभारी येथुनियां सरली**
**सुखाची सरिता ओसरली ॥**
**परि काळानें केळ कोंवळी कापिली अघाडी**
**आतां काय खेळण्याची गोडी ॥**

या पत्नीनिधनानंतर कवि एकनिष्ठेनें रेणुकामातेची सेवा करूं लागले, आणि आईनें केलें त्यांतच आपलें पूर्ण कल्याण व कैवल्य, अशी दृढभावना त्यांना बाणली. " आई खरेंच ग, जें केलेंस तें बरेंच ग " पद ४० (३५) हें या स्थितीनंतरचें पद. यापुढें कवींनीं शिष्यशाखेसह जागोजाग धर्मप्रसार करण्याचा क्रम ठेविला. रा० नरहरशास्त्री जोशी, खरशीकर यांनीं कवींचें चरित्र फार रसाळ वाणीनें लिहिलें आहे, तें या कवितेच्या पुढल्या भागाबरोबर प्रसिद्ध होईल, तर लोकांना चरित्रलेखनाचा एक गोडसा मासला दिसेल. कवींनीं पुढें चतुर्थाश्रम घेऊन देहत्याग केला. त्यांची मठपरंपरा चालेलच, पण त्यांच्या काव्याचा प्रसार हेंच त्याचें खरें स्मारक. श्रीमंत यशवंतराव देशपांडे यांनीं परिश्रमपूर्वक एक भाग छापला आहे. लोकांनीं चीज केल्यास दुसरा काढण्याची, व आणखी इतर कवींचें संशोधन करण्याची त्यांना हिंमत येईल. आपल्याकडे आणि विशेषतः वऱ्हाडांत संशोधन होत नाहीं, याबद्दल पुष्कळजण नक्राश्रु ढाळतात; पण राष्ट्रकार्य हें अनन्यसापेक्ष भावनेनें करावें, हा जरी वाङ्मयभक्तीचा निस्सीम सिद्धान्त असला तरी प्रत्येक कार्य जनतासापेक्ष असलें तर सुलभपणें तडीस जातें हेंहि खरें. कर्त्यांच्या निरपेक्षतेचें ध्येय जनता बोलावयाला लागली कीं, तिची अवनति आपलीं पिलें भक्षण करणाऱ्या बोक्यासारखी होते. उदासीनतेच्या खडकांत उत्साहाचें रोपटें कोमेजून मरतें. ' अस्मिन् द्वयं श्री च सरस्वती च ' असें विनायकराव भाव्यांसारखे भाग्यवान् विरळा. यवतमाळच्या विद्वान् तरुणांनीं अंगमेहनतीनें, व वऱ्हाडच्या धनिकांनीं द्रव्यसाहाय्यानें, श्री० देशपांडे यांचा भार हलका केल्यास वैदर्भांच्या वाङ्मयखाणींतून बरींच रत्नें प्रकाशांत येतील, व स्वभूमीची कीर्ति वाढवतील, अशी दृढ मनःप्रेरणा झाल्यामुळें हें जरासें विषयांतर झालें; वाचकसंत त्यांतला ग्राह्यांश तेवढा घेवोत.

---

१ हें चरित्र प्रकाशित झालें आहे.

८. प्रत्येक कवीचें काव्यध्येय व काव्यसंपत्ति वेगळाली असते. कोणी शब्द-रत्नांचा संग्रह करतो, तर कोणाची वृत्तजोडणी मनोहर असते, आणि तिसऱ्याला विचारांची मांडणी उत्तम करतां येते, तर चवथ्याची प्रतिभा जगत्पावनी जाह्नवी-प्रमाणें संथ, पवित्र, शीतल व ओजस्विनी असते. समुद्र हा जलचरांमुळें अधृष्य, तर महारत्नांमुळें अभिगम्य असतो; त्याप्रमाणें श्रीज्ञानेश्वरमहाराजांची कविता दुर्बोध शब्दांनीं दुरावते तर उपमादृष्टांतांच्या रत्नदुकूलांनी जगताला अनिमिष-लोचन करते. कोणाला सरस्वतीचा सर्वांगी अनुग्रह असतो, तर कोणाला एकादा विशिष्ट रूपाचा अनुग्रह असतो. कोणताहि कवि घेतला, तरी त्याची पद्धति व्यक्त करणारीं वचनें त्याच्याच काव्यात सांपडतात. विष्णुकवींची काव्यपद्धति त्यांच्याच भाषेंत वर्णिली तर अशी आहेः—

> " आरस नाहीं, सरस आहे खिरस गाईचा
> मिळेना बहु महागाईचा ॥
> घ्यावा मासला मधूर केवळ साखरसाईचा
> आहे बहु तुमच्या सोईचा
> सुगंधपुष्पासहित पसरला वेल जाईचा "

वैदर्भमहिर्षीच्या अनुपमेय उपवनांत अनंत फलपुष्पविलसितवृक्षवेली आहेत. चतुर बागवानांनीं त्यांचा जोपासना चालविली आहे. संसारपांथस्थांनीं क्षणभर तेथें आराम घेऊन, हीं पुष्पफलें देणाऱ्या जगन्निवासाबद्दल कृतज्ञता-बुद्धि ठेवावी, यांतच शास्त्र व सुख या दोहोंचाहि अलभ्यलाभ होईल.

नागपूर
ता० २९-१२-१९२७ इ०

अच्युत सीताराम साठे.

---

श्रीविष्णुदासमहाराज, माहूर.

श्रीपूर्णब्रह्म करुणाघन सारसाक्षी



श्रीपूर्णब्रह्म जगजीवन सार साक्षी

श्रीपूर्णब्रह्म प्रभु श्रीगुरु विष्णुस्वामी ।

श्रीसद्गुरुवरपदं सततं नमामी ॥

श्रीसंतवर्य अनंतरावमामा

ऊर्फ गुरूदासमहाराज, माहूर.

श्रीरामकृष्ण रूप त्वमेव ।



दत्तात्रेय रूप त्वमेव ।

श्रीगुरुदास रूप त्वमेव ।

स्वयं शुद्ध निर्मलम् ॥

# श्रीविष्णुदास कवि
## ह्यांचें
# जीवनवृत्त*

श्रीविष्णुदासकवींचें जीवनवृत्त लिहून पाठविण्यास कवींचे भाचे वेदशास्त्रसंपन्न नरहर सदाशिव जोशी, खरशीकर, ह्यांस विनंति केली होती; त्याप्रमाणें त्यांनीं चिकित्सक व भाविक दृष्टि पुढें ठेवून कवींचें विस्तृत व मनोवेधक चरित्र लिहून पाठविलें आहे. परंतु स्थलाभावामुळ संपूर्ण चरित्र ह्या ग्रंथांत देणें शक्य नसल्यामुळें नाइलाजास्तव त संक्षिप्त रूपानें वाचकांस सादर करावें लागत आहे. तथापि संक्षेप करतांना वे. नरहरशास्त्री जोशी ह्यांच्या लेखांतील स्वारस्य न जाऊं देतां, होतां होईल तो, त्यांच्याच शब्दांत कवींचें जीवनवृत्त देण्याचें योजिलें आहे.

## कुलवृत्तान्त

कवींचे पूर्वज फार पुरातन काळीं कसबे धांदरफळ, ता० संगमनेर, जि० अहमदनगर येथें राहत असत. हे काश्यप गोत्री शुक्ल यजुःशाखीय वाजसनेयी होत. कालचक्राच्या फेऱ्यात सांपडून कवींचे पूर्वजांपैकीं एक गृहस्थ सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत धांदरफळ हें गांव सोडून परागंदा झाले, ते फिरत फिरत साताऱ्यास आले, व तेथेंच त्यांनीं वस्ती केली. गांव जरी त्या गृहस्थांनीं सोडला, तरी गांवची खूण म्हणून त्यांनीं स्वतःचें उपनाव धांदरफळे म्हणून धारण केलें. आजमितीस साताऱ्यास ह्या घराण्याचीं बरींच घरें आहेत.

परंपरेच्या माहितीवरून असें समजतें कीं, शके १६६५ [ इ० स० १७४३ ] मध्यें ह्या घराण्यांत चिंतामणि नांवाचा पुरुष जन्मला; त्या वेळी साताऱ्यास शाहूमहाराजांची कारकीर्द होती. हे चिंतामणि ईश्वरभक्त असून श्रीगणपति व श्रीदत्तात्रेयाची उपासना करीत. ह्यांस शके १७०५ [ इ० स० १७८३ ] मध्यें शिवराम नांवाचा मुलगा झाला. चिंतामणभटजींनीं स्वार्थ-परमार्थ साधून शके १७४५ चे सुमारास देह ठेविला. शिवरामभटहि वडिलांप्रमाणेंच दत्तोपासक असत. शिवरामभटांचा चरितार्थ राजघराण्यांतून चालत असे. ह्या वेळीं प्रतापसिंहमहाराज सातारच्या गादीवर होते. भोसल्यांचे आप्त श्री० डफळे, जत सरकार,

* श्रीविष्णुदासमहाराजांचें विस्तृत चरित्र छापलें आहे.

यांचेंहि वास्तव्य सातान्यास मंगळवार पेठेंत असे. शिवरामभटजींचें घरहि त्याच पेठेंत असल्यामुळें त्यांचाहि आश्रय भटजींस मिळत असे. शके १७३२ त त्यांस कन्या झाली, तिचें नांव बयाबाई ठेवलें; व शके १७३५ त पुत्र झाला त्याचें नांव श्रीधर ऊर्फ रावजी ठेवलें, व शके १७३७ मध्यें दुसरा पुत्र झाला त्याचें नांव भालचंद्र ठेवलें. बयाबाई दुर्दैवानें बालविधवा झाल्यामुळें त्यांचा काळ मातृपितृसेवेंत माहेरींच गेला. उपनयनसंस्कार झाल्यावर रावजी व भालचंद्र उभयता बंधु ह्यांस वैदिककर्माचें शिक्षण मिळालें. नंतर ते वडिलांबरोबर राजवाडा व इतर ठिकाणीं भिक्षुकीस जात. रावजींचें लग्न कृष्णातीरीं असलेल्या जेहेकठापुर क्षेत्रींच्या झिंप्रेशास्त्री ह्यांच्या कन्येशीं झालें. तिचें नांव गंगाबाई ठेवलें. भालचंद्र ह्यांचें लग्न त्रिपुटी येथील पांडुरंगबोवा दगडे यांचे कन्येशीं झालें. तिचें नांव अन्नपूर्णा ठेवलें. शिवरामभटजींप्रमाणेंच उभयता चिरंजीव, शुद्ध, नीतिमान् व ईश्वरभजनीं रत होते. शिवरामभट शके १७६५ मध्यें कैलासवासी झाले. उभयता बंधु सलोख्यानें वागत. रावजी यांचें अक्षर सुंदर असल्यामुळें ते पोथ्या, ग्रंथ लिहिण्याचें काम करीत, व भालचंद्रभटजी गांवांत भिक्षुकी करीत असत. रावजींकडून कित्येक राजेरजवाड्यांनीं ग्रंथ लिहवून घेतले असून, सातारा जिल्ह्यांत अझूनहि रावजींच्या हातचे लिहिलेले पुष्कळ ग्रंथ दृष्टीस पडतात. इ० स० १८४८ त प्रतापसिंहांचे बंधु शहाजीमहाराज निपुत्रिक वारल्यामुळें इंग्रज सरकारनें साताऱ्याचें राज्य खालसा केलें त्या वेळीं पुष्कळ घराण्यांचा आश्रय सुटला, त्यांत ह्या उभयता बंधूंनाहि निराश्रयता प्राप्त झाली.

## बालपण

रावजींस सौ० गंगाबाईच्या उदरीं शके १७६४ च्या सुमारास कन्यारत्न झालें. तिचें नांव यशोदा ठेवलें. त्यानंतर ह्या ईश्वरपरायण कुलांत वरील माता-पितरांच्या पोटीं शके १७६६ ( इ० स० १८४४ ) मध्यें एक पुत्ररत्न झालें. बारावे दिवशीं शास्त्रोक्त पद्धतीनें नामकरणसंस्कार करून ह्या शिशूचें नांव " कृष्णा " असें ठेवलें. हाच कृष्णा पुढें लौकिकांत " विष्णुदास " कवि ह्या नांवानें प्रसिद्ध झाला. त्या काळचे साताऱ्याचे राजज्योतिषी ह्यांनीं कृष्णाचें जातक वर्तवून " हा पुत्र तुमचे वंशांत कुलदीपक होईल, पण आपल्या कौटुंबीय मंडळीस दुःखदायक होईल," असें भाकित केलें. कृष्णानंतर सौ० गंगाबाईस दोन-दोन वर्षांच्या अंतरानें दोन मुली झाल्या. त्यांचीं नांवें काशी व सीता ठेवलीं होतीं.

त्यानंतर दोन अल्पायुषी संतति झाल्यावर शके १७७९ मध्यें एक मुलगी झाली तिचें नांव रंगू ऊर्फ रमाबाई. याच वे. शा. सं. नरहरशास्त्री जोशी, खरशीकर, ह्यांच्या मातुश्री होत. नंतर शके १७८२ मध्यें विष्णु ह्या नांवाचा मुलगा झाला. हे विष्णुपंत हल्ली नागपुरास आहेत. त्यानंतर भीमा नांवाची मुलगी झाली. नंतर शके १७८७ मध्यें अनंत या नांवाचा मुलगा झाला. हा अनंत माहूरचे मठांत श्रीगुरुदास ह्या नांवानें श्रीविष्णुदासांप्रमाणेंच सत्पुरुष म्हणून प्रसिद्धीस आला. अनंतानंतर शके १७९० मध्यें गणपति नांवाचा मुलगा झाला. हे गणपतराव हल्लीं कधीं पुणें व कधीं माहूर येथें असतात. रावजींना एकंदर ११ मुलें झालीं. पैकीं अल्पायुषी संतति वगळून ५ मुली व ४ मुलगे होते. भालचंद्र-बोवांस फक्त अंबाबाई ह्या नांवाची एकच कन्या होती. एवढ्या मोठ्या कुटुंबाचा संसार दक्षतेनें चालला होता.

कृष्णा ह्यास बालवयापासूनच धार्मिक संस्कार फार उत्तम झाले. ह. भ. प. हरिबोवा सातपुते, रहिमतपुरकर, ह्यांचीं अत्यंत प्रेमळ कीर्तनें राजवाड्यांत व इतर ठिकाणीं होत असत. हरिबोवा व रावजी हे मित्र असल्यामुळें हरिबोवा रावजी ह्यांचे घरीं येत, व कृष्णाहि त्यांचे कीर्तनास नेमानें जात असे. आपल्या अल्पबुद्धीप्रमाणें कृष्णा हा बोवांस भक्त्यादि विषयांवर प्रश्न विचारी, ही त्याची कुशाग्रबुद्धि आणि ईश्वराविषयीं पूज्यबुद्धि पाहून हा कोणी तरी योगभ्रष्ट असावा असें म्हणत. वयाच्या सातव्या वर्षी मौंजीबंधन झाल्यावर कृष्णास गुरुजीकडून संध्या, पुरुषसूक्त, रुद्र, इत्यादिकांचें अध्ययन मिळालें. आठवे वर्षापासून श्रीगुरु-चरित्र वाचण्याचा त्यास हव्यास लागला; व एकांतांत बसून ध्यानधारणा व नामस्मरण करूं लागला. पांडुरंगमहाराज म्हणून एक साधु होते. त्यांचेजवळून कृष्णास प्राणायामाची व आसनांची माहिती मिळाली.

## विवाह

अल्पवयांतील हें धोरण पाहूनच घरांतील व शेजारच्या मंडळीस हा वैराग्य-संपन्न होणार व प्रपंचपाश दूर झोकणार असें वाटूं लागलें. परंतु आतांपासून हा वैराग्यशील बनला, तर बरें नव्हे; करितां कृष्णाचा विवाह करून त्यास पत्नीरूप-

---

१ विष्णुपंत हे मार्गशीर्ष वद्य १४ शके १८६० रोजीं नागपुरास वारले. आतां पुत्राकडून त्यांचा वंश राहिला नाहीं. २ गणपतराव ६ वर्षापूर्वी माहूर येथेंच वारले.

पाशानें घट्ट बांधून टाकावें म्हणून घरच्या मंडळींचा विचार ठरला. त्यास रहिमतपुरकरबोवा ह्यांनींहि कृष्णासारखा देखणा, हुशार, आणि भगवद्भक्त, जामात मिळावा म्हणून आपले बंधु सीतारामबोवा ह्यांची कन्या कृष्णास करून घेण्याविषयीं रावजींकडेस गोष्ट काढली, व रावजींनींहि ह्या भगवद्भक्त घराण्याशीं आपला संबंध जुळतो असें पाहून रुकार दिला. वधूवरांचें घटित पाहून तिथिनिश्चय केला, सुमुहूर्तावर कृष्णाचें लग्न झालें. रहिमतपुरकरबोवांनीं देणगी बरीच दिली. वधूप्रवेश होऊन वधूचें नांव राधाबाई ठेविलें. ह्या वेळीं कृष्णाचें वय बारा वर्षांचें व राधाबाईचें वय नऊ वर्षांचें होतें.

लग्न झाल्यावरहि कृष्णानें पुराण-कीर्तन वर्ज्य केलें नाहीं; पूर्वीपेक्षांहि जास्त चित्तवृत्ति परमार्थसाधनाकडे ओढ घेऊं लागली. श्रीगुरुचरित्राचीं पारायणें करावींत, व नित्य पारमार्थिक ग्रंथ वाचावेत. सातान्यास मंगळवार पेठेंत, लोणार-ओळींत रोज रामविजय, हरिविजय, भक्तिविजय, इत्यादि प्राकृत ग्रंथ अति रसाळ वाणीनें हा लहान मुलगा सांगत असे. तेथें रोज याच्या पुराणास मंडळी जात. "सद्गुरुवांचोनी सांपडेना सोय" ह्या वचनावर एकदां त्यानें कीर्तन ऐकलें. त्यावरून त्याचे ठिकाणीं गुरूविषयीं तीव्र तळमळ उत्पन्न झाली. एके दिवशीं गुरुचरित्राचें एकांतांत पारायण केल्यावर दृष्टान्त झाला कीं, तूं पांडुरंगबोवांपासून उपदेश घे. नंतर दुसरे दिवशीं संसारबंधापासून मुक्त होण्याचें साधन गुरुपासून संपादन करण्यासाठीं पांडुरंगबोवांकडे जाऊन त्यांच्या चरणांवर मस्तक लीन केलें; व बोवांनींहि शिष्य प्रज्ञावंत व अधिकारी आहे असें पाहून अनुग्रह केला व शिष्यास कृतार्थता आली. पांडुरंगबोवा हे कृष्णाचे चुलते भालचंद्रबोवा यांचे श्वशुर होते. ते त्रिपुटीमध्यें गोपाळनाथ नांवाचे सत्पुरुष होऊन गेले त्यांचे वंशज होते. पांडुरंगबोवांस कोणताच प्रापंचिक पाश राहिला नसल्यामुळें ते मुलीच्या घरीं माडीवर राहिले होते. ब्रह्मकर्म आचरून मधुकरीवर निर्वाह करीत असत व राहिलेला वेळ हरिस्मरणात घालवीत असत. "बाहेरीं कर्में क्षाळिला । भीतरीं ज्ञानें उजळिला ॥" अशी पांडुरंगबोवांची स्थिति होती. अशा गुरूचा अनुग्रह झाल्याबरोबर कृष्णास जन्माचें सार्थक झालें असें वाटूं लागलें. एक वर्षपर्यंत श्रीगुरुसेवा उत्तम प्रकारें केली व गुरुकृपेनें सगुणसाक्षात्काराची तळमळ कृष्णास वाटूं लागली. कृष्णाचा चतुर्थाश्रम झाल्यावर माहूरच्या आश्रमांत माघ शुद्ध द्वादशीस पांडुरंगबोवा गुरूंची पुण्यातिथि करीत असत. तथापि विष्णुदासकवींनीं संन्यास घेतल्यावर संन्यास देणारे गुरु उमर-

खेडच्या चिन्मयानंद संस्थानचे अधिष्ठित नित्यानंदस्वामी यांची परंपरा चालवूं लागले, आणि तीच परंपरा विष्णुदास कवींचे शिष्य चालवीत आहेत.

कृष्णाचा विवाह झाल्यानंतर क्रमाक्रमानें रावजींच्या मुलांमुलींचीं मुंजी-लग्नें झालीं. यशोदा ह्यांचे घराजवळच दत्तोबा मांडवगणे यांस, व काशी शेजारींच सदोबा काळे यांस दिली. मेढयाचे लक्ष्मणराव देशपांडे ह्यांस सीता दिली. रंगूबाईस खरशी येथील सदाशिवपंत जोशी ह्यांस, व भीमास श्रीक्षेत्र धोम येथें वामनराव जोशी ह्यांस दिली. विष्णुपंतांचें लग्न होऊन त्यांना ५ मुली झाल्या, व त्यांचें कुटुंब निवर्तलें. अनंता हा बालब्रह्मचारी राहून पुढें संत झाला. गणपतरावहि ब्रह्मचारीच आहेत. या घराण्याचा पुत्रसंततीकडून वंशविस्तार झालेला नाहीं.

## गृहत्याग

दिवसेंदिवस कृष्णा मोठा होऊं लागला, पण कृष्णाचें चित्त श्रीदत्तदर्शनासक्त झाल्यामुळें तें प्रपंचांत बिलकुल लागेना. एक दिवस कृष्णा सातान्याहून सोळा कोसांवर श्रीकृष्णातीरीं कऱ्हाड क्षेत्र आहे तेथें जाऊन राहिला. परंतु भालचंद्रबोवांनीं तेथें जाऊन त्यास परत आणलें. ह्यानंतरहि पुनः कृष्णा श्रीनृसिंहवाडीस जाऊन राहिला. पण तेथूनहि ५।६ महिन्यांनीं भालचंद्रबोवांनीं त्यास परत आणलें. वयाच्या १४ व्या वर्षीं राधाबाई ऋतुमती झाल्या व त्यांचा गर्भाधानविधीहि थाटानें झाला. पायांत संसाराची शृंखला घट्ट बसल्यामुळें आतां तरी कृष्णा पळून जाणार नाहीं व त्याचें चित्त संसारांत लागेल, असें मंडळीस वाटलें. तथापि कृष्णाच्या मनांत सगुण परमात्म्याचें दर्शन झालें पाहिजे, हा ध्यास सारखा लागून राहिला होता. मग प्रपंचाकडेस कसचें लक्ष लागणार ! परमात्म्याचें दर्शन झाल्याशिवाय संसार परमार्थ गोड लागावयाचा नाहीं अशी कृष्णाची अगदी उदासीन वृत्ति झाली.

गर्भाधान होऊन एक वर्ष झालें. नित्यपारायणें, संतसहवास सुरूच होता. सौ० राधाबाई फारच सदाचरणी होत्या; पति प्रत्यक्ष शंकररूप समजून पतिसेवा उत्कृष्ट करीत असत, घरांतील मंडळींशीं नम्रपणानें वागत, त्यामुळें त्या सर्वांनाच आवडत. खुद्द विष्णुदास कवींनीं ' रंगपटावरी स्त्रीपुरुषांची फुटली रे जोडी " या आत्मचरित्रपर पोवाड्यांत आपल्या भार्येचे फार उत्तम गुण गायिले आहेत. त्यावरून राधाबाईची योग्यता ध्यानांत येईल. तथापि पतिपरायण व प्रेमळ पत्नीहि कृष्णाचें मन संसारान्मुख करूं शकली नाहीं.

ध्रुवास जसें मधुवनांत सगुण नारायणाचें दर्शन झालें, तसेंच मलाहि अरण्यांत दर्शन होईल काय ? असा मनाशीं विचार सुरू झाला. एके दिवशीं कृष्णाजींनीं मी संतसमागमासाठीं तीर्थयात्रेस जातों व लौकरच परत येईन असें पत्नीस सांगितलें. तें ऐकून सौ. राधाबाईच्या मनाची काय स्थिति झाली, इत्यादि प्रसंगांचें पोवाड्यांत मोठें रसभरित व करुणापर वर्णन आहे. विनवणी करूनहि मुलूखगिरीचा निश्चय ढळत नाहीं असें पाहतांच मींहि बरोबर येऊन 'वनाचें वैभव भोगावें व आपल्या सेवेंत वागावें' असा पत्नीनें निश्चय कळविला. ह्याप्रमाणें एकीकडे पत्निप्रेम, व दुसरीकडे श्रीदत्तदर्शनाची तळमळ, अशा कात्रींत मनःस्थिति सांपडली असतां शेवटीं मनोविजय करून विरक्त वृत्तीत राहून गृहादि त्यागपूर्वक ईश्वरभक्ति करावयाचा संकल्प कृष्णाजींनीं केला व एके दिवशीं रात्रीं कोणास न कळत माता, पिता, कलत्र, इत्यादि परिवाराचा व गृहाचा त्याग करून सातारा शहराबाहेर धूम ठोकली. मोठमोठीं शहरें सोडून आडरस्त्यानें चालावयाचा क्रम ठेवला. रोज स्नान-संध्या आटोपून सोय असेल तेथें मधुकरी मागावी व संध्याकाळपर्यंत चालत असावें; प्रवासाचे अनेक कष्ट सहन करीत कृष्णाजी कोल्हापुर, बेळगांव, पंढरपूर, हुबळीवरून हंपी-विरूपाक्ष येथें जाऊन पोंहोचले. त्या वेळीं त्यांचें वय केवळ अठरा वर्षांचें होतें. घरीं पूर्ण अनुकूलता, पतिसेवापरायण स्त्री, प्रपंचाची अंगावर जबाबदारी नाहीं, अशा स्थितींत व ऐन तारुण्याच्या उमेदींत कृष्णाजींनीं मोहपाश तोडून निवृत्ति मार्ग स्वीकारला, यावरून त्यांच्या शूरत्वाची व वैराग्याची कल्पना होते.

## तीर्थयात्रा

दक्षिणेकडील तीर्थें व क्षेत्रें पाहत पाहत कृष्णाजी हे विरूपाक्ष येथें आले. तेथें हंपी मठांतील श्रीमच्छंकराचार्य यांचे चरणीं लीन झाले. स्वामींना मराठी भाषा चांगली येत असे. त्यांनीं कृष्णाजींचे ठायीं वसत असलेली परमात्म्याच्या सगुण दर्शनाची व सत्समागमाची आवड पाहून त्यांना तेथेंच राहण्यास आज्ञा दिली. कृष्णाजींनीं तेथें आपलें नांव विष्णुदास म्हणून कळविलें, व तेव्हांपासूनच ते लौकिकांत श्रीविष्णुदास या नांवानें प्रसिद्धीस आले. मूळनांवानें व्यवहार केल्यास कदाचित् ओळखले जाऊन परत गृहपाशांत जावें लागेल, म्हणूनहि हें धाकट्या बंधूचें नांव त्यांना घ्यावें लागलें. आचार्यमठांत रोज नित्यकर्म,

गुरुचरित्रपठण, आचार्यभाष्यांचें श्रवण, वगैरेंत विष्णुदासांचा काल उत्तम जाऊं लागला. याप्रमाणें जवळजवळ एक वर्ष काल तेथें व्यतीत झाला, तथापि श्रीदत्तदर्शनाची तळमळ असल्यामुळें येथेंहि राहण्याचें बरें वाटेना. वर्ष संपतांच शैल्यपर्वतास जावें असा दृष्टान्त झाला; तेव्हां आचार्यांस शैल्य-पर्वतावर जाण्याची आज्ञा मागितली. शैल्यपर्वतावर श्रीमल्लिकार्जुनाचें दर्शन, पूजाअर्चा, करून कांहीं दिवस तेथें आनंदांत काढले. तेथेंहि विष्णुदासांस दृष्टान्त झाला कीं, आतां तुह्मीं श्रीक्षेत्रमातापुरांत यावें. तेथें मी अत्र्या-श्रमांत आहे. शिवाय जगन्माता रेणुकादेवी येथें आहे. येथें आल्यावर आपले मनोरथ पूर्ण होतील." असा दृष्टान्त झाल्यावर श्रीशैल्यपर्वतास वंदन करून श्रीविष्णुदास निघाले. ही गोष्ट शके १७८६ मध्यें घडली. या कालांत श्रीस्वामी समर्थांचा अलौकिकत्वाचा परिमळ सर्वत्र सुटून अक्कलकोट पुण्यस्थळ होऊन राहिलें होतें. श्रीस्वामीमहाराजांचा आशीर्वाद घेऊन विष्णु-दास मोंगलाईंत शिरले व गोदातीरचीं क्षेत्रें पाहत पाहत माहूरच्या रस्त्यास लागले. वाटेंत गोदातीरीं श्रीक्षेत्र बासर आहे तेथें श्रीसरस्वतीचें मंदिर व व्यासोनारायणाची मूर्ति आहे. श्रीसरस्वतीचें मंदिर, गांवापासून दूर अरण्यांत रम्यस्थान असें पाहून तेथेंच मुक्काम केला. देवीचें व व्यासोनारायणाचें दर्शन, पूजाअर्चा, इत्यादि यथासांग झालें. येथेंच सरस्वतिदेवीचा विष्णुदासांवर अनुग्रह झाला; व " मी तुझेबरोबर मातापुरास येतें व तुझ्या जिह्वाग्रीं वास करतें " असा त्यांस देवीचा दृष्टान्त झाला. साक्षात्कार झाल्यावर मन सुप्रसन्न होऊन विष्णुदासांनीं श्रीसरस्वातिदेवीची " जयदेवी जयदेवी जय मंगलनिलये " ही आरती तयार केली. सकाळीं स्नानसंध्या, पूजाअर्चा, झाल्यावर हें सिद्धक्षेत्र सोडलें. बासर क्षेत्राहून माहूर ४० कोस आहे. या प्रवासांत मार्गांत वाढवणें गांव लागलें. तेथील श्रीपरमेश्वराचें दर्शन घेऊन फिरत फिरत स्वारी श्रीमातापुरीं येऊन विश्रांति पावली.

श्रीमातापुरक्षेत्रास आल्यावर श्रीदेवेश्वरासन्निध विष्णुदासांनीं वास्तव्य केलें. तेथें जपतपादि अनुष्ठान करून गांवांत मधुकरी मागावी. श्रीदत्त-शिखरावर जाऊन श्रीदत्तात्रेयदर्शन, व श्रीअनसूयामाईचें दर्शन घेत असावें. तसेंच विश्वस्वामिनि श्रीरेणुकादेवी इचेंहि दर्शन घ्यावें. याप्रमाणें कालक्रमणा सुरू झाली. माहूर क्षेत्रास शके १७८६ मध्यें विष्णुदास येऊन पोंहोचले.

## शोक

इकडे साताऱ्यास विष्णुदास रात्रीं कोणास न कळत गृहत्याग करून निघाले; तेव्हां सकाळीं उजाडल्यावर जिकडे तिकडे आकांत झाला. पत्नी, माता, पिता, बंधु, पितृव्य, इत्यादि घरांतील सर्व मंडळी अगदीं दुःखार्णवांत बुडाली. चुलते भालचंद्रबोवा यांनीं मागें दोनदां कृष्णाचा शोध लावून त्यास परत घेऊन आले होते. आतांहि कृष्णा कोठें तरी जवळपास एकाद्या क्षेत्रीं गेला असेल, त्यास परत आणण्याकरितां भालचंद्रबोवांनीं प्रवासाची तयारी केली. बोवा निघाले, ते कऱ्हाड, औदुंबर, नरसोबाची वाडी, रहिमतपुर, कोल्हापुर, माहुली, वाई, धोम, महाबळेश्वर, इत्यादि ठिकाणें पाहून पंधरा दिवसांनीं परत आले. भालचंद्रबोवा जाऊन परत आणतील असा जो थोडा आशेचा किरण होता, तोहि बोवांच्या निष्फल परत येण्यानें नष्ट झाला. त्यामुळें या अभागी कुटुंबाच्या, विशेषतः सौ० गंगाबाई माता, व सौ० राधाबाई पत्नी, यांच्या शोकास पारावार नाहींसा झाला. राधाबाईंनीं तर अन्नत्याग केला. रहिमतपुराहून हरिबोवा आले, त्यांनींहि राधाबाईस शांत करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांचा शोक बिलकुल कमी होईना. हळूहळू दिवस, महिने, वर्षें, जात चाललीं, पण कृष्णाचा पत्ता लागेना. यामुळें हें कुटुंब फारच शोकग्रस्त झालें. दोन वर्षांनंतर राधाबाई माहेरीं गेल्या; रहिमतपुरकरबोवा यात्रेस जाणार होते, त्यांचेबरोबर राधाबाईंनींहि जावें व शक्य तितके उपाय करून कृष्णाचा तपास लावावा असें त्यांच्या सासरच्या व माहेरच्या मंडळींनीं ठरविलें. राधाबाई चुलत्याबरोबर यात्रेस निघाल्या. यात्रा हें त्यांचें ध्येय नसून पतिशोध हें त्यांचें साध्य होतें. प्रत्येक मुक्कामावर त्या स्त्री-पुरुषसमाजांत पतीचा शोध करीत असत. "प्रयाग, काशी, मथुरा, वृंदावन, गोकुळशाळा । धुंडिल्या अनेक वनशाळा ॥" याप्रमाणें तीर्थे-क्षेत्रें दोन वर्षेंपर्यंत उदंड धुंडून पाहिलीं. परंतु धन्याचा कोठेंच पत्ता लागला नाहीं. त्या निराश होऊन परत आल्या, तेव्हां तर घरची मंडळी फारच शोकमग्न झाली. तो प्रसंग वर्णन करणें कठिण आहे.

## जनापवाद

साध्वी राधाबाईचा काल फार कष्टमय जाऊं लागला. त्या कधीं साताऱ्यास तर कधीं रहिमतपुरास राहत असत. त्यांनीं व्रतें-वैकल्यें फार निश्चयानें केलीं. अश्वत्थास, मारुतीस व तुळशीस, ओलेत्यानें लक्ष घातले. अखंड नामस्मरण चालू

ठेवलें. वडिलांची सेवा, उपोषणें, जप, इत्यादि अखंडव्रत चालू ठेवलें. ही पतिभक्ति पाहून सर्वांस त्यांचेसंबंधीं आदर वाटूं लागला. याप्रमाणें १२ वर्षे निघून गेलीं. मग मात्र लोकनिंदेचे कठिण प्रसंग येऊं लागले. १२ वर्षे गेलेला इसम परत येत नाहीं, यावरून तो मृत झाला असावा अशी कल्पना करून, जनांकडून अपवाद येऊं लागले. राधाबाई अझून सुवासिनी आहे काय अशी उघड निंदा सुरू झाली; त्यामुळें कोठें हळदीकुंकवास तर काय, पण हौदावर पाण्यासहि उघडपणें जातां येईना. स्त्रीसमाजाकडून अशी विटंबना होऊं लागल्यामुळें पतिविरहाग्नीनें तप्त झालेलें मन अधिकच पेट घेत राहिलें. सासरच्या माणसांनीं मात्र बिलकुल दुखविलें नाहीं. उलट कृष्णा भगवद्भक्त आहे, त्याचेवर देवाचा अनुग्रह होऊन तुला सुखाचे दिवस येतील, असा तिला धीर देत. इतके जनापवाद येत होते तरी, राधाबाई पतिप्राप्तीस्तव परमात्म्याची प्रार्थना एकनिष्ठपणें करीत असत. त्यांच्या या तपश्चर्येस सोळा वर्षांनंतर उत्कृष्ट फल कसें आलें तें यथाक्रम समजेलच.

## ध्येयप्राप्ति

इकडे विष्णुदास माहुरास श्रीदत्तात्रेयाचें निद्रास्थान श्रीदेवदेवेश्वर येथें येऊन राहिल्याचें मागें सांगितलेंच आहे, तेथें मधुकरीवृत्तीवर निर्वाह करून जपतपादि कडकडीत अनुष्ठान सुरू केलें. त्यामुळें त्यांचें साध्य जें सगुण परमेश्वराचें दर्शन, तें त्यांना साध्य झालें. त्यांच्या चेहऱ्यावर तपश्चर्येचें तेज उत्पन्न झालें, व मनाची सगुण दर्शनाची तळमळ शांत झाली. मग त्यांना मातापितर, प्रेमळ पत्नी, इत्यादिकांची थोडी-थोडी आठवण व्हावयास लागली; पण इकडे ईशइच्छेनें निराळयाच व्यापांत गुंतले, व त्यामुळें त्यांचें माहूरलाच कायम वास्तव्य झालें तो प्रकार असा झाला कीं, माहूरचे पाटील. श्री० रेणुराव सरदेशमुख यांनीं बोवांचें सात्त्विक वर्तन, त्यांची चित्रकला, त्यांची कविता, इत्यादि पाहून बोवांवर त्यांची भक्ति बसली. त्याचें रूपांतर प्रेमांत इतकें झालें कीं, रेणुरावांनीं बोवांना आपले घरीं आदरानें आणून ठेवलें. रेणुराव हे फार शूर पुरुष होते. त्यांना वाघाच्या शिकारीचा फार नाद होता. एकदां ते असेच शिकारीस गेले असतां अचानकपणें व्याघ्रमुखांत सांपडून त्यांचा अंत झाला. त्यामुळें तर बोवांच्या अंगावर आपल्या प्रेमळ मित्राच्या संसाराचा सबंध भार पडला. रेणुरावांच्या कारभाराची व्यवस्था गुमास्ते-कारकुनांकडून चालविली.

## लोकप्रियता

श्रीसरस्वतीच्या प्रसादानें विष्णुदास शीघ्रकवि बनले. सहज स्फूर्तीनें अक्षरें मुखांतून निघावीं, त्यांचे प्रबंधच बनावे. त्यामुळें माहूरची सर्व मंडळी त्यांवर प्रेम करूं लागली. श्री. राजेसाहेब उदाराम जहागीरदार यांचे तर बोवांवर अतिशय प्रेम असे. तसेंच देवडींतील राजे कुंवरसिंग जहागीरदार यांनीं तर त्यांना प्रत्यक्ष गुरुच मानलें होतें. गांवांतील गृहस्थ, भिक्षुक, वगैरे सर्वांचीं अंतःकरणें बोवांकडे आकर्षित झालीं होतीं. त्यामुळें माहुरांतून सुटणें कठिण झालें. बोवांनीं घराकडे जाण्याची गोष्ट काढली, कीं मंडळींनीं डोळ्यांत अश्रु आणावे. मंडळींचें बोवांवर आत्यंतिक प्रेम जडल्यामुळें विष्णुदास माहुरासच कायम झाले. बोवांनीं माहुरास कांहीं नाटकेंहि रचलीं, व त्यांचे प्रयोगहि मंडळीकडून उत्तम रीतीनें करविले. त्यांना चित्रें काढण्याचा मोठा शौक होता त्यामुळेंहि त्यांच्या लोकप्रियतेंत भर पडली. त्यांच्या शीघ्रकवित्वामुळें हे कोणासहि तात्काळ बोध देत असत. त्यांनीं मुलें शिकवून तयार करण्यासाठीं शाळाहि घातली. मुलांकडून कांहींएक न घेतां अध्यापन करीत असत. त्यांच्या ठायीं वसत असलेली भक्ति व प्रेम पाहून माहूर-प्रांतांतील संतहि त्यांना मानीत असत.

प्रसिद्ध श्रीचिन्मयानंद. संस्थान उमरखेड, यांचे तीन शिष्य प्रसिद्ध आहेत. ( १ ) गोचर स्वामी, उमरखेड, ( २ ) तुकाराममहाराज येहळेगांवकर, व ( ३ ) रावसाहेब शेवाळकर, हे होत. एकदां रावसाहेबांची स्वारी माहुरास आली. त्यांनीं विष्णुदासकवींच्या भक्ति व प्रेम यांनीं ओथंबलेल्या कविता पाहून फार आनंद व्यक्त केला यावर रावसाहेबांनीं बोवांस पाचारण करून विचारलें कीं, आमचें म्हणणें मान्य कराल काय ! बोवांनीं सांगितलें कीं, आपण आज्ञा कराल ती मान्य. तेव्हां रावसाहेब बोवांस कडकडून भेटले व म्हणालें कीं, " मी तर तुमची कविता पाहून थक्कच झालों. तुमच्या भक्तिप्रेमानें ओथंबलेल्या कविता-सरितेचा ओघ यापुढें श्रीजगन्माता रेणुकेच्या स्तवनांत खर्च व्हावा. " विष्णु-दासांनीं रावसाहेबांच्या चरणीं मस्तक ठेवून म्हणणें मान्य केलें, व लागलीच जगन्मातेच्या स्तुतिपर पद करून रावसाहेबांस समर्पण केलें. याप्रमाणें माहूर व त्याच्या परिसरांतील भाग, यांतील सर्व मंडळींचें चित्त विष्णुदासांकडे वेधलें. भक्ति-प्रेमाचा ओलावा ज्यांच्या अंगीं नाहीं, त्यांनाहि ईश्वराकडे जाण्याचा मार्ग खुला दिसावा, या हेतूनें ते शृंगारपर लावण्या करीत असत. त्यांच्या लावण्या

म्हणण्यास फार उत्तम असत. कांहीं लावण्यांतून उत्तान शृंगार असेल, तर बऱ्याच लावण्या द्व्यर्थी आहेत. " जे कां विषयपर जन । न करितां लीलाश्रवण । त्यास शृंगाररस दावून । वेधी मन आपणाकडे ।। श्रीधर ।। विषयी जनांची वृत्ति प्रभूकडे लागावी, व संतसमागमाचा दुर्लभ लाभ त्यांना थोडा तरी व्हावा, या शुद्ध हेतूनें ते लावण्या करूं लागले व त्याचा उपयोगहि चांगला झाला. कांहीं नायकिणींनीं यांजकडून लावण्या तयार करून घेतल्या; व गाण्याचे बैठकीत ख्याल, गज्जल, इत्यादिकांऐवजीं विष्णुदास कवींच्या लावण्याच लोकांस फार प्रिय होऊं लागल्या. बहुजनसमाजाचें चित्त लावण्यामुळें विष्णुदासांकडे फार आकर्षित झालें. बोवांचा सहवास थोडा तरी व्हावा अशी इच्छा करून पुष्कळ लोक त्यांच्या दर्शनास येऊं लागले. कोणत्याहि वृत्तीचा मनुष्य असो, तो त्यांच्याजवळ आला व थोडा वेळ बोलणें झालें कीं तो शांत होत असे. त्यांचे ठिकाणीं आपपरभाव नसल्यामुळें सर्व दर्जाची मंडळी त्यांचे सहवासानें समाधान पावत असत. माहूरच्या भोंवतालच्या टापूंतील कित्येक लोक त्यांना आपल्या घरीं मोठ्या आदरानें बोलावीत असत आणि त्यांचें साधुत्व व कवित्व पाहून त्यांच्या सहवासांत आपणांस धन्य मानीत असत. याप्रमाणें काल व्यतीत होत असतां, पतिव्रता राधाबाईची तपश्चर्या उदयास येऊन तिचें फल पतिदर्शनांत कसें झालें, त्या कथानकाकडे वळूं.

## शोध लागला

सौ. राधाबाई लोकनिंदेचे वाग्बाण सोशीत कालक्रमण करीत होत्या. परमात्म्याची कृपा होण्यासाठीं नानाविध साधनें करीत होत्या. तरीहि त्यांचें उद्दिष्ट त्यांना प्राप्त होईना; पंधरा वर्षें याप्रमाणें व्यतीत झालीं, पतीचा समाचार देखील कळला नाहीं, तेव्हां त्या विव्हळ झाल्या व पतिवांचून जगणें वाईट म्हणून त्या मृत्यु मागूं लागल्या. कांहीं सात्त्विक मंडळी अद्यापहि त्यांना धीर देत असत. अशा दुःखमय स्थितींत असतां त्यांना पति भेटल्याचीं सुखस्वप्नें पडूं लागलीं. आतां आपणास आनंदाचे दिवस येणार, म्हणून त्यांच्या वृत्ति आनंदानें उत्तेजित होत असत. अशा संधानांतच रावजींचे जामात सदाशिव बाबाजी काळे जालना-परभणीकडे व्यापारासाठीं जावयास निघाले. हे सदोबा रावजींची मुलगी काशी इचे भ्रतार. यांचें घर साताऱ्यासच रावजींच्या घराजवळच होतें. यांचा सराफीचा धंदा असून नुकतीच आगगाडीची सोय झाल्यामुळें हे व्यापारासाठीं

लांबलांबचा प्रवास करूं लागले होते. परभणीस गेल्यावर सदोबांना विचार सुचला कीं, आपली कुलस्वामिनि मातापुरची रेणुका आहे. इतक्या दूर आलों तर थोडे श्रम घेऊन मातापुरास जावें. राधाबाईच्या पुण्याईचें फल म्हणूनच कीं काय सदोबांच्या मनांत हा संकल्प आला व ते ताबडतोब माहुरास गेले. उपाध्यायाच्या घरीं बिऱ्हाड ठेवलें. दुसरे दिवशीं मातृतीर्थावर क्षौरादि विधि करून कुलस्वामिनि जननीची भोगी पूजा केली. आतां उद्यां श्रीदत्तात्रेयाचें दर्शन घेऊन परत साताऱ्याकडे वळावें, असा त्यांचा विचार ठरला.

उपाध्यायाचे घरीं रात्रीं मुलें अभ्यासास बसलीं असतां त्यांचीं अक्षरें व त्यांचे कित्ते सदोबांच्या पाहण्यांत आले. अक्षर ओळखीसारखें दिसतांच ते म्हणाले, "बाळांनो, ह्या अक्षरांचें वळण साताऱ्याकडील आहे. तुम्हांस कोण शिकवीत आहे?" तेव्हां उपाध्याय म्हणाले, "आमच्या येथें साताऱ्याकडील बोवामहाराज आहेत, ते मुलांना शिकवतात. त्यांचें नांव विष्णुदास आहे." असें म्हणतांच सदोबांचा आनंद जिरून गेला. कारण, त्यांना कृष्णा नांवाचा इसम पाहिजे होता. तथापि बोवांची भेट करवण्याबद्दल उपाध्यायास सांगितलें, व दुसरे दिवशीं सदोबांनीं बोवांस पाहतांच हा कृष्णा म्हणून ओळखलें; पण विष्णुदासांनीं मात्र सदोबांस त्यांनीं क्षौर केल्यामुळें व बोवा व्यवसायांत असल्यामुळें ओळखलें नाहीं. सदोबांच्या विनंतीवरून बोवांनीं त्यांच्याबरोबर दुपारीं देवदर्शनार्थ पांडवलेण्याकडे जावयाचें कबूल केलें. त्याप्रमाणें उभयतां जावयास निघाले. वाटेंत सोनापीराजवळ दोघेहि विश्रांतीस बसले. आतां सदोबांना धीर धरवेना. ताबडतोब उठून विष्णुदासांच्या गळ्यांत मिठी मारून 'अरे कृष्णा' म्हणून हंबरडा फोडला. विष्णुदास क्षणभर विस्मित झाले. पण थोडयाच वेळांत हे आपले मेहुणे सदोबा आहेत, असें ओळखतांच आमचे वैराग्यसंपन्नबोवामहाराज यांनीं वैराग्य दूर फेकून देऊन मुक्तकंठानें किंकाळी फोडली, व सदोबांच्या अंगावर अंग टाकून पडले. दुःखाचा भर नेत्रांवाटे ओसरल्यावर उभयता मेहुणे बोलावयास लागले. "कृष्णा तूं हें काय केलेंस? घरीं काय प्रकार झाले असतील याची तुला कशी कल्पना आली नाहीं. मायबाप, बंधुभगिनी, साध्वी पतिनिष्ठ स्त्री, यांचा त्याग करून मोक्षप्राप्ति होईल अशी का तुझी खुळी कल्पना? तूं सर्वांचा अपराधी आहेस, जगदंबकृपेनें तूं मला भेटलास, आतां तुला बरोबर घेतल्याशिवाय जाणार नाहीं लक्षांत ठेव." इत्यादि

शब्द सदोबांनीं कांहीं रागानें, कांहीं प्रेमानें उच्चारले. विष्णुदासांनींहि त्यांचे पायांवर डोकें ठेवून माझे सर्व अन्याय क्षमा करा अशी विनंति केली.

माझे हातून मातृपितृसेवा तर झालीच नाहीं, परंतु मीं त्यांना दुःखांत मात्र लोटलें, असें म्हणून बोवांनीं मातृपितृविव्हळ होऊन रडावयास आरंभ केला. घरच्या मंडळींचें कुशलवृत्त सदोबांकडून ऐकून घेतल्यावर मनाचें किंचित् समाधान झालें. मग सदोबास बोवांनीं आठ दिवस ठेवून घेतलें. सदोबांनीं बोवांस तयारी करा म्हणून आग्रह केला, पण गांवची मंडळी बोवांस सोडीनात. श्री. राजेसाहेब उदाराम यांनीं सदोबांस सांगितलें कीं, बोवांकडील सातारच्या मंडळीसच इकडे पाठवून द्यावे; त्यांना कांहीं कमी पडणार नाहीं. बोवांचें मन साताऱ्याकडेस ओढ घेई. पण माहूरच्या मंडळींचे प्रेमपाश गळ्याशीं घट्ट बसले होते ते तुटेनात. सदोबांनीं निर्वाणीचें विचारतांच, "मी श्रीदत्तात्रेय आणि जगन्माता रेणुका यांचीं पावलें सोडून जाऊं इच्छीत नाहीं, तथापि येती बरसात संपल्यानंतर येईन, असें बोवांनीं सांगितलें व सदोबांबरोबर वडिलांना गौरवपूर्ण पत्र पाठविलें. सदोबा परत साताऱ्यास यावयास निघाले.

## सुवार्ता

तिकडे राधाबाईस रहिमतपुरीं विठ्ठलानें प्रसन्न होऊन पतिप्राप्तीचा दृष्टान्त दिला, व राधाबाई साताऱ्यास सासरीं आल्या. सदोबा साताऱ्यास येतांच प्रथम रावजींच्या घराकडे वळले. आणि रस्त्यांतूनच "तुमचा कृष्णा सांपडला" असें मोठ्यानें ओरडून सांगितलें. ही अमृतमय वाणी कानीं पडतांच रावजींच्या घरच्या एकूणएक माणसाच्या शरीरांत नवीन चैतन्य आल्यासारखें झालें. मातापिता व पत्नी यांच्या नेत्रांतून घळघळा प्रेमाश्रु वाहूं लागले. सदोबा घरांत आल्यावर सारी मंडळी त्यांच्याभोंवतीं जमली. मग त्यांनीं विष्णुदासांचें पत्र रावजींना दिलें व कृष्णाची साद्यंत हकीकत त्यांनीं मंडळीस निवेदन केली. पत्रांत लिहिल्याप्रमाणें एवढा मोठा परिवार घेऊन माहुरास जाणें रावजींस अशक्य होतें; म्हणून कांहीं दिवसांनीं कृष्णास घेऊन यावयास विष्णुपंतास माहुरास पाठविलें. ते तेथें १५ दिवस राहिले व थोड्या दिवसांत साताऱ्यास येईन असें विष्णुदासांनीं त्यांस कबूल केल्यावर ते परत माघारे आले.

## पतिदर्शन

बरेच दिवस झाले तरी कृष्णा येत नाहीं असें पाहून सौ. राधाबाई व त्यांचे-

बरोबर अनंतरावांनीं माहुरास जावें, व कृष्णास युक्तिप्रयुक्तीनें घेऊन यावें, असा विचार ठरला. या वेळीं अनंतरावास १३ वें वर्ष लागलें होतें. राधाबाईनीं शके १८०० चा पावसाळा संपल्यावर माहुरास प्रयाण केलें. सातारा ते पुणें बैलगाडीचा प्रवास, पुण्याहून वऱ्हाडांत अकोल्यापर्यंत आगगाडीचा प्रवास, आणि अकोल्याहून माहूरपर्यंत ६० कोस परत बैलगाडीचा प्रवास, याप्रमाणें कष्टतर प्रवास झाला. तथापि राधाबाईस अनंतजन्मांचें सार्थक झाल्यामुळें त्याचें कांहींच वाटलें नाही. पतिदर्शन होतांच राधाबाईनीं पतिचरणांस घट्ट मिठी मारली व अतिशय प्रेमाश्रु गाळले. बाईच्या १६ वर्षांच्या खडतर तपश्चर्येचें फळ म्हणूनच पतीशीं पुनर्मीलन झालें. कै० रेणुरावांच्या वाड्यांतच बोवांचा प्रपंच सुरू झाला. राधाबाईच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. त्या पतिव्रताधर्मानें पतिसेवा, व कुटुंबधर्मा-प्रमाणें प्रपंचांतील कार्यें करूं लागल्या. अनंतरावहि त्यांच्याजवळच राहूं लागले.

## अनंतराव

विष्णुदासांच्या चरित्राशीं अनंतरावांचें चरित्र बरेंच निगडित आहे. विष्णु-दासांनीं सातारा सोडल्यावर अनंतरावांचा जन्म झाला होता. माहुरास आल्यावर अनंतरावांचें वास्तव्य माहुरास १२ वर्षें झालें. या बारा वर्षांत बोवामहाराजांच्या प्रपंचाचा जमहि चांगला बसला होता. अनंतरावांस थोडी योगाची माहिती बोवांनीं सांगितली. सहा वर्षें अनंतरावांनीं आपल्या दादाजवळ बराच अभ्यास केला, नंतर तेथें शाळा घालून अनंतराव विद्यार्थ्यांना विद्यादान करूं लागले. त्यांचा विद्यार्थिवर्ग हल्लीं विद्यमान आहे. श्री. जगजीवनराव बाबासाहेब, राजे उदाराम जहागीरदार, यांना अनंतरावांनीं शिकविलें. अनंतराव आल्यावर बोवांचा पत्र-व्यवहार साताऱ्यास होत असे. साताऱ्याच्या प्रत्येक पत्रांत आपण एकवार येऊन जावें, आम्ही आतां वृद्ध झालों आहोंत, काळाचा भरंवसा लागत नाहीं, असा मजकूर असावयाचा. परंतु बोवांच्या अधिकाधिक लोकप्रियतेमुळें साताऱ्यास जाण्याचा योग जमला नाहीं.

## घराची वाताहत

सातारा येथील मंडळी कृष्णाची वाट पाहून थकली. आतां या जन्मांत कृष्णाची भेट होणें शक्य नाहीं म्हणून स्वस्थ बसली. अनंता गेला तोहि दोन वर्षें झालीं परत येत नाहीं; म्हणून रावजींनीं शके १८०२ मध्यें विष्णुपंतांस माहुरास पाठविलें. त्यांनाहि बोवांनीं एक महिनाभर ठेवून क्षेमसमाचाराचें पत्र देऊन वाटेस

लावलें. कृष्णाची परत येण्याची आशा सर्वस्वीं नष्ट झाली. अनंताहि परत आला नाहीं. तेव्हां, निराश होऊन रावजी व भालचंद्र संसाराचा गाडा कसा तरी रेटीत होते. शके १८०५ भाद्रपद वद्य १२ ला भालचंद्रबोवांनीं इहलोकची यात्रा संपवली; व लागलीच एक महिन्यानें रावजींनीहि आश्विन वद्य १२ रोजीं स्वर्गलोकीं गमन केलें. दोघेहि बंधु एका महिन्यांत गेल्यामुळें प्रपंचाचा भार एकट्या विष्णुपंतांवर पडला. त्या वेळीं त्यांचें वय २३ वर्षांचें होतें. त्यांचें लग्न मंगळवार पेठेंतील सावळाराम चरेगांवकर यांच्या मुलीशीं झालें होतें. सावळारामाचे बंधु अनंत बाबाजी चरेगांवकर हे वऱ्हाडांत शिक्षक म्हणून गेले होते. ते यवतमाळ जिल्ह्यांत जवळे येथें स्थायिक झाले; त्यांचीं ४ मुलें हल्लीं येथें इस्टेट करून आहेत.

विष्णुपंतांनीं घरीं राहून भिक्षुकी करण्याचें नाकारलें, व वऱ्हाडांत अमरावतीस त्यांना शिक्षकाची नौकरी लागली. आतां घरीं फक्त गणपतराव राहिले, त्यांचें लग्न झालें नव्हतें; तथापि त्यांनाहि पोटाचा व्यवसाय पाहण्यासाठीं घर सोडावें लागलें. त्यांची मातुश्री गंगाबाई आतां एकटीच राहिली, तिनेंहि हताश होऊन घर सोडलें व आपल्या मुलीच्या येथें राहूं लागली. याप्रमाणें पंचवीस माणसांनीं गजबजलेल्या घराची वाताहत होऊन घरास कुलूप लागलें तें कायमचेंच !

माहुरास अनंतरावांनीं शाळा सोडून कांहीं दिवस श्रीदत्त-शिखरावर नोकरी केली. नंतर कांहीं दिवस करोडगिरी ( दस्तुरी ) खात्यांत नोकरी केली. अखेर ते १८१२ ला परत सातार्‍यास आले. त्यांचें अक्षर चांगलें असल्यामुळें त्यांनीं सातार्‍यास वृत्तसुधा, बोधसुधाकर छापखान्यांत लेखकाची नौकरी केली; मग पुण्यास येऊन प्रथम 'चित्रशाळेंत' व नंतर 'मनोवेधक चित्रकला छापखान्यांत' नोकरी केली. हे चित्रें फार उत्तम काढीत असत. पुण्यास आल्यावर त्यांनीं आपल्या मातुश्रीसहि तेथें आणलें. गंगाबाईनीं तेथें शके १८१३ मार्गशीर्ष शुद्ध ४ रोजीं देह ठेवला. मातुश्रींचें और्ध्वदेहिक अनंतरावांनीं धोमक्षेत्रीं केलें. विष्णुपंत व गणपतरावहि तेथें गेले. नंतर अनंतराव पुण्यास, विष्णुपंत नागपुरास, व गणपतराव स्वतंत्र धंद्यासाठीं निघून गेले. विष्णुपंतांस पुत्र झाला नाहीं. त्यांना पांच मुलीच झाल्या. त्यांची पत्नीहि वारली; गणपतराव व अनंतराव ब्रह्मचारीच राहिले; अर्थात् या घराण्यांत पुत्रसंततीकडून वंश खुटला. सातार्‍यांतील घर अर्थात् तेथें कोणीच न राहिल्यामुळें पडलें व आतां घराची जागा मात्र अवशेष राहिली आहे !

## प्रपंच

इकडे विष्णुदासबोवांना मातुश्रींचें वर्तमान ऐकून अत्यंत खेद झाला व आतां साताऱ्यास जाण्याचा विचारसुद्धां बंद पडला. मातृसेवा घडली नाहीं याबद्दल त्यांचें अंतःकरण सारखें तडफडत असे; व या आपल्या पापाचा क्षय होण्यासाठींच जगन्माता रेणुकामायची प्रेमपुरस्सर भक्ति अंगिकारली. ( अशा अर्थाचें सुंदर पत्र त्यांच्या हातचें उपलब्ध झालें आहे. पत्र फार महत्त्वाचें आहे. ) बोवांचा प्रपंच उत्तम चालला होता. त्यांचेविषयीं ते जेथें होते तेथें फार आदर होता. पण त्यांच्या पत्नीस फार कष्ट करावे लागत. त्यांत त्या गरोदर राहिल्या. काबाड-कष्टांमुळें त्या अत्यंत क्षीण झाल्या. तथापि बोवांचें लक्ष तिकडेस नव्हतें. शेवटीं नऊ महिने भरण्याची वेळ आली. तितक्यांत विष्णुपंत तेथें आले, व त्यांनीं बोवांस निक्षून सांगून कै० गोविंदराव चांभार यांच्या घरीं निराळें बिऱ्हाड करविलें. गोविंदरावांची पत्नी सौ. यमुनाबाई यांनीं राधाबाईचें बाळंतपण व्यवस्थित केलें; पण संतति अल्पायु झाली. स्वतंत्र प्रपंच थाटल्यावर बोवांचा प्रपंच सुरळीत चालला होता. गृहस्थाश्रमांतील सर्व व्यवहार आश्रमधर्माप्रमाणें चालले होते. नित्य पंचमहायज्ञ, अतिथींस अन्नदान, भजन वगैरे सर्व यथास्थित होतें; राधाबाई सुगृहिणी होत्या. जें अन्न पतीस तेंच अतिथीस; एवंच, बोवांचा प्रपंच " दैवें कंटकवनीं लाभली कल्पद्रुमवल्ली " याप्रमाणें आनंदमय असा थाटला होता. राधाबाईची पतिभक्ति पाहून ग्रामवासी लोक आश्चर्यानें थक्क होत असत. गांवातील लोक आदरानें त्यांना मायबाई म्हणत.

## पत्नीनिधन

तथापि संसार हा क्षणभंगुर असावयाचा. सुखाची घडी क्षणमात्रच लाभावयाची. बोवांचा थाटलेला संसार शेवटीं बुद्‌बुद्‌वतच ठरला. साध्वी पतिव्रता राधाबाईनीं शके १८१४ ज्येष्ठ शु॥ २ रोजी नामस्मरण करीत पतिपरमात्म्यासन्निध जड कलेवराचा त्याग केला. पत्नीच्या निधनानें वैराग्यशील बोवांनाहि धक्का बसल्यावांचून राहिला नाहीं. त्यांना " वाटे सुखसिंधूच्या बुडाली अर्धेमधें होडी " असें वाटलें. पत्नीनिधनानंतर " कामिनिवांचून काय करावें उजाड सदनासी निघुनी जावें अरण्यासी ॥ " अशी बोवांच्या मनाची स्थिति झाली, व " काय करावें उत्तम कनकांबरधनधान्यासी । टाकुनी व्हावें संन्यासी ॥ " याप्रमाणें मनाचा निश्चय बोवांनीं केला, व संसाराचें सत्पात्रीं दान केलें. ज्याला जी वस्तु योग्य त्याला

ती समर्पण करून आपण स्वत: लंगोटी लावली व लिंबाचा पाला भक्षण करून राहिले. बोवांनीं आत्मचरित्रपर पोवाड्यांत " सुगंधपुष्पांसहित पसरला वेल जाईचा । पोवाडा राधाबाईचा ॥ विष्णुकवींची घांट वाजली । सुटली रेल गाडी ॥ " या शेवटच्या ओळींत म्हटल्याप्रमाणें प्रपंचाचा निरास झाला व बोवांचें प्रापंचिक चरित्र संपलें.

## कवित्व

संसारबंधनांतून मुक्त झाल्यावर बोवांना व्यावहारिक पाश कांहीच राहला नाहीं. उरलेलें आयुष्य श्रीजगदंबाचिंतनांत खर्चण्याचा निश्चय केला, व ते माहूरच्या आसपास राहूं लागले. महागांव [ पुसद तालुका ] येथें त्यांचें वास्तव्य फार होतें. तेथील मडके यांचे घराण्याशीं त्यांचा फार घरोबा होता. महाराजांचे कृपादृष्टीमुळें व आशीर्वादानें ह्या मंडळीचें कल्याण झालें आहे. रावसाहेब शेवाळकरमहाराजांनीं बोवांस श्रीजगदंबेवर कविता करावयास सांगितली, तें त्यांनीं कबूल केलें होतें; व वैराग्यवृत्ति धारण केल्यावर श्रीदेवी रेणुकेवर पद्यरचना बरीच केली, ती भक्तिवात्सल्यरसानें ओतप्रोत भरलेली आहे. पत्निनिधनानंतर बोवांनीं " आई खरेंच गे । जें केलेंस तें बरेंच गे ॥ " म्हणून देवीची स्तुति केली आहे, ती फार करुणारसपूर्ण आहे. श्रीविष्णुदास कवींच्या कवितेस साहित्यशास्त्राची कसोटी पूर्णपणें लागणार नाहीं, कारण ते व्युत्पन्न नव्हते. तथापि त्यांच्या कवितेकडे पाहिल्यास आपणांस अगदीं उघड दिसेल कीं, बोवांची कविता महाराष्ट्रांतील इतर संत-कवींच्या कवितेशीं तुलना करून पाहिली असतां तिळमात्रहि कमी प्रतीची भासणार नाहीं. महाराष्ट्रांतील संत-कवींप्रमाणेंच विष्णुदासबोवा हे प्रथम भगवद्भक्त अथवा संत आणि नंतर कवि होते. त्यांची कविता येथून तेथून प्रेमपर असून त्यांत प्रेमळ भक्ति ओतप्रोत भरली आहे; ती इतकी कीं जणूं कवि प्रत्यक्ष देवतेशीं बोलतच आहे असा भास होतो. यांच्या प्रेमपूर्ण कविता किती तरी सांपडतील. पदें, आरत्या, अष्टकादिकांतुन प्रेमभक्तिभावानें रेणुकामातेस आणि इतर देवतांस आळवलेले असे पुष्कळ बहारीचे प्रसंग आहेत. " रेणुके मजला मुळ धाडी । आतां या दुःखांतुनि काढी ", " आई तुझ्या मी दर्शनासि योग्य नाहीं का ? ", " कधीं भेटशील आई जगदंबे खचित सांग तूं मला " इत्यादि किती तरी प्रसंग दाखवतां येतील. भक्तिप्रेमामध्यें दंग होऊन विष्णुदासबोवा माहूरच्या आसपास फिरत होते. आई रेणुका आणि श्रीदत्तात्रेय या तीर्थीसें

सोडून दुसरीकडे कोठेंच जाण्याची त्यांना इच्छा झाली नाहीं. ह. भ. प. नारायणबोवा दुसखेडकर ( खानदेश ) हे बोवांचे जिवलग मित्र होते. त्यांच्याबरोबर एकदां बोवा आपल्या आवडत्या जगदंबेच्या तसबिरीसह रेल्वेनें त्यांचे गांवीं गेले होते, त्या वेळीं 'रेलगाडींत बसुनि चाल' हें पद केलें. एका शास्त्र्यानें त्यांना काशीस जाण्यास नेलें, पण ते १२ कोसांवरून परत आले. माहूरच्या आसपास बोवा अनेक लोकांस आपल्या रसाळ वाणीनें भक्तिसुखामृत पाजीत असत. कांहीं दिवस लिंबाचा पाला भक्षण करून व मौनव्रत करूनहि असत. महागांव येथें शके १८१९ च्या नवरात्रांत विष्णुदासबोवांनी उमरखेडचे वे. शा. सं. नानाशास्त्री अयाचित [ वे. शा. सं. दासंभट अयाचित यांचे वडील ] याजकडून, रेणुकामाहात्म्य व काशीखंड श्रवण केलें, व त्यांस " विपुल दयाघन गर्जे " ही आरती व इंदिरेची तसबीर प्रसाद म्हणून दिली.

## चतुर्थाश्रम

बोवांचा कीर्तिपरिमल सर्वत्र पसरला होता. कुबेरचे जहागीरदार श्रीमंत बाबासाहेब यांनीं कुबेरास मोठा यज्ञ केला होता; त्या वेळीं बोवांस मोठ्या आदरानें बोलावून नेलें. विष्णुदासबोवांनीं चतुर्थाश्रम घेण्याची इच्छा दर्शवली तेव्हां बाबासाहेबांनीं सर्व सिद्धता केली. उमरखेड येथील श्रीचिन्मयानंद संस्थानचे अधिपति श्री. प. प नित्यानंदसरस्वति स्वामीमहाराज यांनीं विष्णुदास कवींना चतुर्थाश्रम दिला, व त्यांचे श्रीपुरुषोत्तमानंदसरस्वति असें नांव ठेवलें. याप्रमाणें सातारचा कृष्णा, माहूरचे विष्णुदासबोवा, आतां पुरुषोत्तमानंदस्वामीमहाराज झाले. ही गोष्ट शके १८२३ प्लवनामसंवत्सरे माघ शु० १० दिवशीं घडली.

चतुर्थाश्रम घेण्यापूर्वीच महाराजांजवळ शिष्यसमुदाय रहात असे. संन्यासवृत्ति धारण केल्यावरहि लोकसंग्रहासाठीं स्वामीमहाराजांनीं कर्मयोगाचें आचरण सुरू ठेवलें व अयाचित वृत्ति स्वीकारून लोककल्याणाकरितां शिष्यसमुदायासह आश्रम चालविला. श्रीदत्तशिखराचे दक्षिणेस श्रीअनसूया माईचे पूर्वेस गडाखालीं काळेंपाणी या नांवाचें एक सुंदर तीर्थ आहे. त्या तीर्थावर झोपडी बांधून स्वामीजींची स्वारी बरेच दिवस सशिष्य राहिली होती. एका जागेचा अभिमान उत्पन्न होऊं नये व अंगांत शक्ति आहे तोंवर तीर्थारण्यवास घडावा म्हणून स्वामी ठिकठिकाणीं हिंडत आणि लोकांना भगवद्धर्माचा मार्ग दाखवून स्वधर्माचा उपदेश करीत. अस्पृश्यांतील लोकहि त्यांनीं भक्तिमार्गास लावले.

मुसलमानांचाहि त्यांनीं अनादर केला नाहीं. त्यामुळें सर्व समाजांत त्यांचे-विषयीं आदर होता. शके १८२८ च्या आरंभीं स्वामीमहाराज उनकेश्वरीं येऊन राहिले. येथें शरभंग ऋषीचा आश्रम होता. शरभंगाचा ताप दूर होण्यासाठीं श्रीरामचंद्रांनीं येथें उष्ण पाणी काढून दिलें, त्याचीं कुंडें हल्लींहि आहेत. अशा पवित्र ठिकाणीं कांहीं काल काढला. श्री. व्यंकटराव देशपांडे, सिंदखेडकर, ह्यांनीं त्यांची व्यवस्था उत्तम ठेवली होती. येथें त्यांचेजवळ खंडेराव, दत्तोपंत, हरी-दास, सुंदरगीर, रानडे व आणखी तीन इसम कायमचे होते. नित्य पुष्कळ मंडळी दर्शनास येत. येथेंच वे. शा. सं. नरहरशास्त्री खरशीकर [ स्वामीमहाराजांचे भाचे, प्रस्तुत मूळ विस्तृत चरित्राचे लेखक ] यांना प्रथम आपल्या कुटुंबांतील मंडळींसह स्वामीमहाराजांचें दर्शन झालें; व शके १८२८ आषाढ शु० २ ला त्यांस स्वामीमहाराजांनीं उपदेश दिला.

## आश्रमवास

मातापुर क्षेत्राच्या पंचक्रोशींत उत्तरद्वार म्हणून पैनगंगेच्या तीरावर वऱ्हाडांत श्रीसिद्धेश्वर हें सिद्धस्थान अरण्यांत आहे. तेथें शके १८२८ च्या मार्गशीर्ष-मासांत रहाण्यास गेले, व तेथें झोपड्या बांधून एक वर्ष शिष्यगणासह कालक्रमणा केली. संन्यासाश्रम घेतल्यावर स्वामीमहाराजांनीं कविता फारशी केली नाहीं. कालमानाप्रमाणें शरीर दिवसेंदिवस जरेनें व्याप्त होऊं लागलें व अखेरची वेळ जननीच्या चरणीं साधावी हा हेतु मनांत धरून माहुरास रहाण्याचा मनोदय श्री. बाबासाहेब उदाराम राजे यांस कळवला; व शके १८२९ चे पौषमासांत सिद्धेश्वर क्षेत्र सोडून स्वामीमहाराज माहुरास आले. झोपड्या तयार नव्हत्या म्हणून स्वामीमहाराज कांहीं दिवस माहुरास वे. शा. सं. भाऊदेव यांचे घरीं राहिले. मातृतीर्थाच्या अलीकडे डाव्या बाजूस श्रीरेणुकेच्या चरणां-जवळ स्वामीमहाराजांनीं आश्रमासाठीं जागा पसंत केली. श्री. बाबासाहेब राजे उदाराम यांनीं त्या ठिकाणीं अत्यानंदानें झोपड्या बांधवल्या. झाडी तोडून तेथें फुलझाडें लावलीं. आश्रमांत रामतीर्थ या नांवाची सुंदर बांधलेली पुरातन विहीर आहे. स्वामीमहाराज आश्रमांत येऊन राहिल्यावर आश्रम फार उत्तम रीतीनें तयार झाला. आश्रमांत जातांच तितापानें तापलेला जीव क्षणभर तेथील देखावा पाहून शांत होतो, कण्वाश्रम, अत्र्याश्रम, भारद्वाजाश्रम, वासिष्ठाश्रम इत्यादि आश्रमांसारखाच हा आश्रम शांतिदायक वाटतो. येथें ध्यानधारणा, भजन-

पूजनादि नित्यकर्में, अन्नसतर्पण, वगैरे फार उत्तम होऊं लागलें. गडाखालील मंडळींनीं मठासाठीं दरसाल धान्य देण्याचें ठरविलें. गांवांत रोज मधुकरी मागण्याचा क्रम सुरू झाला. श्रीदत्तशिखरचे महंत श्रीदत्तराम भारथीमहाराज यांचा आश्रय मठास आरंभीं चांगला होता. कांहीं दिवस रोज चार मनुष्यांचा शिधा देत असत. नंतर कांहीं दिवस दोन मनुष्यांचा देऊं लागले; व मठास ठिकाठिकाणाहून धान्य येत असून आतां तारांबळ नाहीं असें पाहिलें तेव्हां रोजचा शिधा बंद केला; तथापि अडी-अडचणीच्या वेळीं श्रीदत्तशिखरच्या महंत महाराजांकडून मदत येत असते.

## श्रीगुरुदासमामा

पुण्यास अनंतराव छापखान्यांत नोकरीवर असत. दिवसां लेखनाचें काम व रात्रीं चित्रकलेचें काम, असा दुहेरी उद्योग करून त्यांची प्रकृति बिघडली, तेव्हां नौकरी सोडून त्यांना घोमास आपली बहीण सौ. भीमाबाई यांचेकडे यावें लागलें. तेथें बारा वर्षें राहून जपतपादि अनुष्ठान, व ध्यानयोग करूं लागले. घोमास कृष्णंभटजी म्हणून एक तपस्वी होते, ते यांचे गुरु होत. हे शके १८२८ चे कार्तिकांत पंढरपुरास गेले, व तेथून ह. भ. प. नारायणबोवा दुसखेडकर यांचे-बरोबर माहुरास आले. ते विष्णुदासबोवांना सिद्धेश्वरच्या मुक्कामांत भेटले; तेव्हांपासून शेवटपर्यंत अनंतराव माहूरच्या आश्रमांत होते. अनंतरावांचा ध्यानयोग फार अप्रतिम असे. त्यांची शरीरयष्टि अशक्त असल्यामुळें सहजच ते स्वस्थ बसून ध्यानयोगास लागले. त्यांना आश्रमांत स्वतंत्र झोपडी बांधून दिली होती. अनंतराव यांना गुरुदास असें म्हणत असत. हेहि उत्तम कविता करीत असत. त्यांची कविता ज्ञानपर, व उपदेशपर आहे. त्यांचे ध्यानयोगांत तयार झालेलें वाङ्मय फार उच्च दर्जाचें आहे. याप्रमाणें श्रीविष्णुदास ऊर्फ पुरुषोत्तमानंद-सरस्वति आणि श्रीगुरुदासमहाराज या उभयतां सत्पुरुषबंधूंनीं आश्रमवास स्वीकारून लोकांना भक्तिद्वारा ज्ञानामृत पाजण्याचा उपक्रम सुरू केला.

## मठांतील दिनचर्या

दिवसेंदिवस मठाचा उत्कर्षच होत गेला. अनेक लोकांना अन्नदान, व ज्ञान-दान होत असल्यामुळें पुष्कळ लोकांचें लक्ष मठाकडे वेधलें. स्वामीमहाराज दिवस-रात्री मिळून सरासरी तीन-चार तास झोप घेत असत. त्यांचा नित्यक्रम

असा होताः— पहांटेस ४ वाजतां उठून श्रीजगदंबेचें ध्यान व काकडार्ति करावी, नंतर शौचमुखमार्जनादि करून नमस्कार घालावेत. नंतर कांहीं ग्रंथवाचन, स्नान-संध्या, व नंतर तास-अर्धा तास बाहेर बसून सर्वांना उपदेशपर विवरण व्हावयाचें; " सहज बोलणें हित उपदेश " या उक्तीप्रमाणें सहज संभाषणानें परमार्थाची समजूत उघडपणें देत असत. नंतर श्रींची पूजा, अल्पाहार व थोडी निद्रा घेत असत. तिसरे प्रहरीं अध्यात्मग्रंथाचें वाचन, सायंकाळीं संध्येनंतर धूपारती व नंतर पुन्हा सकाळप्रमाणें बाहेर बसून रसाळ वाणीनें उपदेशामृत पाजीत. नंतर सर्व मंडळीसह बसून आरती व भजन फार प्रेमानें करीत. त्या वेळीं उच्च दर्जाचें प्रेमसुख मिळत असे. अशी दिनचर्या असे. स्वामीमहाराजांच्या वाक्सुधेचा लाभ घ्यावयास दूरदूरचे अनेक लोक येत असत, त्यामुळें स्वामींचा शिष्यवर्ग वाढूं लागला. मोर्शी येथील श्री० केशवराव नानासाहेब अमीन वकिलांसारख्या सुशिक्षितापासून अगदीं सामान्य स्त्री-शूद्रापर्यंतहि अनेक मंडळी यांच्या शिष्य-वृंदांत आहेत. मठांत मोठमोठे साधुसंत येऊं लागले व वऱ्हाड मोगलाईतील सरकारी अधिकारीहि महाराजांच्या दर्शनास येत असत. इतिहासप्रसिद्ध रायबागीण इच्या वंशांतील श्री० बाबासाहेब राजे उदाराम आणि त्यांचे कनिष्ठ बंधु नानासाहेब व पुत्र भाऊसाहेब यांचेठायीं उभयतां महाराजांविषयीं भक्ति व आदर आहे, व अद्यापहि हा आश्रम आपलाच आहे अशी त्यांची भावना कायम असून मठास सर्वतोपरी त्यांचाच आश्रय आहे. जगन्माता रेणुकेची व श्रीसद्-गुरुनाथांची त्यांवर पूर्ण कृपा आहे.

सुप्रसिद्ध दत्तावतारी श्रीवासुदेवानंदसरस्वति स्वामींचा मुक्काम आश्रमांत तीन दिवस होता. रात्रीं दोघेहि स्वामी फार वेळ एकांतांत बसत असत. आश्रमांत साधुसंतांनीं यावें व आम्हांस दर्शन देऊन कृतार्थ करावें, ह्यासाठींच आम्ही वृद्धापकाळीं माउलींचे सन्निध राहिलों असें ते वारंवार म्हणत.

## स्वकीयमंडळी

पूर्वाश्रमीचे बंधु विष्णुपंत आश्रमांत दोन वेळ आले होते. धाकटे बंधु गणपत-राव तर निम्मा काल इकडे घालवतात. सदोबा काळ्यांचे चिरंजीव नारायणराव व त्यांचे पुत्र रामभाऊ व गोविंदराव हे महाराजांचे शिष्य आहेत. धोमच्या बहिणीचे चिरंजीव अप्पा, थोरली बहीण यशोदा इची मुलगी गं० चंद्राबाई, यांनाहि त्यांचा उपदेश आहे. आपल्या आप्तमंडळीपैकीं कोणी तरी निवृत्तमार्गी

होऊन आश्रमाचें कार्य पुढें चालवावें अशी महाराजांची इच्छा होती, पण ती फलद्रूप झाली नाहीं. स्वामीमहाराजांचे पट्टशिष्य खंडेराव, हरीदास, दत्तोपंत व सुंदरगीर होते. पैकीं दत्तोपंत मठाचे कार्यासाठीं बाहेर पडले ते परत आले नाहींत. खंडेराव व सुंदरगीर हे महाराजांची एकनिष्ठ सेवा करीत. हरीदास कांहीं दिवस महागांवीं रहात. श्रीगुरुभक्त अंबादासपंत [ अंबादास माणिकराव अनसिंगकर, दिग्रस ] हे महाराजांचे आज्ञेनें श्री० उदाराम राजे यांचेकडेस नोकरीस राहिले. यांनीं मठ चालवावा असें बहुतेक ठरलें होतें, परंतु त्यांची पत्नी वारल्यानंतर ते दिग्रसला राहूं लागले. सुंदरगीर हे गोसावी आहेत. यांची जन्मभाषा हिंदी आहे. यांना चांगलें मराठी बोलतां येत नाहीं. यांनीं शके १८२६ सालीं महाराजांजवळ येऊन उपदेश घेतला, व गुरुसेवेंत तनमनधन खर्च केलें. त्यांच्या निस्सीम भक्तीमुळें यांच्यावर गुरुकृपा झाली. यांजवर शिक्षणाचा कांहींहि संस्कार नसतां केवळ गुरुकृपेनें मराठींत अभंग, पदें करूं लागले. यांची कविता गुरुस्तुतिपर आहे. महाराजांचे अनेक शिष्य त्यांच्या आज्ञेनुसार भक्तिपंथ वाढवीत आहेत, व कांहीं गृहस्थधर्मानें आहेत. तथापि त्या सर्वांवर महाराजांची कृपा समान असे.

## व्यवस्था

शके १८३८ च्या पौषमासीं वे. शा. सं. नरहरशास्त्री यांस दृष्टान्त झाला कीं, " आम्ही एक वर्षाचे आंत समाधि घेणार आहोंत तरी येऊन जावें. " तेव्हां ते प्लेग इत्यादि आपत्तींकडे लक्ष न देतां हैदराबाद मार्गानें श्री० रामचंद्रमहाराज यांचेसह भाद्रपद व॥ ३० ला माहुरास पोंहोचले. पहातात तों स्वामीमहाराज यांनीं मौन धारण केलें होतें. तथापि नरहरशास्त्री खरशीकरांच्या आगमनामुळें महाराजांनीं मौन सोडून बोलावयास आरंभ केला; त्यामुळें सर्वांस आनंद झाला. त्यानंतर खरशीकर आणि गुरुदास या उभयतांनीं स्वामीमहाराजांस विनंति केली कीं, आपले पश्चात् आश्रमाची कशी काय व्यवस्था करावयाची ? तेव्हां स्वामीमहाराजांनीं सुचविलें कीं, उभयतां तुम्हांस योग्य वाटेल तशी व्यवस्था करावी. नंतर उभयतांनीं विचार करून स्वामीमहाराजांचे पश्चात् मठाची व्यवस्था कशी करावयाची याबद्दल व्यवस्थापत्र लिहून स्वामींपुढें ठेविलें. तें वाचून स्वामीमहाराजांनीं आनंदानें त्यावर सही केली. महाराजांचा आशीर्वाद घेऊन अत्यंत कष्टानें खरशीकरांनीं निरोप घेतला. हे नरहरशास्त्री जोशी मुंबईस

असतांना पौष शु॥ ७ ला दिग्रसहून अंबादासपंतांची तार आली कीं, महाराज आजारी आहेत लवकर यावें. त्याप्रमाणें ते ताबडतोब निघाले; परंतु वाटेंतच श्रीस्वामीमहाराज समाधिस्थ झाल्याचें त्यांना कळलें. गुरुमहाराजांचें दर्शन न झाल्यामुळें त्यांना फार हळहळ वाटली.

## समाधि

पौष शु॥ प्रतिपदेपासूनच स्वामीमहाराजांची प्रकृति क्षीण होऊं लागली. त्यांना आजार बिलकूल नव्हता. नंतर खंडेराव सच्छिष्यास चतुर्थाश्रम देऊन मठाधिकारी केलें. पूर्वींच ठरवल्याप्रमाणें आश्रमाचे मध्यभागीं समाधीची जागा बांधून तयार केली होती. पौष शु॥ ७ शनिवारीं रात्रीं महाराजांनीं सिद्धासन घातलें, व मुखानें सतत ॐ काराच्या जपास सुरुवात केली. गुरुदासमहाराज, सर्व शिष्यमंडळी, श्री० बाबासाहेब उदाराम व गांवांतील पुष्कळ मंडळी, जवळ बसून होती. महाराजांचे शब्द बाहेर फुटेनात, तरी हलकेहलके जप सुरूच होता. अखेर पौष शु॥ ८ शके १८३९ रविवारीं पहांटे ४ वाजतां स्वामीमहाराजांचा आत्मा विदेह कैवल्यांत लीन झाला. अर्ध्या तासानंतर महाराजांच्या मस्तकांतून शंखाचा ध्वनि निघाल्याचें सर्वांनीं ऐकलें. महाराजांवांचून मठ शून्य भासूं लागला. सर्व मंडळींत शोकसागरास पूर आला. नंतर सशास्त्रपद्धतीनें पूजा-अर्चा यथासांग झाली. गांवांतील आबालवृद्ध स्वामींच्या शेवटच्या दर्शनास आले होते. मुसलमानांचे गुरूही आपल्या पुष्कळ अनुयायांसह येऊन समाधि कार्यांत शक्य तो आदरपूर्वक भाग घेऊन त्यांनींही दुजाभाव दाखविला नाहीं. महाराजांचे सर्व संस्कार गुरुदासबोवांनीं केले. नंतर भजनाच्या आनंदांत समाधीचें यज्ञकार्य पुरें झालें. महाराजांचें कलेवरहि डोळ्यांआड होण्याबरोबर सर्वांना अतिशय दुःख झालें. सर्वांनीं अवभृथ स्नान करून प्रसाद मठांत घेतला. आतां महाराजांचें पुनर्दर्शन होणार नाहीं म्हणून खेद करीत मंडळी आप-आपल्या घरीं गेली.

नरहरीबोवा खरशीकर, महाराजांचे भाचे, तिसरे दिवशीं येऊन पोंहोचले. नंतर शास्त्रपद्धतीप्रमाणें महाराजांचे और्ध्वदेहिक विधि गुरुदासमामांचे हस्तें पार पडले. तीन दिवस उत्सव झाला. भजन, पूजन, पुराणें, कीर्तनें, झालीं. अन्नसंतर्पणाहि सर्व जातींस झालें. दोन दिवस समाधीपुढें महाराजांचे भाचे व शिष्य नरहरीबोवा यांचीं गुरुभक्तीनें ओथंबलेलीं कीर्तनें झालीं. महाराज

जडदेहानें गेले असले, तरी ते आतां सर्वांच्या मनोबुद्धींत राहिले आहेत, त्यांची कृपा सर्वांवर आहे, त्यांचें नामस्मरण व ध्यान करणारास ते अगदीं जवळ आहेत, अशी गुरुदासमामांनीं व खरशीकरांनीं सर्वांची समजूत केली. स्वामी-महाराजांना पित्यासारखे मानणारे श्री० बाबासाहेब उदाराम राजे यांनीं या सर्व प्रसंगीं मठांत राहून सर्व तऱ्हेनें साहाय्य करून प्रसंग पार पाडला.

## समाधिमंदिर

नंतर महाराजांचें समाधिमंदिर बांधण्याची योजना होऊं लागली. मदनापुरच्या भिवराबाई पाटलीणबाईनें ५०० रुपये देऊन वर्गणीस सुरुवात केली. पुष्कळ मंडळींनीं साहाय्य केलें. त्यांचा नामनिर्देशहि करणें अशक्य आहे. मदनापुर, वरूड, आरणी, कोळंबी, वगैरेकडून पुष्कळ मदत मिळाली. गुरुदासबोवा व नरहरबोवा खरशीकर यांनीं दौरा काढूनहि बरीच मदत मिळविली. गुरुदासबोवांचाहि शिष्यसमुदाय फार मोठा होता. शके १८४४ मध्यें टुमदार लहानसें समाधिमंदिर तयार झालें. दरसाल पुण्यतिथीचा उत्सव वाढत्या प्रमाणावर असतो. मठास स्थावर उत्पन्न नसतांहि एवढा मोठा खर्च चालत आहे, ही जगदंबेची कृपाच समजली पाहिजे.

महाराजांचा बराच वेळ ध्यानयोगांत जात असे. भक्तिपूर्वक कर्मयोग आचरून अकर्तात्मबोधाचें ज्ञान ते सर्वांना सुलभपणें देत असत. भूतमात्रीं ईश्वर आहे म्हणून सर्व जगताचे ऐहिक व पारमार्थिक कल्याणाची चिंता करीत असत. भौतिक शास्त्रांत पुढारलेल्या राष्ट्रांकडे पाहून त्यांना बरें वाटे; परंतु या राष्ट्रांना खरा आनंद या शास्त्रानें प्राप्त होणार नाही, त्यांना केव्हां तरी आर्य तत्त्वज्ञानास शरण यावें लागेल, त्याखेरीज त्यांना शांति मिळणार नाहीं, असें ते म्हणत. तसेंच भरतखंडानेंहि सर्वशास्त्रपारंगत झालें पाहिजे. आपला सनातन वैदिक धर्मच 'विश्वधर्म' भविष्यकाळीं होईल असें ते म्हणत. स्वधर्म हा राष्ट्रोन्नतीचा पाया आहे, म्हणून स्वधर्मवान् व्हा, आपल्या पूर्वजांच्या कृतीकडे आदरानें पहा, भारतभू पूर्वींसारखी वैभवशाली व्हावी, अशी त्यांची उपास्यदेवतेस सतत प्रार्थना असे. एकवार मिळणाऱ्या दुर्लभ नरदेहाचें सार्थक, सद्गुरुमाऊलीपदीं लीन होऊन, व सोपें साधन नामस्मरण करून करावें, असा त्यांचा मुख्य उपदेश असे; अधिकारपरत्वें प्राणायामादि योगहि सांगत असत.

सच्छिष्य खंडेराव यांस चतुर्थाश्रम देऊन त्याचें नांव भार्गवानंदसरस्वति ठेविलें. हे स्वामी भूतमात्रीं नम्र, निरलस व शांत आहेत. हल्लीं हेच मठाधिकारी आहेत. सुंदरगीर तर मठाचे प्राण आहेत. हे सर्व कारभार शारीरिक कष्ट सोसून करीत असतात. हरिदास येऊन जात असतात, साधुवर्य रंगनाथमहाराज हे स्वामीमहाराजांचे शेवटले शिष्य. महाराजांचे समाधीपूर्वी सात दिवस यांनीं अनुग्रह घेतला. हे गृहस्थाश्रमी, शांत व ज्ञानी आहेत. यांचाहि शिष्यवर्ग वाढत आहे. गृहस्थाश्रमी इतर शिष्यांचें व इतर मंडळींचेंहि फार साहाय्य आहे. श्री० बापूराव उटींकर पांडे, भाऊराव करंजीकर इजारदार, रंगनाथ देशपांडे, बाबाराव धानोरकर व माधवराव नाईक इत्यादिकांचें मठाकडे उत्तम लक्ष आहे. महाराजांचें सवंगडी सखाराम रंगारी महागांवकर हे महाराजांच्या लीला वर्णन करतात त्या वेळीं कसलाहि मनुष्य सद्गदित होतो.

महाराजांची शिष्यीण सौ० हिराबाई ह्या महाराजांसन्निध आल्यास वीस वर्षे झालीं. त्या एळंबच्या गोपाळजी पाटलाच्या भगिनी व काळेश्वरच्या पाटलाच्या पत्नी होत. वयाच्या तिसावे वर्षापर्यंत संसार केला. हिराबाईचें लक्ष लहानपणापासून परमार्थाकडे असल्यामुळें सहजच सासरच्या मंडळींना त्यांचें नामस्मरणादि चाळे, शुद्ध आचार, खानपानादिकांतील स्वच्छपणा, हीं खपेनात; तेव्हां निरुपाय होऊन हिराबाईनीं नवऱ्याचें दुसरें लग्न करवून, आपण पांढरें वस्त्र नेसून बाहेर पडल्या. श्रीदत्त-शिखरावर कांहीं दिवस राहिल्या, संत-समागमांत तीन वेळ काशीयात्रा केली व शके १८२८ मध्यें श्रीविष्णुदास-बोवांच्या सहवासास आल्या. मराठाजातीची स्त्री पण अधिकार फार मोठा आहे. त्या परमार्थांत निष्णात आहेत. त्यांचा निश्चय प्रारब्धक्षय होईपर्यंत मठांत रहाण्याचा आहे.

श्रीगुरुदासबोवांनीं महाराजांचे पश्चात् मठाचें कार्य उत्तम तऱ्हेनें वाढीस लावलें. शके १८४६ सालीं पुण्यतिथीचा उत्सव होतांच श्रीगुरुदासमहाराजांची प्रकृति कफानें बिघडली, व गुरुदास ऊर्फ अनंतराव पौष वद्य १ रोजीं स्वस्वरूपीं लीन झाले. त्यांचीहि समाधि श्रीविष्णुदास ऊर्फ स्वामीमहाराजांच्या शेजारीं उजवे बाजूला केली आहे.

याप्रमाणें श्रीविष्णुदासकवि ऊर्फ पुरुषोत्तमानंदस्वरस्वति, आणि अनंतराव ऊर्फ गुरुदासबोवा, यांनीं जन्म घेऊन कुलास पवित्र केलें. या उभयतां सत्पुरुष-

बंधूंनीं चालविलेल्या आश्रमांत धर्मप्रसाराचीं कार्यें सतत चालून जनतेस ज्ञान-दान मिळण्याची परंपरा सुरू रहावी, शिवाय, हीं कार्यें सुरळीत चालावयास आश्रमामध्यें सद्धर्मी भाविक लोकांच्या व उभयतां बंधूंच्या अनेक शिष्यवृंदांच्या साह्याय्यानें धर्मशाळा वगैरे इमारतीहि अवश्य व्हाव्या, व आश्रमास स्थायिक उत्पन्नाचीहि व्यवस्था व्हावी, असें सुचवून हा चरित्रलेख पुरा करतों.

---

# अनुक्रमणिका



# पदांची अनुक्रमणिका

## चित्रें



— ॐ —

# शुद्धिसंस्कार



| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | १९ | प्राणी | पाणी |
| २३ | २४ | फुटका | कुटका |
| ३५ | २३ | कंठितें | कटतें |
| ४९ | १९ | गोपाळा । | घननीळा ! गोपाळा ! |
| ५१ | ६ | जगदवे ! | जगदंबे ! |
| ७४ | १८ | सासरै | सासरे |
| ७७ | १७ | अति मधुसूदनाला | अति धिक्कारून मधुसूदनाला |
| पृष्ठ ८१, ८३, ८५, ८७, ८९, ९१, ९३, ९५ | | या पानांचें शीर्षक ' आख्यानपर ' असें आहे त्या ऐवजीं 'भक्ति-ज्ञान-वैराग्य-उपदेशपर' असें वाचावें. | |
| ८४ | ११ | जिव जसा | जिव जैसा |
| ८५ | २० | विषयाध्यानीं | विषयध्यानीं |
| ८७ | ७ | निवरावे | निबरावे |
| ९३ | ८ | होऊनी | होऊ ने |
| १११ | २४ | एचिलें | रचिलें |
| ११२ | ४ | पहातां | चाल – पहातां |
| १३१ | ६ | त | तो |
| १९० | ९ | जजर | जर्जर |

टीपः— दुरुस्ती करून वाचण्याची विनंति आहे.



# श्रीपुरुषोत्तमाश्रम, श्रीक्षेत्र माहूर.

ॐ श्रीसद्‌गुरुसमर्थ

# श्रीविष्णुदासांची कविता

## भाग १ ला

### नमनपर पदें

#### ( १ ) मंगलाचरण

नमो गणराया मंगलमूर्ती । सकल विबुधगण मंगल गाती ॥ ध्रु० ॥
रत्नजडित शिरिं मुकुट विराजे । कुंडलें कानीं हालती ॥ १ ॥
दूर्वांकुरदळ शमिपुष्पाचे । हार गळ्यामध्यें डुलती ॥ २ ॥
शुंडा-दंडित मोदक-मंडित । आयुधें करीं लखलखती ॥ ३ ॥
विष्णुदासाचे मनभृंगा । चरणकमल विश्रांती ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

#### ( २ ) शारदास्तवन ( ओव्या[१] )

श्रीसरस्वती-फल-संभारीं । कला-लतिका अति साजिरी ।
ज्ञानगंगा जे ब्रह्मगिरि । वेष ब्रह्मकुमरीचा ॥ १ ॥
त्रैलोक्य-लावण्य-नगरी । शृंगारश्रीपर्वत-भ्रमरी ।
साहित्यबाणलिंगाचे शिखरीं । विशाळ नदी नर्मदा ॥ २ ॥

---

१ या ओव्यांखालीं कवीचें नांव नाहीं. तथापि त्या श्रीविष्णुकवींच्या बाडांत होत्या त्या येथें छापल्या आहेत. त्या कदाचित् दुसऱ्या कवीच्या असणेंही संभवनीय आहे.

प्रमेय पोतासाची रंभा । विद्यामूलपीठ जगदंबा ।
चातुर्य-सौभाग्याची शोभा । कुलस्वामिनी कवीची ॥ ३ ॥
नवरसांची मंदाकिनी । महिमे वाटे त्रिभुवनीं ।
त्रैलोक्यातें वरदायिनी । देवत्रया पढियंती ॥ ४ ॥
निगम-कामधेनुच्या उदरीं । सार नवनीत दुरीच्या दुरी ।
दोहन-मंथनावांचोनि सत्वरीं । दे अज्ञान बालका ॥ ५ ॥
तेच सुवासिनी निर्वाणीं । सौभाग्यदायिनी शुभकल्याणी ।
अर्थखाणी सकळ-सुजाणी । वर सुपाणी याची जे ॥ ६ ॥
वीणापुस्तकधारिणी । दुःख-दारिद्र्य-परिहारिणी ।
जे पांडित्यदानें सुखकारिणी । ते वंदिली शारदा ॥ ७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## जयजयकार

( ३ ) ओव्या

नमो श्री जय मंगल मंगलेश्वरी । जय जय नमो श्रीवाचेश्वरी ।
जय जय श्रीगुरुजननी जनकेश्वरी । भुवनेश्वरी रेणुके ॥ १ ॥
जय जय अनंतब्रह्मांडस्वामिनी । जय जय अनंतब्रह्मांडव्यापिनी ।
जय जय अनंतनामसगुणस्वरूपिनी । श्रीनारायणी रेणुके ॥ २ ॥
जय जय नमो श्रीमूळपीठ-नायके । जय जय नमो श्रीमहाकालिके ।
महालक्ष्मी महासरस्वति विधिबालिके । भ्रमरांबिके रेणुके ॥ ३ ॥
जय जय नमो श्री सौभाग्यवंते । षड्गुण-ऐश्वर्यालंकृत श्रीमंते ।
जय जय अनंतानंते भगवंते । कृपावंते रेणुके ॥ ४ ॥
जय जय सुंदरसुप्रसन्नवक्त्रे । जय जय नमो श्रीपंकजनेत्रे ।
जय जय नमो श्रीकोमलगात्रे । परमपवित्रे रेणुके ॥ ५ ॥
दुर्गे दुर्घट-वरदायिनी । कला-लतिके कैवल्यदानी ।
जगन्नायिके जगज्जननी । जय जय भवानी रेणुके ॥ ६ ॥

आपुलीया श्रीदासाठीं । माझिया अपराधांच्या कोटी ।
क्षमावंते, घालोनी पोटीं । क्षमा करी वो रेणुके ॥ ७ ॥
प्रसन्नवरदे, प्रसन्न होई । प्रसन्न शब्दें परामर्श घेई ।
प्रसन्नानंदें प्रसाद देइ । माझे आई रेणुके ॥ ८ ॥
आपुल्या कृपाकटाक्षाचे प्रौढी । अनाथ रक्षिले अनंतकोटी ।
तया कृपामृतांतुन मजही थोडी । भिक्षा वाढी रेणुके ॥ ९ ॥
पुरुषोत्तमस्वामिचे अंतरंगे । अभंगसौभाग्ये, दुरितभंगे ।
घेई सुखसंगे वो, मज वोसंगें । माय गंगे रेणुके ॥ १० ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## कवीची विनवणी

( ४ ) पद

आपण सांगावें । कसें संगित गायन गावें ॥ ध्रु० ॥
या रंगसभेमधिं बसून । कां गोष्टि सांगतां हंसून ।
आलें तुमचें मनोगत दिसून । मनच भंगावें ॥ कसें० ॥ १ ॥
तुम्हि अहां चतुर पंडित । सुज्ञानि सभामंडित ।
तरि करूं नये खंडित । पुष्प हुंगावें ॥ कसें० ॥ २ ॥
हलवावि मधें मधें मान । कवितेचा करुन सन्मान ।
सोडून सर्व अपमान । प्रीतिनें वागावें ॥ कसें० ॥ ३ ॥
जांवई ज्याहि मेव्हणे । आले आप्त मित्र पाव्हणे ।
पंक्तींत पाहुं नये उणें । उचित मागावें ॥ कसें० ॥ ४ ॥
संभाषण करितां मना । उल्हास वाटतो मना ।
पुरवावि इतुकि कामना । अखेर जागावें ॥ कसें० ॥ ५ ॥
वाजे मृदंग आणि सारंगी । करि गायन सुस्वर रंगीं ॥
म्हणे विष्णुकवी या रंगीं । रंगुनि जावें ॥ कसें० ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५ ) भूपाळी दत्ताची

उठि उठि गा दत्तात्रया । तूं सुखदायक लोकत्रया
सोडुनि निद्रादेहत्रया । म्हणे अनुसूया हो जागा ॥ ध्रु० ॥
उठि उठि गा दिगंबरा । आला वासरमणि अंबरा
शिव, गणपती, नारदतुंबरा । विश्वंभरा, अवलोकीं ॥ १ ॥
अझुनी निजलासी तूं कसा । श्रीक्षिरसागरिं श्रीहरि जसा
माझ्या हरणीच्या पाडसा । ऊठ राजसा अवधूता ॥ २ ॥
बा, तुज पहावयासाठीं । आल्या सिद्धऋषींच्या थाटी
झाली अमरगणांची दाटी । करती वृष्टी पुष्पांची ॥ ३ ॥
सगुण बाळ ब्रह्मचारी । तूंचि निर्गुण भवसंसारीं
तव गुण अठरा सा परिचारी । वेद चारी वर्णिती ॥ ४ ॥
उठि उठि गा पुरुषोत्तमा । मजला लागूं दे गृहकामा
बाळा, तुजला देतें आमा । आत्मारामा उठ वेगीं ॥ ५ ॥
बहीण ही शोभे कपिलाचार्या । धन्य अत्रीऋषीची भार्या
सत्वर शरणागत जनकार्या । श्रीगुरुराया उठवी ॥ ६ ॥
तूं विश्वेश्वर प्रतिपाळक । तूंचि विश्वाचा मालक
माझा म्हणविसी बाळक । तूं चालक प्राणाचा ॥ ७ ॥
ऐकुनि निज जननीची वाणी । जागृत झाला सशास्त्र प्राणी
अनुपम कैवल्याची खाणी । गुण वाखाणी अनसूया ॥ ८ ॥
शुभमंगळ प्रभातकाळीं । गातां सद्भावें भूपाळी
त्यांचें भवभयसंकट टाळी । गुरु, सांभाळी सर्वदा ॥ ९ ॥
महंत गोविंदभारती । वसती सिंहाद्रीपर्वतीं
सहीत महापुरुषाच्या मूर्ती । नामें गर्जेति स्वानंदें ॥ १० ॥
भिक्षा मागुन माधुकरी । प्रसाद देई आपुले करीं
शरणांगत जन पावन करी । उठी झडकरी अवधूता ॥ ११ ॥

ही भूपाळी अक्षरमाळा । सुगंध, मकरंद, आगळा
श्रीगुरु क्षराक्षर वेगळा । त्याच्या गळां अर्पिली ॥ १२ ॥
बा, तुझें मंजुळ बोलणें । बा, तुझें चंचल चालणें
बा, तुझें स्वानंदें डोलणें । जग सम पहाणें अवधूता ॥ १३ ॥
श्रीगुरु दत्तात्रयमाउली । विष्णुस्वामी म्हणे पावली
नाम स्मरतां अविलंबें धांवली । सामावली मजमाजी ॥ १४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६ ) भूपाळी रेणुकेची

सत्वर जागृत व्हावें, उठावें, पहा पहांट झाली ।
कशि जगदंबे ! अंबे ! रेणुके ! तुला झोंप आली ।
किमापिही रात्र नाहिं उरली ॥ ध्रु० ॥
जेव्हां अरुण आणि गति उदयाचळिं रविच्या रथाची ।
प्रिय निद्रासुख वाटे तेव्हां ती घडि अमृताची ।
प्रकृती मृदु श्रीमंताची ॥
नीज सर्वथा भंगुं नयेची श्रमुनी निजल्याची ।
आत्महितास्तव परि ऐकियली कथा भारताची ।
व्यासमुनिकविच्या ग्रंथाची ॥
कौंतेयासह वधितों बाळें उद्यां सी पृथेचीं ।
भीष्म म्हणे अशि माझि प्रतिज्ञा नव्हे ही वृथाची ।
जय श्रीहरिविण पार्थाची ॥
युद्धप्रसंगामधें श्रमूनी जरि होती निजली ।
तरि द्रौपादिनें कृष्णाबाई कशि जागी केली ।
गोष्ट तिचि अवघी ऐकियली ॥ १ ॥
भीष्म एकला वैरी परि त्या हरी साहाकारी ।
प्रबल पुण्य पंचराजसुत महा अधीकारी ।
तशासहि भय तें चटकारी ॥

कामादिक षड्वैरी मजला गांजितात‍ि भारी ।
अति दुर्बळ खल पाहि एकला मी बहु भिकारी ।
तुझा मी होइन उपकारी ॥
त्याहुनि संकट पडलें म्हणुनी आलों तुझ्या दारीं ।
या समयीं करि करुणा माझी तुला लाज सारी ।
शिण ये तुजविण संसारीं ॥
हांका मारितां कां न बोलसी ? तुझी रीत पहिली ।
केलि उपेक्षा कधिं दीनाची कोणि न पाहियली ।
अशि आण बहुतांनीं वाहिली ॥
पतित मी तूं पतीतपावन जगीं कीर्ति भरली ।
विष्णुदास म्हणे म्हणुन तुझी मीं आस फार धरली ।
पदें जडमतिनें गाईलीं ॥ २ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

# भाग २ रा

—:०:—

## देवीचीं पदें

### ( ७ ) गोंधळ

माहुरगड-वासिनी आउबाइ ! गोंधळा येई हो[१]
कोल्हापुर-वासिनी रमाबाइ ! गोंधळा येई गोंधळा हो
तुळजापुर-वासिनी तुकाबाइ ! गोंधळा येई हो
पंढरपुर-वासिनी विठाबाइ ! गोंधळा येई हो
सहपरिवारें रंगमंडपांगाणिं सादर होई
नवस तुझा हा तूंचि आपुला फेडुनिया घेई
हेची वारंवार विनंती शिर ठेवुनि पायीं ॥ ध्रु० ॥
पुराण, कीर्तन, श्रवण, उपोषण, जाग्रण, तुजकारणें
अनंत जन्माचें घडलें आजि पुण्याचें पारणें
दुर्बळ दिनदुबळ्याचि दिवाळी ही अंगिकारणें
कृष्णोमलिकग्रामिं[२] फडकती विजयध्वजतोरणें
तुझ्या गृहीं जरि बहु चिंतामणि सुरतरु सुरगायी ॥ माहुर० ॥१॥
माणिक-चौकीं पडदे चिकाचे चौफेरीं सोडिले
रत्नखचित षोडशदळमंडित स्वस्तिक पिठ मांडिलें
मोत्यांच्या रांगोळ्यावरि बुट रंगांचे काढिले
कनकताटिं पंचामृत षड्रस-पक्वान्नहि वाढिले
सुगंध, तैलांबर, कर्पुर, धुप, दिप, ठाईंठाईं ॥ माहुर० ॥ २ ॥

---

१ प्रत्येक चरणाचे शेवटीं 'हो' म्हणावें. २ मातापुर किंवा माहूर.

सकळहि सुरवर नरवर आले सिंहाद्रीं पर्वतीं
ऋद्धि-सिद्धी सिद्ध ऋषींगण गणपति-सरस्वती
ब्रह्मदेव-साविती, विष्णू-लक्ष्मी, शिव-पार्वती
कृष्णा, वेण्या, भिमा, सरस्वति, यमुना, भागीरथी
लोपामुद्रा अरुंधति सती राही रुखुमाई ॥ माहुर० ॥ ३ ॥

आनंदीचा सदा आनंदें मांडिला गोंधळ
नारद, तुंबर, गाति, नाचती सुर-रंभा-मंडळ
सुगंध, केशर, गुलाल, कुंकुम, पुष्पांचा परिमळ
वाजति तुंबळ दशविध वाद्यें अनुहतध्वनि-संबळ
विष्णुदास म्हणे उदय रेणुके, दीनांचे आई ॥ माहुर० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८ ) [१]ओव्या दळणाच्या

आदिनमन गणपतिला । गणासहित सरस्वतिला ।
शुभ मंगळाऽरंभ केला । ओवी गाईन रेणुकेला ॥ ध्रु० ॥
सदा प्रसन्न रुप गोमटी । जशि शिवाच्या गंगा जटीं ।
तशि अखंड या मुळपिठीं । माय राहिलि दीनासाठीं ॥
श्रीमृगराजाचलपाठीं । शतसहस्त्र ऋषींच्या थाटीं ।
देव तिष्ठति तेतिस कोटी । माय राहिलि दीनासाठीं ॥
बहु खगमृगतरुंची दाटी । खडे कंटक वाटोवाटीं ।
एवढी सोसुन आटाआटी । माय राहिलि दीनासाठीं ॥
रुचि प्रेमाचि लावावि ओठीं । तुपसाखर, फेणी, ताटीं ।
करिं दुधाचि घेउन वाटी । माय राहिलि दीनासाठीं ॥
दीन जनांचि चिंता जिला । धिर क्षणभर पडे ना तिला ।
शुभ मंगळाऽरंभ केला ॥ १ ॥

---

१ एके दिवशीं पहांटे प्रत्यक्ष श्रीमन्मातृदर्शनानंतर झालेल्या ओव्या प्रासादिक आहेत.

तुला होइल आई नजर । तुझा मुखचंद्र नादर ।
तुझें सगुण रूप सुंदर । शोभे पिवळा पीतांबर ॥ ध्रु० ॥
तूं चतुर गुणगंभीर । सडपातळ तुझि कंबर ।
तुझि अखंड भर उम्मर । शोभे पिंवळा पीतांबर ॥
वर अर्पिसि अजरामर । तुला वंदिति मुनि सामर ।
शिरिं वारिती गण चामर । शोभे पिवळा पीतांबर ॥
तुझ्या अंकित विधिहरिहर । तुझ्या गळ्यांत उत्तम हार ।
तुला दागीने शत शंभर । शोभे पिवळा पीतांबर ॥
तुला पहातां मोह करपला । जड-देहभाव हरपला ।
शुभ मंगळाऽरंभ केला ॥ २ ॥

कलिरायाचें हें नगर । याचें नांव कंटकपुर ।
महागांवांत सासर-घर । माझें माहेर मातापुर ॥ ध्रु० ॥
सदा भंडार घर भरपुर । सदा वाजति पदिं नूपुर ।
सदा सुगंध दीप कर्पुर । माझें माहेर मातापुर ॥
परदेशीं मी पडलें दुर । आड आले गड, डोंगर ।
बाणगंगेला आला पुर । माझें माहेर मातापुर ॥
काय तुझ्यांत नसे मगदुर । काय म्हणसि रहा दुर दुर ।
नको डोळ्यांत घालुं शेंदुर । माझें माहेर मातापुर ॥
खळ रावण वंगळ मेला । जशि जानकि नेलि लंकेला ।
शुभ मंगळाऽरंभ केला ॥ ३ ॥

किति मनासि या आवरूं । धिर अजून कुठवर धरूं ।
मी अनाथ दिन लेंकरूं । नको माझि उपेक्षा करूं । ॥ ध्रु० ॥
नको उगि मजवर गुरगुरूं । तूं बाप, माउली, गुरू ।
मी अनाथ दिन लेंकरूं । नको माझि उपेक्षा करूं ॥
माझी रक्षण कर आबरू । नको प्राणसखे घाबरूं ।
मी अनाथ दिन लेंकरूं । नको माझि उपेक्षा करूं ॥

धनदौलत नलगे मला । डोळे भरुन पाहुं दे तुला ।
शुभ मंगळाऽरंभ केला ॥ ४ ॥
अतां पहातिस ग काई । उडी घाल, ये लवलाही ।
दिनदयाळे माझे आई । ब्रिद संभाळ अपुलें बाई ॥ ध्रु०
तूं विटेवरची विठाई । मुळपिठाची तूं पिठाई ।
दिनदयाळे माझे आई । ब्रिद संभाळ अपुलें बाई ॥
विष्णुदास लागे पायीं । करि करुणा अंबाबाई ।
दिनदयाळे माझे आई । ब्रिद संभाळ अपुलें बाई ॥
येसि धांवुन एक हांकेला । असा महिमा बहु ऐकिला ।
शुभ मंगळाऽरंभ केला ॥ ५ ॥
ॐ !　　ॐ ! !　　ॐ ! ! !

## ( ९ ) घनाक्षरी

मुळपीठवासिनी श्रीअंबे । आदिमुळमाये जगदंबे ॥
मुळाधारे मुळस्तंभे । मुळारंभे रेणुके ॥ १ ॥
नको साधन धन कांहिं । काम स्तवनाचें नाहिं ॥
तुला रेणुके बाइ । आइ, बोलणें पुरें ॥ २ ॥
क्षमा करणें अन्याय । हाचि क्षमतेचा न्याय ॥
क्षमावंते तुज माय । बहुत काय बोलणें ॥ ३ ॥
काय इच्छिसि तें सांग । शक्ति पाहुनिया माग ॥
स्नेहधर्मानें वाग । बये, राग सोडुनी ॥ ४ ॥
तुझा धुंडितां गांव । कोठें लागे ना ठाव ॥
म्हणुनि जपतों तुझें नांव । मला पाव रेणुके ॥ ५ ॥
करुनि दंडाकृति पृष्ठिं । पाहाति मुरडुनिया दृष्टिं ॥
होति साधकजन कष्टि । तुझ्यासाठिं रेणुके ॥ ६ ॥

गुहा-पर्वत-नदि-कांठिं । तनू टांगुनि उफराटि ॥
पडुनि कर्माच्या हट्टिं । करिति कोटि साधनें ॥ ७ ॥
मंत्रतंत्रांच्या युक्ति । शास्त्र-कविता-व्युत्पत्ति ॥
नव्हे मुक्ति न धड मुक्ति । तुझ्या भक्तिवांचुनी ॥ ८ ॥
सकल धर्मांचे बोल । काय बोलुनिया फोल ॥
नये भक्तीचें मोल । ब्रह्मगोल तोलितां ॥ ९ ॥
स्वामि पुरुषोत्तम देहि । भक्ति-भिक्षामृत देइ ॥
पूर्ण अन्नपूर्णा बाइ । अगे आई रेणुके ॥ १० ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १० ) पद— वंदे मातरम्

( चाल: प्रियकरा मी भुललें. )

जय आनंदे, विजयवरदे, उदय वंदे मातरम् ॥ ध्रु० ॥
ब्रह्मांडपिंडव्यापिनी, आदिप्रणवरूपिणी ।
तूं अचिंत्य, नित्य, आदिमध्य-अंत, सविस्तरम् ॥ उदय० ॥ १ ॥
विष्णु, ब्रह्मदेव, शिव, देव, प्रकृति, पुरुष, जीव ।
तूंचि धरणि, तरणी, शशि, गगन, दिशांतरम् ॥ उदय० ॥ २ ॥
अमर चवर वारिती, करिति पुजन आरती ।
सुगंध, गंध, धूप, दीप, पत्र, पुष्प अत्तरं ॥ उदय० ॥ ३ ॥
मूळपीठनायके, हीच विनंति आयके ।
त्रिविध ताप हारि तारि वारि विघ्न दुस्तरम् ॥ उदय० ॥ ४ ॥
निजचरणिं ठाव दे भजनिं भाव दे वदे ।
विष्णुदास जिवशिवास तूं निवास निरंतरं ॥ उदय० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११ ) पद

( चाल : उघड मागिले दाराची कडी )

जगदंबे, प्रार्थितों तुला ।
पाव तूं मला । तुझा अंबे लोलो लागला ॥ ध्रु० ॥
श्रीसकळगुणालंकरणिके
माय रेणुके । लावण्यरत्नमाणिके
दिन अनाथजनपालिके
राजबालिके । रुचिकात्मजकंठमालिके
अजरामरवरदायके
विश्वपालके । माझि विनंति तूं आयके
( चाल ) तूं सकलांतरव्यापिनी
चैतन्यघनरूपिणी
उघडुनी नेत्र-पापणी
पहा दुर्बल द्वारीं आला । बहुत भागला ॥ तुझा० ॥ १ ॥
जरिपटकि साडि खडखडी
कंचुकिवर खडी । शिरिं केतक, मुदराखडी
अंगावर शालुची घडी
गोठ, बांगडी । शोभे दुळड बाळी-बुगडी
वांकिची मुरड वांकडी
कडीवर कडी । सगुणरूप प्रणवाची तुकडी
( चाल ) भुजंग वेणिचा पिळा
लाल कपाळिं कुंकुमटिळा
स्वर मंजुळ बोले कोकिळा
पाहतां देहभाव रोधला । प्राण वेधला ॥ तुझा० ॥ २ ॥

तूं जाणसि हृदय हृदय
सदय सदय । जय भवानि उदय उदय
जन्माची दय दय
गेलें वय वय । किति म्हणासि दुर होय होय
मी पतित जरी निश्चय
आहे तरी सय । तूं पावन निःसंशय
( चाल ) कां विसर वृथा
मज तारणें पडे सर्वथा
पहा शोधुन मागल्या कथा
सहस्रार्जुन जरि मारिला । तरि तारिला ॥ तुझा० ॥ ३ ॥

कशि करशिल माझी गती
जननि सांग ती । करून भक्तीची माहिती
× × × ×
धरुनियां हातीं । तुला आहे कुणाची भिती
तव सत्तें तरु डोलती
वेद बोलती । दिन-रजनि-पती चालती
( चाल ) म्हणे विष्णुदास शंकरे
करि अपुलें ब्रिद तूं खरें
रुचि सोडुं नये शर्करे
विषयीं जिव अपंगला । भजनिं रंगला ॥ तुझा० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२ ) पद[1]

( चाल : वसंति ऋतुनि. )

कृपा कर श्रीअंबाबाई, ।
माहुरगडवासिनी दयाळे, दर्शन मज देई ॥ ध्रु० ॥
दयाळे, अंत नको पाहूं ।
ये लवकर, करि करुणा, मजवरि निष्ठुर नको होऊं ॥
धीर कुठवरी धरुनि राहूं ।
काळ मला लागला गिळाया चंद्र जसा राहू ॥
सोसेना विविध यातना ही ॥
अझुनी माझी दया बये ! तुज कशी येत नाहीं ? ॥ कृपा कर० ॥ १ ॥
सोडुनी ब्रह्मस्वरूपासी ।
मी जिव झालों पहावयास्तव तुझिया रूपासी ॥
सोडुनी गृह-धन-धान्यासी ।
तुजसाठीं आली साठी, शेवटीं झालों संन्यासी ॥
वासना जडलि तुझ्या पायीं ।
म्हणुनि येवढ्या खटकर्मांच्या पडलों अपायीं ॥ कृपा कर० ॥ २ ॥
मज नको दाउं माय दुसरी ।
दीनजननि तूं म्हणुनि दीन मी बसलों तुझ्या बसरीं ॥
अवघे दोष रोष, विसरी ।
अवगुण पोटीं घालुनि ओटिंत घेइ; पदर पसरी ॥
तुझी किति वर्णूं चतुराई ? ।
करिसि राइचा पर्वत मेरू पर्वताचि राई ॥ कृपा कर० ॥ ३ ॥

---

१ पहिल्या आवृत्तींत नसलेलीं ५ व ६ हीं कडवीं उपलब्ध झाल्यामुळें आतां छापलीं आहेत.

तूं मूळपिठिंची वेल्हाळा ।
अखंड तुझिया आनंद-भुवनीं उदंड सुखसोहळा ॥
दाखवी सुंदर रुप डोळां ।
सकळभूषणालंकृत नादर पीतांबर पिवळा ॥
तूंचि जगताई रामाई ।
तूं पार्वति-शिव, राम-सिताबाइ, विठ्ठल-रुखमाई ॥ कृपा कर० ॥ ४ ॥

तूंचि गुरु बाप माय आजी ।
यज्ञ दान व्रत जप तप तर्पण, संध्या तूंच माझी ॥
अवडिनें सुपारि घे माझी ।
जशि विदुराची कणी भक्षिली, द्रौपदिची भाजी ॥
अक्षरें तीन 'रेणुका' ही ।
वदनीं स्मरतों मंत्र तंत्र जप, नये आणिक कांहीं ॥ कृपा कर० ॥ ५ ॥

भयंकर मोहज्वर हटवी ।
पार्थापरि मी भ्रमलों पडलों, धरुनि हात उठवी ॥
महा भव रणसागर आटवीं ।
खुंटावि विधिचें कलम आपुलें, जननीपण आठवी ॥
चिंतितो तुला शेषशाई ।
मजविषयीं नको लावूं श्रुतिच्या, अक्षरांस शाई ॥ कृपा कर० ॥ ६ ॥

भ्रमरवत् भवकाननिं भ्रमलों ।
श्रमलों दमलों म्हणुनि भवाश्रमिं विश्रांतिस आलों ॥
लागला तुझा हृदयिं लोलो ।
विष्णुदास म्हणे सद्गुरुकृपेनें " पुरुषोत्तम " झालों ॥
अतां पद नमुनि प्रार्थना ही ।
दे दर्शन मज, याविण दुसरा स्वार्थ सत्य नाहीं ॥ कृपा कर० ॥ ७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३ ) पद

( चाल : प्रीतिस पात्र कोण. )

आई, तुझ्या मी दर्शनासि योग्य नाहीं का ?
रेणुके, तूं दीनांची नससि माय का ॥ ध्रु० ॥

जवळ आलियासि म्हणसि हो पलीकडे
लागलि ही संवय तुला कां अलीकडे
कोणाचि आस धरुन जाउं मी कुणीकडे
श्रुतिपदास लाविसि तरि व्यर्थ शाई कां ॥ आई तव ॥ १ ॥

हा भवानि म्यां तुलाचि देह अर्पिला
त्यजुनि अन्नपाणि रानिं निंब वर्पिला
अपमान, मान, राग, लोभ, सर्व निर्पिला
अझुनि कां न भेट देसि लपसि बाइ, कां ॥ आई० ॥ २ ॥

कां अझून सुप्रसन्न चित्त होइ ना
कां अझून या दिनाचि कींव येइ ना
कां अझून ऊर उलुनि जीव जाइ ना
शिर फुटोनि होइनाचि राइ राइ कां ॥ आई० ॥ ३ ॥

काय म्हणावें अवतारकृत्य संपलें
काय म्हणावें शितळ चंद्रबिंब तापलें
काय म्हणावें दुष्ट नष्ट दैव आपुलें
काय म्हणावें जगविताचि वांझ गाइ कां ॥ आई० ॥ ४ ॥

पापिष्ट दुष्ट मरतो त्यासि काय मारणें
पुण्यश्लोक तरतो त्यासि काय तारणें
त्रिदोष दोषियांसि जहर काय चारणें
यांत आहे तरि सुजाणे, भलि भलाइ का ॥ आई० ॥ ५ ॥

माझे अपराध कांहीं आठवूं नको
अपुलें तूं सदय हृदय बाटवूं नको
व्याघ्रमंदिरासि वत्स पाठवूं नको
विष्णुदास म्हणे न येच ऐकुं कांहिं का ॥ आई तव० ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४ ) पद[1]

( चाल : सुनोजी साई वचन हमारा. )

कधीं भेटशिल आइ जगदंबे, खचित सांग तूं मला मला
जोंवर आहेत प्राण कुडिमधें तोंवर पाहुं दे तुला तुला ॥ ध्रु० ॥

मोठिच पोटीं आस तुझें रूप डोळे भरून पहावया बया
जन्मचि सारा गेला अशामधें, आलि दशा जुनि वया वया
परंतु नाहीं आलि दिनाची तुझ्या मनामधें दया दया
निबर तरि तुझें काळिज केवढें धन्य धन्य अग बया बया
गोड वाटतो तुझा तुला परि स्वभाव नाहिं हा भला भला ॥ १ ॥

राज्य कठिण हें आलें कलीचें वर्तमान भलें नव्हे नव्हे
प्रजा-वृत्ति-धन हरण कराया निघति कायदे नवे नवे
घरोघरीं अंधार परंतू रस्तोरस्तीं दिवे दिवे
दया, धर्महि न; माय लेंकरा उठे माराया जिवें जिवें
काय उफराटें कर्म म्हणावें कसे कांटे आले फुला फुला ॥ २ ॥

तूं आदिमाये, ही या कलिच्या, आधीन झालिस यदा यदा
तव आज्ञेचि ठेवुनि वागती, विधि-हरिहर मर्यादा यदा
कामधेनुची लेक घरोघरीं, ताक मागे ओखदा खदा

१ यांतील ३ व ४ हीं कडवीं या आवृत्तींत जास्त घातलीं आहेत.

व्यास वाल्मिकादीक मुनीजन, पाहून हंसतील खदा खदा
दिन जननीचें निरक्षुनी ब्रिद, लक्षी आपुल्या मुला मुला ॥ ३ ॥
नाहिं भरंवसा घालिल फासा, काळ गळ्यामधें केव्हां केव्हां
काय कौतुक मग पहाशिल आमुचें, जगज्जननी तूं तेव्हां तेव्हां
कळेल तसें पुढें करी परंतु, दे दर्शन मज येव्हां येव्हां
थोर तुझा उपकार आठविन, जन्मा येईन जेव्हां जेव्हां
यास्तव एवढी ऐक विनंति, पूर्ण करी हेतुला तुला ॥ ४ ॥
क्रामक्रोध दिर दुर्धर मेले प्रपंचवानिं हांकिती किती
खचित प्राण घ्यावया पहाती; ताप सांगुं हा किती किती
अहंकार सासराहि सासू विकल्पना कोपती अती
परंतु कांहीं बोलत नाहीं निसंग माझा पती पती
तुजकडे पहातें उगिच रहातें बाळगुनी अब्रुला ब्रुला ॥ ५ ॥
सत्वर आतां ने मज माहेरिं ठेवुं नको सासरीं तरी
दे साडी मज जुनीपुराणी, नको सोन्याची सरी सरी
जळो दुसऱ्यांचे हार पितांबर, आईची येइ ना सरी सरी
जवळ बसूनी गोड.बोल माशि, नको दमाडि नासरी परी
विष्णुदास म्हणे आइ रेणुके, तुझ्या नमितों पाउला उला ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १५ ) पद

( लावणीची चाल : साजन् नये मंदिरीं )

श्रीमूळपीठनायके, माय रेणुके, अंबाबाई
नको माझि उपेक्षा करूं; पाव लवलाही ॥ ध्रु० ॥
जय दुर्गे, नारायणी, विश्वस्वामिनी, सगुणरुपखाणी
जय मंगलवरदायिनी, सर्वकल्याणी

जय महिषासुरमर्दिनी, राजनंदिनी, पंकजपाणी
हे भार्गवजननी मला पाव निर्वाणीं
जय प्रसन्नमुख त्रिंबके, जगदंबिके, प्रसन्न तूं होई
नको माझि उपेक्षा करूं, पाव लवलाही ॥ १ ॥

कल्पना फिरवि गरगर, समूळची घर, बुडवायाची
ही दुर्लभ नरतनु अतां जाति वायांची
शिर झालें पांढरें फटक, लागली चटक, अधिक विषयाची
कशि होइल मजला भेट तुझ्या पायाची
ये धांवत तरि तांतडी, घालि तूं उडी, पाहसी काई
नको माझि उपेक्षा करूं; पाव लवलाही ॥ २ ॥

तुजवांचुन मज दूसरा, नसे आसरा, जगीं जगदंबे
तूं भवानि, मजवर कृपा करी अविलंबें
सोन्याचा उगवी दिवस, करीतों नवस, सकळारंभे
मी भरिन ओटि नारळीं, केळिं, डाळींबें
मी अनाथ दीन केवळ, माझि कळकळ, येउं दे कांहीं
नको माझि उपेक्षा करूं; पाव लवलाही ॥ ३ ॥

मी थोर पतित पातकी, माझी इतुकी, अर्जि ऐकावी
एकदां कसेंही करुन भेट मज द्यावी
तूं देणार नाहिंस हाणुन, आलों मी म्हणुन, तुझ्या या गांवा
म्हणे विष्णुदास ही कीर्ति जगामधें गावी
धिर नाहिं अतां पळघडी, म्हणुन येवढी, सुटली घाई
नको माझि उपेक्षा करूं; पाव लवलाही ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६ ) पद

( चाल : भला जन्म हा तुला. )

प्रकट मूळपीठादि भवानी देवि रेणुका सती ।
पाहिली सिंहाद्री-पर्वतीं ॥ ध्रु० ॥
चंद्रवदन मृगनयन विराजे, भ्रुकुटि धनुष्याकृती ।
दृष्टि धरि असुरावर वक्र ती ॥
रत्नजडित शिरिं मुकुट विराजे, कर्णयुगुल हालती ।
गळां हार रत्नांचे डोलती ॥
कंचुकि भरजरि पीत पितांबर अमर चवर ढाळती ।
भ्रमरवत् सिद्ध अंगणिं लोळती ॥
वर्णिति पंडित गुणगणमंडित खड्गचापशर हातीं ।
अखंडित योगीजन पाहती ॥
चमकति कंकण मुक्तघोष घन नक्षत्रवृंद लाजती ।
चालतां पदिं पैंजण वाजती ॥
विष्णुदास म्हणे दीन जनांची माय सांगु मी किती ।
जाहली भक्तांची सारथी ॥ प्रकट० ॥ १ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७ ) पद

ही परम कृपेची माउली हो । ही विश्रांतिची साउली हो ॥ ध्रु० ॥
ही लावण्यरूपचंद्रिका । रत्नमुद्रिका । विजयभद्रिका
अणु-रेणुका । माय रेणुका । इनें वेदवाणी बोलवली हो
इनें सूर्याची गति चालवली हो ॥ १ ॥
वसे सिंहाद्री-पर्वतीं । लक्ष्मी सती । हीच पार्वती

हीच सरस्वति । सिद्ध गणपती । ही नाचवि भावला-भावली हो
संरक्षित पावला-पावलीं हो ॥ २ ॥
ही कल्पलता शुभ-अंगा । मूळपिठ रंगा । निर्मळ गंगा
कलिमलभंगा । अचळ अभंगा । ही बहुत जनांला पावली हो
ही बहुत संकटीं धांवली हो ॥ ३ ॥
ही प्रसन्नरुप सर्वदा । आनंदी सदा । चिंतितां पदा
वारि आपदा । देत निजपदा । इला प्रेमभक्ति मानवली हो
योग्यासी खुण जाणवली हो ॥ ४ ॥
ही षड्गुण-नारायणी । प्रणवरूपिणी । सकलसाक्षिणी ।
विश्वस्वामिनी । पदक जोडणी । हिनें विष्णुदासा लावली
इनें वाट सुखाची दावली हो ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८ ) पद

( चाल : नियम पाळावे. )

बोल भवानी जय जगदंबा । ही माहुरगडची अंबा ॥ ध्रु० ॥
मुळपीठ कोरि भूमिका । तेथें नांदे देवि रेणुका
लावण्यरत्नचंद्रिका । ही मूळ सृष्टिची रंभा ॥ ही माहुर० ॥ १ ॥
सदा प्रसन्न मुख विराजे ! वंदिती देव ऋषि राजे
भक्तांच्या धांवे जी काजें । क्षणाहि न लावि विलंबा ॥ ही माहुर०॥२॥
निळवर्ण वेणी भुजंग । नेत्राला भुलती कुरंग
खुले दंतपंक्तिचा रंग । लाजवी पक्क डाळिंबा ॥ ही माहुर० ॥ ३ ॥
म्हैषासुर मारिला ठार । उतरिला भूमिचा भार
सहस्रार्जुन केला ठार । निवटिलें शुंभ-निशुंभा ॥ ही माहुर० ॥ ४ ॥
जरि कृपा करिल ही माय । तरि दुस्तर भवनिधि काय ?
म्हणे विष्णुदास तिचे पाय । अखंड चित्तीं अवलंबा ॥ ही माहुर० ॥५॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १९ ) पद

( चाल : क्या कलम खुदाने जिमारा )

काय कारण घुसा रेणुकेला
माझा त्याग कशास्तव केला ॥ ध्रु० ॥
झाला वर्षाच्या वर एक महिना
तरि अझूनि सय कां हो येइ ना
अशि अगदींच नको करूं दैना
तुझ्याविण मला बाप-आई ना
दूर काननीं पडलों एकला[1] ॥ माझा० ॥ १ ॥
भला भार्गवराम प्रतापी
गळा आपुल्या जननीचा कापी
परि तैशाची केलीस माफी
माझे अन्याय लाविसी मापीं
कां रुसलीस या घटकेला ॥ माझा० ॥ २ ॥
जन्मा घातलें हा अविचार
आतां जन्मदे, काय विचार
प्रेमें चालवी प्रेमप्रचार
तुझे वर्णिति गुण वेद चार
तुझ्या वंदितों मी पादुकेला ॥ माझा० ॥ ३ ॥
माझ्या पहाशिल अवगुणाला
उणें येइल जननीपणाला
दृढ बांधिलें ब्रीद कंकणाला
याची तरि मग लाज कुणाला
कां लाविसि मजासि भिकेला ॥ माझा० ॥ ४ ॥

---

१ मूळ शब्द 'अकेला'.

निज चर्माचा सदाचरणांत
जोडा घालिन तुझ्या चरणांत
तुझ्या राहीन माय ऋणांत
सडा टाकिन मी अंगणांत
नित्य गुंफिन पद-मालिकेला ॥ माझा० ॥ ५ ॥
रत कामना काममदासी
जशि गुंतली माशी मधासी
काढिं यांतुनि, आली उदासी
छाया कृपेची करी विष्णुदासीं
नमो नारायणी अंबिकेला ॥ माझा० ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २० ) पद

( चाल : कबिरी )

हा गांव नाहिं ग भला । रेणुके, सत्वर मुळ ये मला ।
हात जोडितें तुला ॥ ध्रु० ॥
या सासरचे साजण साजणी दिवसा घालिति घाला
पति धड स्त्री ना पुरुष निघाला । हा गांव नाहिं ग भला ॥ १ ॥
रात्रंदिन हा घट घुसळीतां तक्र न ये साराला
धाड पडो या संसाराला । हा गांव नाहिं ग भला ॥ २ ॥
सडा, सारवण, दळण, कांडण, करितां स्वयंपाकाला
खचीत आला जिव नाकाला । हा गांव नाहिं ग भला ॥ ३ ॥
घरच्या धन्यानें घरधनि केलें सवतीच्या पोराला
कुळपाटीलकी दिली चोराला । हा गांव नाहिं ग भला ॥ ४ ॥
प्रपंच लटका, न मिळे फुटका, कुऱ्याचा गलबला
डाका पडला म्हणति बोंबला । हा गांव नाहिं ग भला ॥ ५ ॥

कम अकलेचे, लुच्चे बच्चे, सुरकाविति दारूला
भिऊनि राहातें मी अन्नूला । हा गांव नाहिं ग भला ॥ ६ ॥
व्याघ्र लांडगे, मेले दांडगे, बळें झोंबिती अंगाला
वाचित जोशी पंचांगाला । हा गांव नाहिं ग भला ॥ ७ ॥
पडल्या दरड्या बरड्या वाहुनि पुर नवतीचा गेला
आडांत पडुनी ब्राह्मण मेला ! हा गांव नाहिं ग भला ॥ ८ ॥
चोरट्याच्या वाड्या माड्या काड्यांचा बंगला
चहूंकडूनि पहाड पेटला । हा गांव नाहिं ग भला ॥ ९ ॥
मंद बुद्धिचा निर्बळ राजा, प्रधान भेकड मेला
इथें बकासुर काळ सोकला । हा गांव नाहिं ग भला ॥ १० ॥
दशमद्वारीं शकुन पिंगळा पिंगळीला बोलिला
विष्णुदास म्हणे अनुभव आला । हा गांव नाहिं ग भला ॥ ११ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २१ ) पद

( चाल : छकड्याची–नियम पाळावे )

कुत्रा गुरगुर करतो द्वारीं । माझी हरणी येइ ना घरीं ॥ ध्रु० ॥
या कुत्र्याची आइ चोरटी । याची बाइल बहू तर्कटी ॥
याचीं दहा-पांच कारटीं । मोठीं खादाड, मोठीं माजरी ॥ मा० ॥ १ ॥
गेला माजुन हा दांडगा । शिरजोर थोर कोडगा ॥
याला खाइ ना वाघ लांडगा । याच्या दगड पडे ना शिरीं ॥ मा० ॥२॥
मोठ्या मोठ्याला डसतो बाई । हाडासकट मांस खाई ॥
हा उलथुन जाइ ना खाईं । तोंड घालतो भरल्या घागरीं ॥ मा० ॥३॥
माझं खाउन मसीं भांडतो । माझं अवघं घर धुंडतो ॥
माझ्या मागं मागं हिंडतो । मला फिरवितो जसि भिंगरी ॥ मा० ॥४॥

हा ग्रामसिंह माजरा । तुझा सिंह पहातां जरा ॥
मग पळेल निलाजरा । याची टळेल सारी गुरगुरी ॥ माझी० ॥ ५ ॥
तूं हरणि रक्षि पाडसा । तुझा कळीकाळावर ठसा ॥
महिषासुर वधिला जसा । हा शत्रु तसा संहारी ॥ माझी० ॥ ६ ॥
वेगें सिंहाद्रीवासिनी । आली सिंहावर बैसुनी ॥
म्हणे विष्णुदास हांसुनी । आतां तरलों भवसागरीं ॥ माझी० ॥ ७ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २२ ) पद

आलं चहुंकडुनी अभाळ ग । लेंकरू आपुलें संभाळ ग ॥ ध्रु० ॥
कशि बाइ निजलिस घरांत ग । निचिंत झोंपेच्या भरांत ग ।
फिरति मेघ अंबरांत ग । धडकिच भरली उरांत ग ।
वाऱ्यानं उठलें कपाळ ग । आलं चहुंकडुन० ॥ १ ॥
तिळभर दिसे ना उघाड ग । दिवस लपला ढगाआड ग ।
झालें काळकुट घबाड ग । आम्हि नाहिं सांगत लबाड ग ।
येइल पाणी बंबाळ ग । आलं चहुंकडुन० ॥ २ ॥
थंडिनें अंग कांकडेल ग । कडकड विज कडकडेल ग ।
अवचित मस्तकिं पडेल ग । पाहा बाइ, घर तुझें बुडेल ग ।
आतां नको थांबुं अंमळ ग । आलं चहुंकडुन० ॥ ३ ॥
आइविण लेंकरूं अनाथ ग । रडे दिनवाणी जनांत ग ।
मुखावरची काढ बनात ग । काय आहे सांग तुझ्या मनांत ग ।
डोळे पुसुन मुख कोमाळ ग । आलं चहुंकडुन० ॥ ४ ॥
नको नेउं गोष्ट ही हंशांत ग । चालली धूळ पहा घशांत ग ।
विष्णुदास भरवशांत ग । ये जगदंबे अशांत ग ।
येउं दे कृपेची उबाळ ग । आलं चहुंकडुन० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २३ ) पद

( चाल : धाव रे रामराया. )

धांव ग, धांव, आतां धांव, परम स्नेहाळे
रेणुके, रेणुके, तूं दिनजननि दयाळे ॥ ध्रु० ॥
विश्वाची जननी तूं जगदंबे, लेंकुरवाळे
येउं दे माझी कांहीं तुला करुणा कनवाळे ॥ धांव ग० ॥ १ ॥
निष्ठुर मन केलें मजवरती आगळें
तुझेंचि खेळ सारे, आलें कळून सगळें ॥ धांव ग० ॥ २ ॥
बहुत मी काय बोलूं, जिव माझा हा अरबळे
तुलाचि भांडतों मी माय, तुझ्याचि बळें ॥ धांव ग० ॥ ३ ॥
तुज कुणि नेसावया आणलें वसन पिवळें
पाठमोरी करुणेची गंगा पुनरपी वळे ॥ धांव ग० ॥ ४ ॥
बसलिस जेवावया तूं नेसुन सोवळें
असेल परि द्रवलें मन खाचित कोंवळें ॥ धांव ग० ॥ ५ ॥
कां न येशी मजवर आलें संकट दयाळे
गुंतलीस माउली तूं काय पाजावया बाळें ॥ धांव ग० ॥ ६ ॥
आकांत दुःख माझें कां न येवढें कळे
कानांत बसली कीं मळ-मातिचीं ढेकळें ॥ धांव ग० ॥ ७ ॥
हांका न ऐकुं देती दुष्ट दुरित कावळे
करती कल्कलाट तुजभोंवतीं सांवळे ॥ धांव ग० ॥ ८ ॥
श्रमलिस काय एक-विरे अजिंक्य विशाळे
उपेक्षीतां लागेल कीं निळरंग कविशाळे ॥ धांव ग० ॥ ९ ॥
जघन्य हृदय-सरोवर मानसमराळे
राहुं नको तरि आई, मजपासुन निराळें ॥ धांव ग० ॥ १० ॥
चिंतितां संकटाची सेना सकळ मावळे
विष्णुदास म्हणे म्हणती तुझे भक्त नामावळे ॥ धांव ग० ॥ ११ ॥

## ( २४ ) पद

( चाल : माझ्या मानिचें हितगुज सारें. )

श्रीजगदंबे, अंबे, रेणुके, यावें लवलाही
निशिदिनिं स्तवितों पदकमला, तवदर्शन मज देई ॥ ध्रु० ॥
उत्पत्तिस्थितिलय-कारण ही इच्छा तव माते
ब्रह्माविष्णूशंकरमूर्ती वर्तति तव सत्तें
इच्छामात्रें ब्रह्मगोळ हा नाचविसी आई ॥ निशि० ॥ १ ॥
सुरगणरक्षण असुरनिवारण कारण सगुणाला
प्रणतप्राणीपतितोद्धारा धरुनी रूपाला
मुनिजन-मानस-हंस परात्पर ध्याती निजहृदयीं ॥ निशि० ॥ २ ॥
लोपति रविशशि मुख-प्रभातळिं अगणित खद्योतसे
शोभति मौक्तिक-रत्न-सुमन-हार, दिव्यांबर खासें
सोहं सोहं शब्दें गर्जति नुपुरें तव पायीं ॥ निशि० ॥ ३ ॥
परमकृपाळे, दीनदयाळे, अंबे, आदिमाये
सिंहाद्रीवरि वास करिसि तूं भक्तास्तव पाहे
विष्णुदास पदिं रक्षण करुनी निर्मळ यश देई ॥ निशि० ॥४॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २५ ) पद

( चाल : जमका अजब तडाखा बे. )

तुम्हांला पावलि जगदंबा । अम्हांला भलि लागलि बाबा ॥ ध्रु० ॥
तुम्ही पंचामृतस्नान घालितां उटणें लावुन अंगा ।
आमच्या नयनाच्या तुंब्यांतुन वाहे झुळझुळ गंगा ॥ तुम्हांला० ॥ १ ॥
तुमची उंचिची नवि कंचुकि, साडी जरिकांठाची ।
अमुची वाकळ जुनि ठिगळाची सात-पांच बोटांची ॥ तुम्हांला० ॥ २ ॥

तुम्ही घालतां गोठ-पाटल्या, बाळ्या-बुगड्या, कंठा ।
आम्ही वाजवित उगीच बसलों अनुहाताचा घंटा ।। तुम्हांला० ।। ३ ।।
तुमची साखर-पुरि, साटोरी, बर्फी, जिलबी, ताजी ।
अमुची कसची तरि गरिबाची वरण, भाकरी, भाजी ।। तुम्हांला० ।। ४ ।।
तुमच्या अरत्या परत्या होती पंक्ति, तुपाच्या धारी ।
बिनतेलाचा दिवा लावुनी बसतों अम्हि अंधारीं ।। तुम्हांला० ।। ५ ।।
तुमची दक्षिणा, पान-सुपारी, अत्तर फूल चमेली ।
अमुची वासना वांझ बायको लटकी मायच मेली ।। तुम्हांला० ।। ६ ।।
विष्णुदास म्हणे, तुम्हीं तिला तरि इच्छित धन मागावें ।
आम्हि तर डोळे लावुन पहावें तोंड मिटुनिया गावें ।। तुम्हांला० ।। ७ ।।

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २६ ) पद

( चाल : नको करूं धरूं मनामधें आढी. )

आम्ही चुकलों जरी तरी कांहीं
तूं चुकूं नको अंबाबाई ! ।। ध्रु० ।।
तुझें नांव 'आनंदी' साजे
तुझा महिमा त्रिभुवनीं गाजे
तुझें सगुणरूप विराजे
तुला वंदिति सन्मुनि, राजे
गुण गाति वेदशास्त्रेंही ।। आम्ही० ।। १ ।।
आम्ही अनाथ, दीन, भिकारी
तूं समर्थ, प्रभु, अधिकारी
आम्ही पतित पातकी भारी
तूं पावन भवसंभारीं
तूं पर्वत, आम्ही रज-राई ।। आम्ही० ।। २ ।।

आम्ही कुपुत्र म्हणउन घेऊं
तूं नको कुमाता होऊं
आम्ही विषय-ढेकळें खाऊं
तूं प्रेमामृत दे खाऊं
आम्ही रांगूं, तूं उभि राही ॥ आम्ही० ॥ ३ ॥
आम्ही केवळ जडमूढ प्राणी
चैतन्यस्वरूप तूं शाहाणी
फद् बोबडी आमुची वाणी
तूं वदुं नको आमुच्या वाणी
आम्ही रडुं, तूं गाणें गाई ॥ आम्ही० ॥ ४ ॥
आम्ही चातक तुजविण कष्टी
तूं करीं कृपामृतवृष्टी
म्हणे विष्णुदास धरि पोटीं
अपराध आमुचे कोटी
अशि आठवण असुं दे हृदयीं ॥ आम्ही० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २७ ) पद

( चाल : थोर तुझे उपकार. )

राहुन गेलि मनांत । मनाची ॥ ध्रु० ॥
दुर्दैवयोगें मोहमायेनें – लाविलि आडवि कनात । मनाची ॥ १ ॥
समदृष्टीनें तुज पाहावें – तुझे गुण गावे भजनांत । मनाची ॥ २ ॥
तुजकडे येतां मार्ग दिसेना – धुळ पडली नयनांत । मनाची ॥ ३ ॥
या षड्रिपु-निष्ठुर-यवनांनीं – गांठिलि गाय वनांत । मनाची ॥ ४ ॥
काळ जिवाच्या सुखसदनाच्या – शिरला चोर धनांत । मनाची ॥५॥
विष्णुदास म्हणे तुजविण हें मुख । दाखवुं काय जनांत । मनाची॥६॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २८ ) पद

( चाल : निरम पाळावे. )

निजलिस कायी । उठ लवकर अंबाबाई ॥ ध्रु० ॥

तूं निजलिस शाल पांघरून । गेलीस झोंपिं घुरघुरून ।
आला काळ जवळ गुरगुरून । अग आइ, आई ॥ उठ० ॥ १ ॥

हा मनाजी द्वाड गायकी । याला दिली घरचि नायकी ।
हा प्राण घेतो काय कीं । अग आइ, आई ॥ उठ० ॥ २ ॥

तूं आहेस झोंपेच्या भरांत । पहा शिरले चोरटे घरांत ।
माझ्या धडकिच भरली उरांत । अग आइ, आई ॥ उठ० ॥ ३ ॥

काम-क्रोधादिक हे मांग । पुष्पांचा मोडिति बाग ।
चहुंकडून लाविली आग । अग आइ, आई ॥ उठ० ॥ ४ ॥

सांभाळि अपुलें लेंकरूं । नको माते, उपेक्षा करूं ।
म्हणे विष्णुदास कसें करूं । अग आइ, आई ॥ उठ० ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( २९ ) पद

( चाल : दत्त अवधूत अवधूत निराकार. )

आई जगदंबा श्रीमंत कृपाघन मोठी
किती वर्णावी गंभीर गुणांची कोटी ॥ ध्रु० ॥

अखंडित गंगासौभाग्य मूळ-पिठवासी
असें घडवेना लावण्य ब्रह्मदेवासी
धन्य जन मातापुरपुण्यक्षेत्ररहिवासी
स्वर्ग-सुखगामी लाविती हात दैवासी
घडिंत घडि मोडी ब्रह्मांडें कोटिच्या कोटी ॥ किती० ॥ १ ॥

भांग, भुजंगनिळवर्णवेणी माथ्याची
नाकीं नथ साजे नक्षत्रतुल्य मोत्यांची
अंगामध्यें खाशी कंचुकी तंग बेताची
दंडिं बाजुबंद, कंकणें खुल्तीं हातांचीं
जडित हार कंठीं, नवरत्न मुद्रिका बोटीं ॥ किती० ॥ २ ॥
पितांबर पिवळा, नारळी पदर जरतारी
दिनाची आई झांकुनी शिरावर तारी
भक्त आवडीनें बैसवी कुसुम-कल्हारीं
नाचे गण द्वारीं, एळकोट बोले मल्हारी
योगीजन घ्याती, सन्मुनी जपती जप ओठीं ॥ किती० ॥ ३ ॥
सदा आनंदी आनंदी सत्य वचनाची
दर्शनासाठीं सांगुनि धाडी सूचनाचि
कुसंगत तोडी म्हणे विष्णुदास कुजनांची
हाची वर देईं आवडी सत्य भजनाची
उपेक्षा न करीं अपराध घालुनी पोटीं ॥ किती० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३० ) पद

किति धरसिल तरि अबोला ग ।
बाई, तुझा स्वभाव नाहीं हा भला ॥ ध्रु० ॥
श्रीमूळपीठनायके । कैवल्यसुखदायके
माझी विनंती आयके ।
तूं बाप, माउली, गुरू । मी लेंकरूं । नको दुर करूं ।
तुझा पुराणीं बहु गलबला ग ॥ बाई० ॥ १ ॥
मला जन्ममरण लाविलें । त्वां दारोदारिं फिराविलें ।
नाहीं क्षणभर सुख दाविलें ।

अतां प्रसादफळ दे करीं । करुणा करीं । बोल झडकरीं ।
मीं देह तुला विकला ग ॥ बाई० ॥ २ ॥
मजविषयीं विश्वंभरे । मुखिं धरले मुग-हरभरे ।
तरि वाटति हरिहर बरे ।
बोलती उघड । तारिती दगड । देति फळ रगड ।
तूं देसि न कण-टरफला ग ॥ बाई० ॥ ३ ॥
माय, ठेवुं नको राग पोटांत । तुझ्या अमृतरस ओठांत ।
कळसूत्र कळा बोटांत ।
धरूं नको ओढ । अबोला सोड । बोल मांसि गोड ।
फोड मोत्याचा जोड शिंपला ॥ बाई० ॥ ४ ॥
मी अनाथ दिन दुर्बळ । दिनदयाळ तूं केवळ ।
तुला येउं दे माझी कळवळ ।
बुडतों डोहांत । चाललों वहात । काढ, दे हात ।
तुझ्या वंदितों मी पाउला ॥ बाई० ॥ ५ ॥
मी असुनी नर अधम । जगिं केलेंस पुरुषोत्तम ।
म्हणे विष्णुदास उत्तम ।
रेणुके माय । दाखवी पाय । पहासी काय ।
पुढें कथा भाग संपला ग ॥ बाई० ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३१ ) पद

तुला माझी आठवण कशानं यावी
मला तुझी भेट गडे कशानं व्हावी ॥ ध्रु० ॥
तुला नथ, फुलबाळ्या, बुगड्यांची जोडी
माझ्या नाकामधें बाई ! गवताची काडी
तुला लाल शालजोडी, पिवळी साडी
मला काळी चोळी, जुनी लुगड्याची घडी

तुला छान रंगित भिंगाची माडी
माझ्या घरीं ऊन, वायु, पावसाची झडी
तुला तूपसाखर खाण्याची गोडी
मला तेल, मिठ, पिठ, चिंचेची कढी
तुला केशराची उटी मिठाई नवी ॥ मला० ॥ १ ॥
तुझ्या पुढें उभे देव तेतीस कोटी
माझ्या बाई ! सटवाइ लागली पाठीं
जगताची राणी तूं खरीच मोठी
मी दीन, दुर्बळ, जन्माची खोटी
तूं आइ, गंगे, क्षमेची कोटी
मी बाइ, अवगुणि कोट्यानकोटी
लेकिची ममता धरुनि पोटीं
आइ मजला घे, पसर ओटी
अशीच समजुन समज द्यावी ॥ मला० ॥ २ ॥
तुझ्या घरिं हत्ती, घोडे, बैल, म्हशी
माझ्या घरीं खटमल, उंदीर, घुशी
तुला गादी, गिरदी, पराची उशी
मला काय, घोंगडिची नसावी दशी !
तुझ्या बहु भरलें कपट कुशीं
माझ्या काय फेडशिल मनाची खुषी
चतुर शाहणी तूं आई कशी
पराच्या चाइड्या ऐकशी कशी
लेंकराच्या काय माय पडली दावीं ? ॥ मला० ॥ ३ ॥
तुला काय देउं गुळ, फुटाणे, लाही
भिकारी नवरा करुं गत काई
वेडी मी जाहलें तुझ्याच पायीं

सोडिला संसार, दिली भरपाई
जन्माचि दय-दय अग आइ, आई
करशी किति तरि सांग बाइ, बाई
होउन गेलें मी दिन गाइ गाई
म्हणुन तुजकडे आलें घाइघाई
तुला मी जात्यावर गाइन ओवी ॥ मला० ॥ ४ ॥
शिंदळ सासु माझी, सासरा पाजी
निःसंग नवरा उगाच गांजी
तूं माय, मावशी, बहिण, आजी
किति तरि करुं मी हांजी हांजी
प्रीतिची भाकर, मेथिची भाजी
गोड करिं, प्रीतिच्या रीतीनं माझी
तुजविण नसे मज आवड दुजी
खरेंच रेणुके ! शपथ तुझी
विष्णुदास म्हणे प्रचीती पहावी ॥ मला० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३२ ) पद

( चाल : विनंति करुनि चित्त. )

असं नको करुं अंबाबाई । तुला जन हंसतील अग आई ! ॥ ध्रु० ॥
पितांबर आइचा जरिकांठी । मुलाच्या वस्त्राला गांठी ।
तुला सोन्याची ताट-वाटी । मला जेवाया नरोटी ।
आइ, तूं श्रीमंतिण मोठी । दरिद्री आलों तुझ्या पोटीं ।
कल्पवल्लिच्या फळाला ही । कुहिरी फुटली नवलाई ॥ असं० ॥ १ ॥
तुला क्षिर, बेसन, दळ, करंज्या । बुंदि, श्रीखंड, पुऱ्या ताज्या ।
शर्करा, दधि, नवनीत, अज्या । सांडगे, वडे, पापड, भाज्या ।

आइच्या घरिं घन गडगंजा । मूल वाजवि फाल्गुन-वाजा ।
स्वेच्छित भोजन सर्वांही । म्हणसि कां मज दुर सर, पाही ॥ असं० ॥२॥
गळ्यामधिं मुक्तहार डुलती । कुंडलें कानीं लखलखती ।
रवि, शशी, मुकुटापुढें दिपती । वंदिती पद अमराधिपती ।
आइ तुझि अगणित संपत्ती । अपरिमित माझी विपत्ती ।
तुझ्या गृहिं शत कोटी गाई । मला ताकाची महागाई ॥ असं० ॥ ३ ॥
त्रिभुवन राणीच्या गांवीं । अम्हीं काय भिक्षा मागावी ? ।
आरामी आइनें भोगावी । मुलाची ममता त्यागावी ।
कुणाला गोष्ट ही सांगावी । जगामधें काय महिमा गावी ? ।
विष्णुदासाची प्रार्थना ही । वंचना करणें बरें नाहीं ॥ असं० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३३ ) पद

आली आई भवानी स्वप्नांत ॥ ध्रु० ॥
श्रीवरदा सुप्रसन्न मूर्ति । जशि विज चमके गगनांत ॥ १ ॥
सरळ भांग, निळ भुजंगवेणी । काजळ ल्याली नयनांत ॥ २ ॥
रत्नजडित हार, पीत पितांबर । कंचुकि हिरवी अंगांत ॥ ३ ॥
केशर-कस्तुरि-मिश्रित तांबुल । लाल रंगला वदनांत ॥ ४ ॥
कंकणें कनकाचीं खणखणती । वाजति पैंजण पायांत ॥ ५ ॥
विष्णुदास म्हणे अशिच निरंतर । दे आवडि मज भजनांत ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३४ ) पद

( चाल : विनंति करुनि चित्त वळवा. )

रेणुके ! मजला मुळ धाडी । आतां या दुःखांतुन काढी ॥ ध्रु० ॥
तुझ्याविण मी तिळ-तिळ तुटतें । कठिण दिन कांट्यावर कंठितें
भेटिच्यासाठीं उरिं फुटतें । पडे ना चैन मला कुठं तें

निरोधुनि मन, डोळे मिटते । घडोघडिं दचकुन परि उठतें
पडलें भव चिंतेच्या रहाडीं । आतां या दुःखांतुनि काढी ॥ १ ॥
पती येउं देइना शेजारीं । फजिती करीतो बाजारीं
सवतिनें गांजियलें भारी । ऐकिलें अससिल परभारीं
मंडळी सासरची सारी । मला सुख देति न संसारीं
अटकलें मेल्याचे दाढीं । आतां या दुःखांतुनि काढी ॥ २ ॥
भेटतां भार्गवरामासी । पावतिल प्राण आरामासी
जोगवा मागिन सुखवासी । अथवा राहिन उपवासी
परी मी येइन तुजपाशीं । वांचवी अथवा दे फांसी
वल्कलें अथवा दे साडी । आतां या दुःखांतुनि काढी ॥ ३ ॥
वाटते लटकीं कां घाई । नव्हे ही लटकी कांगाई
धाडिते सांगुनि सूचना ही । उपेक्षा करणें बरें नाहीं !
खचित मी बाइ, तुझ्यापायीं । टाकितें उडि गंगा-डोहीं
पडो या जगण्यावर धाडी । आतां या दुःखांतुनि काढी ॥ ४ ॥
शुभासनिं आश्विन मासाची । स्थापना घटि नव दिवसांची
विलोकिन यात्रा वर्षाची । तोरणें येतिल नवसाचीं
परम दिनदयाळ तूं साची । माउली विष्णुदासाची
वसशी मृगराज-पहाडीं । आतां या दुःखांतुनि काढी ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३५ ) पद

( चाल : एडका मदन. )

आई, खरंच ग । जें केलंस तें बरंच ग ॥ ध्रु० ॥
माझी धन-दौलत, बायको । तुझ्या मनांत वाटली नको ।
जन्माची फद्फद् । कर्मोची खद्खद् ।
झटपट केलिस दूरच ग । आई, खरंच ग ॥ १ ॥

काय विषयाचें सुख । रंधनांत भरलें विख ।
जिव जाण्याचं । नव्हे जगण्याचं ।
हें मरणाचं घरच ग । आई, खरंच ग ॥ २ ॥

पायीं धरूनि मगर ओढिती । सर्वांगीं मत्स्य तोडिती ।
प्रपंच खोटा । दुर्धर मोठा ।
दुःखाचा सागरच ग । आई, खरंच ग ॥ ३ ॥

इथें नच कोणाचें कोणी । ही भ्रममाया देखणी ।
अवघेच लटके । बटीक बटके ।
कुटक्याचे चाकरच ग । आई, खरंच ग ॥ ४ ॥

अब मैं तो हुवा बेफिकीर । तगादिरसे बन गये फकीर ।
क्या कहूं प्यारी । कुदरत तेरी ।
मोरि पिछे रही डरच ग । आई, खरंच ग ॥ ५ ॥

तूं अनाथाची माउली । तूं कल्पतरूची साउली ।
मोठिच तळमळ । दीनाची कळवळ ।
बहु कोमल तुझें उरच ग । आई, खरंच ग ॥ ६ ॥

तूं ब्रह्मप्रणवरूपिणी । ब्रह्मांडपिंडव्यापिनी ।
तूं नरनारायण । नारायणी ।
पार्वती-शिव-शंकरच ग । आई, खरंच ग ॥ ७ ॥

श्रीमूळपीठनायके ! । जय भवानि, माय, रेणुके ! ।
परम कृपाळे ! दीनदयाळे ।
ये आतां लवकरच ग । आई, खरंच ग ॥ ८ ॥

तूं मायच, मी लेंकरूं । नको माझि उपेक्षा करूं ।
नको प्रीत तोडूं । नको दुर दवडूं ।
नको सोडुं, हातीं धरच ग । आई, खरंच ग ॥ ९ ॥

तुझा छंद लागला मला । किति सांगुं माय, मी तुला ।
रूप पाहण्याचा । गुण गाण्याचा ।
दे भजनाचा वरच ग । आई, खरंच ग ॥ १० ॥
मजसाठीं घाबरून मनांत । तूं आलिस भरल्या उन्हांत ।
नाहिं कुठं गमलिस । बहुत श्रमलिस ।
आला घाम दरदरच ग । आई खरंच ग ॥ ११ ॥
तुझे चरणकमल पाहुं दे । तुझ्याजवळ मला राहुं दे ।
विष्णुदास म्हणे । अशीच जननी ! ।
मजवरी करुणा करच ग । आई, खरंच ग ॥ १२ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३६ ) पद - तुळजादेवीचें

( चाल : माझा कृष्ण देखिला. )

आदिश्रीजगदंबा गिरिजा । जानकीरूप धरी ॥ ध्रु० ॥
हरिणामागें बळेंचि पिटाळी । तिच्यासाठीं तरू कवटाळी
पडला मायेच्या घोटाळीं । तो मनिं चिंती मदनारी ॥ १ ॥
वाहति नेत्रांतुनि जळधारा । हिंडे धुंडित जंगल सारा
दावा म्हणे मज माझी दारा । हा हा नारी ! हा नारी ! ॥ २ ॥
यास्तव आतां हे विरुपाक्षा । पहाते जाउन त्याची परिक्षा
ऐसी कल्पुनि चित्तिं अपेक्षा । आली वनामधें श्रीगौरी ॥ ३ ॥
आपण जातां दुर वनिं रामा । मागें राक्षस येउनि धामा
नेतां मजला श्रीघनश्यामा । झाले वनांतरिं श्रम भारी ॥ ४ ॥
बोले जनकाचा जांवाई । येथें कोठें सांग तुकाई
विष्णुदास म्हणे तुळजाबाई । ये लवलाही, मज तारी ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३७ ) पद

( चाल : असा धरि छंद. )

तुळजाबाई ! ये धांवत माझे आई ! ॥ ध्रु० ॥
सकळ तूं विश्वाची माउली । अमितजन कल्पद्रुमसाउली
चिंतितां बहुतांला पावली । देति श्रुति ग्वाही ॥ ये धांवत० ॥ १ ॥
पुराणें म्हणति शोध लागला । दिनांची थोर काळजी तुला
हें सत्य प्रत्यया मला । येत कां नाहीं ? ॥ ये धांवत० ॥ २ ॥
विषादें लपविसि तारकपाय । पतित मग भवनिधि तरतिल काय
क्षमा कर शतकोटी अन्याय । लागतों पायीं ॥ ये धांवत० ॥ ३ ॥
शरण मी आलों कुलस्वामिनी ! । तुझे गुण सकल गुणांहुनि गुणी
खुंटते ब्रम्ह्याची लेखणी । आटली शाई ॥ ये धांवत ॥ ४ ॥
विष्णुदासास दान दे जुनं । वांचवी प्रेमामृत पाजुन
कथा किति गाउं अशा मोजुन । तुझ्या तुकाई ॥ ये धांवत० ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ॐ ! ! !

## ( ३८ ) अभंग

जय सौभाग्यमंडित । वज्रचुडे अखंडित ॥ १ ॥
जय मंगळवर्धिनी । जय यज्ञेश्वरनंदिनी ॥ २ ॥
तुला माझा नमस्कार । माये, तुझा जयजयकार ॥ ३ ॥
आइ ब्रह्मांडनायके । माझी विनंती आयके ॥ ४ ॥
प्रेमा हृदीं असो द्यावा । माझा समाचार घ्यावा ॥ ५ ॥
बहुत कायसें बोलणें । आतां लोभ असूं देणें ॥ ६ ॥
विष्णुदास लागे पायीं । पुन्हा भेट अंबाबाई ॥ ७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ३९ ) अभंग

मन लागलें लागलें । तुझ्या स्वरूपीं रंगलें ।
अंबे, तुझें चंद्रबिंब । दिसे चांगलें चांगलें ॥ ध्रु० ॥
सुरत सुंदर सांवळी । साडी शोभते पिवळी ।
रत्नदीप प्रभावळी । मोती-माणीक-पोंवळीं ।
तुझे गातां रूपगुण । वेद भागले भागले ॥ ॥ मन० ॥ १ ॥
माय, तुझ्या भेटीसाठीं । आशा लागलीसे मोठी ।
माझे अगणीत कोटी । अपराध घाली पोटीं ।
नको आठवूं अवगुण । आतां मागले मागले ॥ मन० ॥ २ ॥
आनंदीचा परमानंद । सुगंधाचा सुखसुगंध ।
दंडीं वांकी, बाजूबंद । लोलो लागलासे छंद ।
रात्रंदिन ध्यानीं सिद्ध । योगी जागले जागले ॥ मन० ॥ ३ ॥
अनाथांची तूं माउली । करि कृपेची साउली ।
कृपावंते, कल्पवेली । पाहिजे ना वायां गेली ।
विष्णुदास म्हणे मोतीं । जोडी भंगलें भंगलें ॥ मन० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४० ) अभंग

रूप सुंदर सुंदर । ध्याती योगी दिगंबर ॥ ध्रु० ॥
रत्नजडित सिंहासनीं । शोभे सिंहाद्रिवासिनी ॥ १ ॥
दिसे मळवट चांगला । मुखीं तांबुल रंगला ॥ २ ॥
साडी नेसली पिवळी । माय मनाची कोंवळी ॥ ३ ॥
नाना रत्न-अलंकार । अंगीं सर्व अधिकार ॥ ४ ॥
गोठ, पाटल्या, बांगड्या । कानीं मोत्यांच्या बुगड्या ॥ ५ ॥
शिरिं मोगऱ्याच्या कळ्या । पायीं पैंजण, साखळ्या ॥ ६ ॥
विष्णुदासमनव्यापिनी । भेट देई नारायणी ॥ ७ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४१ ) अभंग

आपुलीया बाळा आपुलीया करीं ।
मारी परि दूरी धरूं नको ॥ ध्रु० ॥
आपुलीया हातें कापावी ही मान ।
जगांत अपमान करूं नको ॥ १ ॥
श्वानापरी ठेवी आपुल्या संग्रहीं ।
परी परगृहीं धाडूं नको ॥ २ ॥
वाढवावें प्रेम पुरवावे कोड ।
ममतेचा मोड मोडूं नको ॥ ३ ॥
भवनदीमाजी चाललों वाहात ।
आतां मागें हात काढूं नको ॥ ४ ॥
विष्णुदास म्हणे अगे जगन्नाथे !
जननीचें नातें सोडूं नको ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४२ ) अभंग

अग आई, विश्वंभरे । दगा देणें नाहीं बरें ॥ ध्रु० ॥
लोभ लावूनि आगळा । मग कापूं नये गळा ॥ १ ॥
जेवुं घालुनी उपाशी । मग देऊं नये फांशी ॥ २ ॥
अंगीं लाउनी चंदन । करूं नये जेर-बंदन[1] ॥ ३ ॥
साखर देउनिया हातीं । वरी घालुं नये माती ॥ ४ ॥
बाळ घेउनिया काखीं । माय मळविता राखी ॥ ५ ॥
मुखीं हात फिरविसी । शत्रु-हातीं मारविसी ॥ ६ ॥

---

१ जेरबंद.

शिरीं झांकुनी पदर । करूं नये अनादर ॥ ७ ॥
आंधीं केली प्रतिपाळणा । आतां करासि कां हेळणा ॥ ८ ॥
रस प्रेमाचा पाजून । उगें घेसी कां गांजून ॥ ९ ॥
विष्णुदास म्हणे अभंग । अंबे, न करि मनोभंग ॥ १० ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४३ ) अभंग

अंबे, तुझ्या भेटिसाठीं । धीर धरवे ना पोटीं ॥ ध्रु० ॥
तुझ्या पहाता रूपाला । जिव माझा वारा प्याला ॥ १ ॥
उभा राहिलों अंगणीं । तुझी लागली जोगणी ॥ २ ॥
अंबे, सोडियलें घरदार । झालों जिवावर उदार ॥ ३ ॥
प्रावर्णाच्या केल्या चिंध्या । सोडिली म्यां स्नानसंध्या ॥ ४ ॥
यज्ञ-यागादि तर्पण । पायीं तुझ्या समर्पण ॥ ५ ॥
विष्णुदास हेंचि म्हणे । पाय पाहूं दे चिमणे ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

# भाग ३ रा



## देवतापर पदें

### ( ४४ ) पद–शंकराचें

( चाल : ध्रुपद )

गंगाधर हर स्मर वदनीं ।
प्रभु पूर्णदास अभिमानी ॥ ध्रु० ॥
खल त्रिपुरांतक रतिपतिदाहक ।
पावक भाल नयनीं ॥ गंगा० ॥ १ ॥
असुर सूर हर कर्पुरगौर प्रभु ।
जनतारक सुखसदनीं ॥ गंगा० ॥ २ ॥
व्याघ्रांबर शिव, शंकर सितकर ।
फणि वर धरत शयनीं ॥ गंगा० ॥ ३ ॥
सतत विषयवत पतित विष्णु कवि ।
मुक्त करित पद नमनीं ॥ गंगा० ॥ ४ ॥

ॐ !    ॐ ! !    ॐ ! ! !

### ( ४५ ) पद–श्रीनरहरीचें

( चाल : कृष्णा नको हंसु रे नको हंसु रे )

सकळांतरिं भरला । श्रीनरहरि अवतरला ॥ ध्रु० ॥
न कळे अनंत कोटी । अनंत ब्रह्मांडाच्या पोटीं ।
भरला परि उरला । श्रीनरहरि० ॥ १ ॥

सकळ धुंडितां सृष्टी । न पडे रविचक्षूच्या दृष्टीं ।
परि जगीं परिपुरला । श्रीनरहरि० ॥ २ ॥
न दिसे ब्रह्मकपाटीं । प्रल्हादाच्या वचनासाठीं ।
स्तंभीं गुरगुरला । श्रीनरहरि० ॥ ३ ॥
प्रभुच्या उग्र प्रतापें । सर-सारितांसह सागर तापे ।
कृतांत दरदरला । श्रीनरहरि० ॥ ४ ॥
क्षोभे सर्व पसारा । गिरिशिखरांसह भूगोल सारा ।
थरथर थरथरला । श्रीनरहरि० ॥ ५ ॥
निज वधू अहि-पर्यंकीं । सोडुनि शरणागत-रिपु अंकीं ।
मतंगवत धरिला । श्रीनरहरि० ॥ ६ ॥
विधिवचनाही पाळी । हिरण्यकश्यपु संध्याकाळीं ।
चर-चर-चर चिरला । श्रीनरहरि० ॥ ७ ॥
मानिति अमर दिवाळी । लक्ष्मी पंचार्ती ओवाळी ।
आनंद ओसरला । श्रीनरहरि० ॥ ८ ॥
करुणामृतरस गुरूचा । हृदयमंदिरीं कल्पतरूचा ।
अंकुर तरतरला । श्रीनरहरि० ॥ ९ ॥
विष्णुदास म्हणे शंभर । सुवर्णाचा हा विश्वंभर ।
पितांबर पांघरला । श्रीनरहरि० ॥ १० ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४६ ) श्रीमारुतीचें पद

( चाल : असा धरि छंद. )

मारुतीराया । ये संकट माझें हराया ॥ ध्रु० ॥
सदा मुखि रामनामजपसार । जाहला स्वयंभु शिव-अवतार
प्रबळ खळ, धरणीचा अनिवार । भार उतराया ॥ ये संकट० ॥ १ ॥

तुझ्या पुढें न टिके लंकापती । प्रतापें महाकाळ कांपती
विघ्नें शतकोटी लोपती । जाति दुरठायां ॥ ये संकट० ॥ २ ॥
कनक-पुरि सक्रोधें जाळिली । मुळांसह राक्षसकुळें खाणिलीं
बिभीषण रक्षुनिया, आणिली । रघुवीरजाया ॥ ये संकट० ॥ ३ ॥
तुझ्याबळें अवघें रामायण । वर्णिती सुरवर पारायण
चिंतिती तुज नरनारायण । शत्रु जिंकाया ॥ ये संकट० ॥ ४ ॥
आतां पाहुं नको निर्वाण । माझा कंठिं दाटला प्राण
म्हणे विष्णुदास तुझी आण । लागतों पाया ॥ ये संकट० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४७ ) पद – अनसूयेचें

( चाल : असा धरि छंद. )

काय तरि बाई । अनसुये ! तुझी चतुराई ॥ ध्रु० ॥
ब्रह्मा, विष्णु, शिव-शंकर । ज्यांचे सर्व देव किंकर
जाहलीं आई, तुझीं लेंकरं । उपकारा हीं ॥ अनसुये ॥ १ ॥
त्रिभुवनीं पतिव्रता मिरविती । लक्ष्मी, सावित्री, पार्वती
करिती येउनिया पर्वतीं । पदर-पसराई ॥ अनसुये ॥ २ ॥
तुझ्यापुढें तिन्ही देव राबती । तिघेंहि आज्ञेमधें वागती
तिघीजणी पति-दान मागती । देवदाराही ॥ अनसुये ॥ ३ ॥
दिधले जिचे तिला भर्तार । झाला दत्तात्रय अवतार
कृपाघन, जगद्गुरू, दातार । तुझ्या या पायीं ॥ अनसुये ॥ ४ ॥
तीर्थें, देव, ऋषी, मालिका । ऋद्धी, सिद्धि, महाकालिका
राहिली तुझ्या निकट रेणुका । एकवीरा ही ॥ अनसुये ॥ ५ ॥
विष्णुदास म्हणे संकट । निवारी धरिले पाय बळकट
दिनरजनीं माझी कटकट । नको दारा ही ॥ अनसुये ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४८ ) पद

( चाल : तुम्हां तो शंकर सुखकर हो. )

दयाळा, आलक, दत्ता, अवधूता
डमरू-कमंडलु-दंडपाणी, दिगंबरा, अमरा, श्रीधरा,
शंकरा, जगत्प्राणनिर्माणकर्ता ॥ आलक दत्ता० ॥ ध्रु० ॥
ब्रह्मा, विष्णु, शंकर, गुरुवर्या, आर्या, पवित्रा, विचित्रचरित्रा,
पंकजनेत्रा, कोमलगात्रा, अत्रिमुनीअनसुयासुपुत्रा
मुगुट, कुंडल, माधवेंद्रा, त्रिपुंड्रगंधा, भालचंद्रा,
रुंडब्रह्मांडखंडमाळा-अलंकृता, योगमुक्ता ॥ आलक दत्ता० ॥ १ ॥
दाता, त्राता, तूं जनिता, निर्दोषा, त्रिशीर्षा,
पुरुषावेषा, सुरेशा, अमलाभंगा, कलिमलभंगा,
ब्रह्मप्रकाशितलिंगा, निःसंगा, नमो सद्गुरू नारायणा,
नमो भक्तपरायणा ! नमो विष्णुदासनाथा ! सुशोभिता निगमपंथा !
आलक दत्ता, अवधूता ॥ दयाळा ॥ २ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ४९ ) पद

( चाल : भला जन्म हा तुला. )

सहस्रकमलदलपत्रिं विराजे निपट, निरंजन, मुनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ ध्रु० ॥
कनकरत्नमणिमय सिंहासन त्रिकोण माणिक पिठीं
ऐं – ऱ्हीं – क्लीं – बीजासंपुटीं
कोटी रविची प्रभा प्रकाशे अमृतसरोवरतटीं
सुशोभित कल्पद्रुम तळवटीं
परमहंससिद्धयोगिजन तिष्ठति पुढें योगिनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ १ ॥

मुलाधार-चक्राचा नायक नमिला गणपति अधीं
प्रार्थिला स्वाधिष्ठानीं विधी
मणिपुरचक्रीं चक्र धरी हरि सत्त्व गुणाचा निधी
सदाशिव नांदे अनाहतपदीं
गेला सुषुम्नानाडीअधारें ब्रह्मरंध्र लंघुनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ २ ॥
वदन मदन, तनु कोमल, घननिळमुगुट जटेचा शिरीं
बैसला आज्ञाचक्रावरी
शंख, चक्र, तलवार, गदा, धनु, चमकति अयुधें करीं
वंदिती ब्रह्मदेव, शिव, हरी
विष्णुदास म्हणे श्रीगुरुदत्तात्रय, तूं त्रिभुवन-धनी
अखंडित दृढ मुद्रा उन्मनी ॥ ३ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५० ) अभंग

तूं तो समर्थ दत्त दाता । नाम सोडिलें कां आतां ॥ १ ॥
जगन्माते, लेंकुरवाळे । काय निघालें दिवाळें ॥ २ ॥
कृपासिंधु झाला रिता । कोण्या अगस्तीकारितां ॥ ३ ॥
सुकीर्तीची सांठवण । काय नाहीं आठवण ॥ ४ ॥
भागीरथी कां बाटली । कामधेनू कां आटली ॥ ५ ॥
चंद्र थंडीनें पोळला । कल्पवृक्ष कां वाळला ॥ ६ ॥
विष्णुदास म्हणे कनका । ढंग लाउं नका नका ॥ ७ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५१ ) अभंग

गुरु, दत्तात्रय, अवधुता । ऐक अनसुयेच्या सुता ॥ १ ॥

वाचें म्हणतों दत्तात्रय । भोगितों मी तापत्रय ॥ २ ॥
प्रसादाची करितों आशा । विषयीं होइना निराशा ॥ ३ ॥
तुझा म्हणवितों शिष्य । नरकीं खर्चितों आयुष्य ॥ ४ ॥
तुझा म्हणवितों दास । सदा राहतो उदास ॥ ५ ॥
तुझा म्हणवितों किंकर । तुला लावितों करकर ॥ ६ ॥
तुझा म्हणवितों अंकित । बसतों अफु, गांजा, फुंकित ॥ ७ ॥
तुझा म्हणवितों आश्रित । नाहीं आत्मज्ञान श्रुत ॥ ८ ॥
तुझा जन्माचा सांगाती । जातों काय अधोगती ॥ ९ ॥
विष्णुदासाच्या हृदयस्था । याची बसवावी व्यवस्था ॥ १० ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५२ ) अभंग

वेगें येई दिगंबरा । जीव होतसे घाबरा ॥ १ ॥
भवसागरीं वाहतों । वाट तुझी मी पाहतों ॥ २ ॥
पाणी चाललें घशांत । धांव दयाळा अशांत ॥ ३ ॥
कंठीं दाटलासे प्राण । नको पाहूं निर्वाण ॥ ४ ॥
परिहरी या वेदना । अगा अत्रीच्या नंदना ॥ ५ ॥
आतां चाललों कीं बुडीं । तांतडीनें घाली उडी ॥ ६ ॥
देह गेलिया शेवटीं । आशा राहील शेवटीं ॥ ७ ॥
आधीं काढुनियां कांठीं । मग शिरीं हाणी काठी ॥ ८ ॥
कांहीं उरल्या अन्याय । मग त्याचा करणें न्याय ॥ ९ ॥
दीन झालों मी लाचार । फार कायसा विचार ॥ १० ॥
नाहीं अवकाशाची वेळा । किती सांगूं वेळोवेळां ॥ ११ ॥
विष्णुदासावर लौकरी । कृपावंता कृपा करी ॥ १२ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५३ ) पद–विठ्ठलाचें

( चाल : वसंति बघुनि. )

विठोबा पंढरपुरवासी
ये धांवत तूं दीनदयाळा ! किती अंत पाहसी ।। ध्रु० ।।
बुडालों या भवसंसारीं
काढी आतां केशवा ! माधवा ! कृष्णा ! कंसारी ! ।।
दिनाचें हें संकट वारी
दूर करी पतिताची चिंता, हरि तळमळ सारी ।।
उपेक्षूं नको आतां मजसी ।। ये धांवत तूं दीन० ।। १ ।।
प्रार्थितों तुला दीन-वाणी
तुजाविण कोणी नसे रक्षिता मजला निर्वाणीं ।।
धांवुनी त्वरें चक्रपाणी
संकट पडतां बहु उद्धरिले दिन-दुर्बळ प्राणी ।।
माझि कां दया न ये तुजसी ।। ये धांवत० ।। २ ।।
गळ्यामधिं तुळसीच्या माळा
मोरमुकुट निट, कटावरी कर, पीतांबर पिवळा ।।
एकदां दाखावि रूप डोळां
विष्णुदास म्हणे घनःश्याम ! गोपाळा !
लागतों तुझिया पायासी ।। ये धांवत० ।। ३ ।।
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# गुरूचीं पदें

## ( ५४ ) पद

गुरुमहाराज, गुरु । जय जय परब्रह्म सद्गुरू ।। ध्रु० ।।

तूं गुरुमाउलि समर्थ माझी, मी तुझें आइ, लेंकरूं
मी जडमुढ, अपराधी, म्हणुनी नको वायलें करूं ।। १ ।।

तूं गुरुनाथा, दीनअनाथां दाता, कल्पतरू,
असतां, संशय कां भवसागर न तरूं किंवा तरूं ॥ २ ॥
तूं पतितपावन, परमकृपाघन, कशास मी घाबरूं
तव गुण लिहितों, म्हणुनी इक्षू-पेक्षां सुंदर बरू ॥ ३ ॥
जिव जावो, वा राहो, परंतु नाम तुझें दृढ धरूं
विष्णुदास म्हणे स्वयें उद्धरुनि आणिकांतें उद्धरूं ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५५ ) पद

( चाल : जमूका अजब तडाखा वे. )

गुरूजी लिया मंत्र तेरा । दिल् तो भटक रहा मेरा ॥ ध्रु० ॥
अहं, सोहं, अजप-जप, का बाजा बजत है कानन मों
नही उखाडी परनारी की, सुरत गडी जो मन मों ॥ गुरूजी० ॥ १ ॥
बहुत अंग कू बमुत लगाकर, पेहना भगवा कपडा
आलक पुकारत आगे भगत है, पीछे पेट का लकडा ॥ गु० ॥ २ ॥
बैठा शिरपर जटा बढाकर, पीवे गांजा, घोटा
चेले जमाये जमा जमाकर, अंदर सट्टा बट्टा ॥ गुरूजी० ॥ ३ ॥
दुनियाखातर झूटा ढोंगी, बन्गये जोगीबच्चा
आत्मग्यान जबलग नहि पावे, तबलग चेला कच्चा ॥ गुरूजी० ॥ ४ ॥
विष्णुदास कहे वोही सच्चा पूरा मुरशद कहेना
मेरा मुझ कू रूप बतावे, आगे पकडकर आयना ॥ गुरूजी० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५६ ) पदें–आईनाथाचीं

( चाल : कबिरी जोगी. )

नाथ परब्रह्मगुरू आईनाथ ॥ ध्रु० ॥
तूं योगेश्वर, अवतरलासी परमेश्वरचि जनांत

तूं भव-भंजन, नाथ, निरंजन, रमसि रम्य विजनांत ॥ नाथ० ॥ १ ॥
त्वां दाखविलें निज मायेसी अखिल विश्व वदनांत
अखंड क्रीडसि मुळमायेच्या आनंदघन सदनांत ॥ नाथ० ॥ २ ॥
हृदयांबरिं चपळेसम पावसि उदय प्राण-पत्रनांत
तूं कुंडलिनी आई ! जगदंबे ! उलट-पलट नयनांत ॥ नाथ० ॥ ३ ॥
त्रिकोणमाणिक रंग-पिठासनिं रत्नखचित भुवनांत
अमृतसरोवरतटीं विराजसि पूर्ण चंद्र गगनांत ॥ नाथ० ॥ ४ ॥
औदुंबर पुण्यस्थळ निर्मळ भाविति विबुध मनांत
हे भवचिंतामणिपद देती कैवल्य-सुख नमनांत ॥ नाथ० ॥ ५ ॥
तूं आईनाथा* ! दीन अनाथां ! करसी सहज सनाथ
विष्णुदास म्हणे म्हणुनि प्रार्थितों मी हिन दीन अनाथ ॥ नाथ० ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५७ ) पद

( चाल : इस तन धनकी. )

श्रीगुरू आइनाथ, स्वामी, दयाळा ।
दाखवि निजपद परम कृपाळा ॥ ध्रु० ॥
जय औदुंबरभवनविहारा ! । हा जन्म-संबंधग्रह परिहारा ।
लावुनियां रजधूळ कपाळा । दाखवी निजपद परम कृपाळा ॥ १ ॥
या भवसागरीं धीर धरवे ना । शिणले हात वितभर तरवे ना ॥
अलोट अहंकार, लोट उमाळा । दाखवि निजपद० ॥ २ ॥
विषयाचें फळ विष अनुभवलों कीं । अमृतवचनें मज अवलोकी ।
अखिल जिवाचा तूंच जिव्हाळा । दाखवि निजपद० ॥ ३ ॥

---

* आईनाथ नांवाचे सत्पुरुष होऊन गेले, त्यांची समाधि उमरखेड येथें आहे. समाधिसन्निध त्यांचीं पदें केलीं आहेत.

स्त्री-सुत-गृह-सुख वाटे मोठें । अमुनी परि मृगजळवत् खोटें ।
पडलींसे झांपड तुघडेचि डोळा । दाखवि निजपद० ॥ ४ ॥
कृपा करावी आदि आइनाथे ! । विशेष बोलावें काय अनाथें ।
धरूं नये अंतरीं भाव निराळा । दाखवि निजपद० ॥ ५ ॥
प्रकट दिनाची आइ रेणुका ही । धरूं नये संशय अणुरेणु कांहीं ।
पाजित प्रेमामृत निज बाळा । दाखवि निजपद० ॥ ६ ॥
काय करूं गुरु-गुण-गणना मी । गाइन इति मति गुण-गण नामी ।
जपे विष्णुदास ही दृढ जपमाळा । दाखवि निजपद० ॥ ७ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५८ ) गुरूचें पद

( चाल : मंग घडो. )

अळस नको करूं ये गुरुराया ।
तुजविण नरतनु जाईल वायां ॥ ध्रु० ॥
या भवकाननिं भय बहु वाटे । डोंगर अजगर कंटक वाटे ॥
षड्रिपु वृकव्याघ्र टपलेत खाया ॥ तुजविण० ॥ १ ॥
संसार शिरीं भार थोर पसारा । पळतां नये आशा चिखलाचि सारा
सर्पदशेंद्रियें वेष्टिलें पायां ॥ तुजविण० ॥ २ ॥
पडला गळ्यामधें पहा काळफांसा । आपपर जन सारे पहाति तमाशा ॥
स्त्रीसुत प्रियमित्र नये सोडवाया ॥ तुजविण० ॥ ३ ॥
अज्ञान तमदरी जों घसरावें । मुचलें भले तुझे पाय स्मरावे
प्रगटविसी ज्ञानभास्करोदया ॥ तुजविण० ॥ ४ ॥
कराशिल सत्य दया विष्णुदासा । आहे तुझा मनिं दृढ भरोंसा
आशिच सदा मति दे गुण गाया ॥ तुजविण० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ५९ ) गुरुस्तवन

( वृत्त : दिंडी. )

अतां केव्हां तरि याल गुरूराया ।
मला दत्तात्रय स्वामि उद्धराया ॥
विविध दुःखें लागलों घाबराया ।
अतां केव्हां तरि याल गुरूराया ॥ १ ॥
बाळपणचा अज्ञान खेळ झाला ।
तरुणपणाचाही बहर निघुन गेला ॥
शुभ्रवर्णी वृद्धापकाळ आला ।
हातपायहि लागले चांचराया ॥ अतां० ॥ २ ॥
काम-क्रोध-मद-मोह-मत्सरांनीं ।
जसा धरिला व्याघ्रेंचि वत्स रानीं ॥
तसा झालों व्याकूळ शरीरांनीं ।
नीरवार्णी लागलों हंबराया ॥ अतां० ॥ ३ ॥
जवळ बसला येऊन काळ नाका ।
भेटिसाठीं हनुवटी आलि नाका ॥
सुना म्हणती वृद्ध हा मरेना का ।
उगा उरला सदनांत खांकराया ॥ अतां० ॥ ४ ॥
कुटुंबाचा त्रासला कीं आखाडा ।
म्हणती वैद्याचा पाजुं नका काढा ॥
अतां वेगें बाहेर यासि काढा ।
याचें भय वाटतें लेंकरा या ॥ अतां० ॥ ५ ॥
तुझे अक्षयीं विजयी सदा बाहू ।
तुझ्यावीण कोणासि सांग बाहू ॥
विष्णुदास म्हणे घाल उडी बाहू ।
नको पाहूं निर्वाण अंत राया ॥ अतां० ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६० ) पद–गंगेचे

( चाल : दत्तअवधूत अवधूत )

सदा शुभवदने ! । भव-पाप-ताप-भंगे
कृपा करि, नमोस्तु ते गंगे ! ॥ ध्रु० ॥
अखंडित जननी ! । तुझि निर्मळ जळधारा
वहाते जगिं जगदोद्धारा
पुण्योदकस्नानें । जडमूढ पुरुषदारा
पावतीं मोक्षाच्या दारा
प्रकट जहाली कीं । विश्वाच्या आधारा
परम धर्मार्थ तुझा धारा
परम सुपावित्रे । गुणमंडितसौभाग्ये !
कृपा करि, नमोस्तु ते गंगे ॥ १ ॥
आतां मजवरती । करि करुणा निर्वाणीं
प्रार्थितों तुला दीनवाणीं
पतितपावन तूं । लावण्यरूपखाणी
दयाघन तुजसम नसे कोणी
पवित्रचि होती । मतिमंद, मूढ, प्राणी
प्राशितां तुझें प्रांजळ पाणी
सदोदित हृदयीं । म्हणे विष्णुदास रंगे
कृपा करि, नमोस्तु ते गंगे ॥ २ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# भाग ४ था



## कृष्णलीला

### ( ६१ ) पद-गार्‍हाणें

तुझा मूल लाडका तुला । अहो बाइ! तुला
यशोदे कृष्ण आटोपी आपुला ॥ ध्रु० ॥
याचा एकहि नसे गुण सुधा । नाहीं तिळभर भिड-मर्यादा
रस्त्यांत हटकतो सदा
( चाल ) शिरजोर बोलतो धीट
करितो किटकीट
रीत नाहिं नीट । फार वाईट
आम्ही गरति नारी भितों कीं अब्रुला ॥ १ ॥
दह्या-दुधाचे, घट फोडितो । पायिं धरुनि पोरें ओढितो
गायिचें वत्स सोडितो
( चाल ) हा आमुच्या पायिंच्या पायीं
लागला पाही
जरा भित नाहीं । करावें काई
बाइ! दोन्हि हात जोडावे या मुला ॥ २ ॥
याची बरी न सहसा नजर । याच्या संगतिनें गवळिणि सदर
टाकिति खांद्याखालिं पदर
( चाल ) उडविती रंग, गुलाल,
सदा मुख लाल
सोडिला ताल । सदा बेताल
ऐकेना सून गुरकावी सासुला ॥ ३ ॥

हा बुडविल अमुच्या कुळा । टाकोनि जावें गोकुळा
यानें केला जिव खुळखुळा
( चाल ) तूं तरी यासि सुंदरी
हृदय-मंदिरीं
बांध लौकरी । गवसला हरी
सदा विष्णुदास वंदितो पाउलां ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६२ ) पद—मुरली

फार मधुर मुरली मुरली । हरि तुझी ॥ ध्रु० ॥
वाजे वृंदावनिं यमुनातिरीं धुंदिच मनिं भरली भरली ॥ १ ॥
ऐकुनि मंजुळ ध्वनि गोपीची प्रांजळ मति मुरली मुरली ॥ २ ॥
निर्लज्जित इव, विगलित पल्लव, धांवत वनिं शिरली शिरली ॥ ३ ॥
नेसुनि भरजरि पीतांबर, घरिं, कंचुकि विसरली विसरली ॥ ४ ॥
पाहुनि हरिनें, तनु कवटाळुनि, हृदयीं दृढ धरिली धरिली ॥ ५ ॥
विष्णुदास म्हणे, निजसुखसंगा, इच्छा मनिं उरली उरली ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६३ ) पद

कृष्ण, गोविंद, गोविंद । अवघाचि येथें भरला ब्रह्मानंद ॥ ध्रु० ॥
जेथें तेथें गोकुळांत । द्वारीं, बाहेर, देवळांत,
जणुं तंतु । पाठीं भासे लांब-रुंद ॥ कृष्ण० ॥ १ ॥
भासे यमुनेचें पाणी । मत्स्य-कच्छ-चक्रपाणी
वाळवंटीं । ऐल-पैल-कांठीं द्वंद्व ॥ कृष्ण० ॥ २ ॥
येथें कोण कोणा लक्षी । हरी झाला वृक्षपक्षी
मुळशाखा । फळ पुष्पांचा सुगंध ॥ कृष्ण० ॥ ३ ॥

गोपी, गोपाळ, गवळी । गाय जांभळी, ढवळी
बहुरंग । रंगि रंगला मुकुंद । कृष्ण० ॥ ४ ॥
वाचें बोलणें, चालणें । कृष्णनाम देणें घेणें
विष्णुदासा । मनोमनीं कृष्णछंद ॥ कृष्ण० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## रासक्रीडा-पदें

### ( ६४ ) पद

( चाल : गड्यांनो कृष्ण गडी अपुला. )

एकदां शरदृतुकाळीं । वाजवि मुरली वनमाळी ॥ ध्रु० ॥
रात्र प्रफुल्लित चंद्रप्रभे । अधिकच वृंदावन शोभे
डोलति फणसांजिर, आंबे । केळि, नारळी, डाळिंबें
बदाम, नारिंगें, निंबें । सबें, चकोत्रें, करकंबें
नाना वृक्षांच्या जाळीं ॥ वाजवि मुरली० ॥ १ ॥
ऐकुनिया मुरलिचा ध्वनी । चित्तिं चमकल्या नितंबिनी
किंचित निद्रा न ये नयनीं । चैन पडे ना सुखशयनीं
प्रकट जाहला काम मनीं । बहु तळमळती गजगमनी
आल्या वृंदावनस्थळीं ॥ वाजवि मुरली० ॥ २ ॥
पहिली सुंदररूप चिमणी । दुसरी चंपककळि रमणी
तिसरी गौळण शिरोमणी । चौथी चांदणि मनहरणी
एकाहुन एक सुलक्षणी । व्रजललना नव लक्ष जणी
आल्या यमुनेच्या पाळीं ॥ वाजवि मुरली० ॥ ३ ॥
विरक्त होउनि संसारीं । गोपि चिंतिती कंसारी
अवघ्या भुलल्या व्रजनारी । हृदयिं व्यापिला पुतनारी
नाना-नाटकरूप हरी । पीत पितांबरगिरिधारी
विष्णुदास म्हणे, करकमळीं ॥ वाजवि मुरली० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६५ ) पद

( चाल : गडयांनो कृष्ण गडी अपुला. )

वृंदावनिं त्या गोपि हरी । रासमंडळीं क्रिडा करी ॥ ध्रु० ॥
चिमणी वाजवि सारंगी । सगुणि थाप दे मृदंगीं
सन्मुख गायन करि रंगी । चांगुणि डोले चौरंगीं
गुलाल उडवी नारंगी । टिपरि ताल दे भारंगी
उडे रंगाची पिचकारी । रासमंडळीं० ॥ १ ॥
शोभे चंद्रावळ जवळी । कुंचुकि अंगामधिं पिवळी
हरिणाक्षीची तनु कवळी । चुंबन देउनियां कवळी
व्रजांगनेला त्या काळीं । लंपट झाला वनमाळी
दाखवि लीला परोपरी ॥ रासमंडळीं० ॥ २ ॥
पाहुनिया एकमेकिकडे । म्हणति " आमुचें सुख केवढें !
त्रिभुवनिं पाहतां न सांपडे । तो हरि नाचे अम्हांपुढें !
अम्हि प्रियकरणी अलीकडे । लक्ष्मी अमुच्या पलीकडे ! "
गर्व दाटला मनिं भारी ॥ रासमंडळीं० ॥ ३ ॥
" अमुच्या घालुन मिठी गळां । वश जाहला घनसांवळा ! "
बघुनि गोपिंच्या गर्वाला । गुप्त वनामधें हरि झाला
निकर शेवटीं हा केला । कोणी अमुचा हरि नेला
विष्णुदास म्हणे, अशा परी ॥ रासमंडळीं० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६६ ) पद

( चाल : गडयांनो कृष्ण गडी अपुला. )

सोडुनि वृंदावनिं युवती । गुप्त जाहला यदूपती ॥ ध्रु० ॥
जगिं अंतरला जगजेठी । गोपि जाहल्या बहु कष्टी
म्हणति " धुंडितां ही सृष्टी । कुठें पडे ना हरि दृष्टीं

दुष्टा, मेल्या, परमेष्ठी ! । काय लिहियलें अदृष्टीं
निष्ठुरता अशि करूं नव्हती !" ॥ गुप्त जाहला० ॥ १ ॥
गोपी पुसती वृक्षाला । " कुठें आमुचा हरि गेला ? "
जाइ, जुइ, चंपक, मालतिला । गुलाब, गुलछबु, शेवतिला
कुंद, चमेली, केतकिला । शोध हरीचा जिला तिला
अवलोकिति त्या सभोंवतीं ॥ गुप्त जाहला० ॥ २ ॥
" अमुच्यावरती हरि रुसला । गर्व कोणता तरि दिसला ?
पीत पितांबर कटिं कसला । कुणा सवतिच्या घरिं बसला ?
स्वभाव सोसेना असला । अम्हि कुळवंताच्या असला ! "
बोलति सवतीला सवती ॥ गुप्त जहाला० ॥ ३ ॥
क्षणभर करमेना कोठें । चित्तीं तळमळ बहु वाटे
धांवति गोपि आडवाटें । मोडति चरणांमधिं कांटे !
अडाविति बोरी कोरांटे । दैव जाहलें उफराटें !
विष्णुदास म्हणे, अशा रितीं ॥ गुप्त जहाला० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ६७ ) पद

( चाल : गडयांनो कृष्ण गडी. )

गर्व गोपिंचा परिहारिला । बहु करुणा ये श्रीहारिला ॥ ध्रु० ॥
धिक्कारुनिया रतिमदना । गोपि आरंभिति मग रुदना
म्हणती " कृष्णा ! मधुसुदना ! । दावि एकदां निजवदना
अमुची नको करूं तूं छळणा । शरणागत अम्हि व्रजललना
कोप असा तरि कां धरिला ? " । बहु करुणा० ॥ १ ॥
गगनिं उगवला चंद्र जसा । प्रकट जाहला हरी तसा
जिरल्या रागाच्या गरसा । प्रेम उचंबळे सागरसा

पुनरपि आला बहुसरसा । रासक्रिडेचा रंग रसा
तो जगदात्मा करिं धरिला । बहु करुणा० ॥ २ ॥
षण्मासांची करुनि निशी । रासक्रिडा करि हृषिकेशी
ज्या गोपीची जशी जशी । आवड पुरवी तशी तशी
ते गुण वर्णिति देवऋषी । सुरवर पुष्पांजलि वर्षी
वश होई व्रजनारीला ॥ बहु करुणा० ॥ ३ ॥
उगवतांचि मग दीनमणी । गोकुळिं गेल्या नितंबिनी
अघटित श्रीहरिची करणी । गोपि वर्णिती क्षणोक्षणीं
विष्णुदास मग दिनवाणी । प्रार्थुनि ठेवी शिर चरणीं
कथा-लीलांबर पांघरला ॥ बहु करुणा० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( ६८ ) पद–राधेचें

( चाल : इस तन धनकी. )

राधे, सकळ छंद नंदमुलाचा
सोडी, धरि अभिमान कुलाचा ॥ ध्रु० ॥
तूं नटनाटक झालिस उद्धट
धाक नसे तिळभर वडिलांचा ॥ राधे० ॥ १ ॥
विषयाची ज्या रुचि त्या नसे अनुची
सारविला कर मुखिं कज्जलाचा ॥ राधे० ॥ २ ॥
संसारांऽचवलीस निःशेष चेवलीस
पाहुं नको अनुभव सोमलाचा ॥ राधे० ॥ ३ ॥
परनर रतिरस घेउनि त्यागिती
विष्णुकवि म्हणे, गंध फुलांचा ॥ राधे० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( ६९ ) पद

( चाल : तुला देतें मी सुंदर नवरा. )

कोण्या नादें राधे ! प्यालें मन वारा ।
रिता खट-खट वाजे डेरा ॥ ध्रु० ॥
दधि नसतां कसें मंथन करिसी । ओढूं नको रविदोरा ॥ १ ॥
लक्ष विलक्षण अक्षयिं बाहिर । असा नोहे गरतीचा धारा ॥ २ ॥
जरा भर्तारा कळतां सुबारा । मुकाशिल कीं संसारा ॥ ३ ॥
द्वारिं उभा हरि, कां तरि या घरीं । नित्य करी येरझारा ॥ ४ ॥
विष्णुदास म्हणे हरिविण तरि नारी । करसिल काय शरीरा ? ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७० ) पद

( चाल : राहिना रडतां हरि तुझ्या गृहीं नेगे. )

कृष्णा छंद माझा सारा । आतां सोड, सोड, रे ॥ ध्रु० ॥
ओळखिलें कीं सामूनं । गेली बिघडुन सून
तरि माझी आजपासून । गडी तोड, तोड, रे ॥ कृष्णा० ॥ १ ॥
गांवामध्यें हाची धंदा । घरोघरीं करिती निंदा
झाली, झाली पुरे मर्यादा । काडी मोड, मोड, रे ॥ कृष्णा० ॥ २ ॥
बहुतांनीं केला अट्टा । लावावया अब्रुस बट्टा
बरी नाहीं अधिक थट्टा । थोडी गोड, गोड, रे ॥ कृष्णा० ॥ ३ ॥
रांडा मेल्या, बटकी, बटके । हटाकिती घटके-घटके
नाहिं नाहिं लटकें लटकें । पाडी होड, होड, रे ॥ कृष्णा० ॥ ४ ॥
आठवण असों द्यावी । मनोमनीं भेट घ्यावी
विष्णुदास म्हणे, द्यावी । एवढी जोड, जोड, रे ॥ कृष्णा० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७१ ) पद– गोपींचा शोक

( चाल : गडयांनो ! घ्या हरिच्या नामा. )

पहा कीं आज यशोदे, बाई । बुडाला हरि यमुना-डोहीं ॥ ध्रु० ॥
धांवले नंदादिक गवळी । मिळाले यमुनेच्या जवळीं
म्हणति " बहु हरिची तनु कवळी । काळिया दृढ, बळकट कवळी
दया मनिं दुष्टाच्या नाहीं " ॥ बुडाला हरि० ॥ १ ॥
करांनीं वक्ष-स्थळ पिटती । कपाळें क्षितिवर आपटती
रडाया गोपि सत्या हटती । मराया आक्रंदुनि उठती
पेटला शोकानल देहीं ॥ बुडाला हरि० ॥ २ ॥
आटपेना दुःखाचें भरतें । उठले शिशु नारी, भरते
यमुनानदिजळ दुर्धर तें । टाकितां उडि धरि हळधर तें
म्हणे, नव्हे बुद्धी उत्तम ही ॥ बुडाला हरि० ॥ ३ ॥
नका करूं दुर्लभजीवनाशा । मान द्या तुम्हि आल्या दिवसा
हरिला भय नाहीं सहसा । भरंवसा गमे विष्णुदासा
जनांस्तव प्रभुची लीला ही ॥ बुडाला हरि० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७२ ) पद- अक्रूराचें

( चाल : ये धांवत माझे आई. )

यशोदा, गोप-गौळ्यांची, गोपि सगळ्याची, सहनंदाची
घडि मोडलि आनंदाची ॥ ध्रु० ॥
मुळ अक्रुर ये मथुरेहुन गोकुळिं, तेथून श्रीकृष्णाचा
खेळ सरला बाळपणाचा
आरंभि पुढें क्रम माधव सुरनरयादवपरित्राणाचा
आधीं कंस-प्राण-हरणाचा

त्यायोगें मोकलुनि धाय, रडे समुदाय, गोपगण यांचा
बहु प्रेमा सगुण गुणांचा
अजि नंदद्वारासन्मुख, एक अमोलिक, कनकवर्णाचा
आला बाई, रथ कोणाचा
(चाल) हें वर्म मनामधिं तर्का
हरि होइल आपणां परका
पुढें मार्ग दिसे ना सरका
वेळ दुःखाची आली एकदांची ॥ घडि० ॥ १ ॥
खळ काळ व्याळमुख पसरून, जन्मापासुन, कृष्ण-बलरामा
ग्रासाया टपला मामा
अक्रुर खरा आगलावू, आला बोलावूं, खचित या कामा
उगा घातकि, मेला, रिकामा
तो धाडा म्हणतो नंदा, उद्यां गोविंदा, कंस-रिपु-धामा
असा घेताचि बसला धामा
तो मागें परत न जाइल, हरिला नेइल, लावुनि प्रेमा
गोड बोल बोलुनि तुम्हां आम्हां
(चाल) चला, येवढी मसलत मोडूं
अधिं पायिं पडुन हात जोडूं
बळें धरून हरिला ओढूं
भिड कांहिं न त्याची, धरूं ने कदाची ॥ घडि० ॥ २ ॥
साहवेना हरि-विरहानळ, करिती तळमळ, सकळही गोपी
जागल्या, न गेल्या झोंपीं
आच्छादुन निशिवल्लभा, रवीची प्रभा, गगनतळ व्यापी
कोकिळा मधुर आलापी
हरि जातो मथुरे काइ ? यशोदे, बाइ ! खचित निरोपी
काय संशय तरि अद्यापी

ये कृष्ण यशोदेजवळ, दोन्हि करकमळ, गळ्यामधें गुंफी
रथिं अक्रुर घोडे जुंपी
( चाल ) यशोदा म्हणे श्रीहरिला
बा, नको पडूं या भरिला
हा काय दुराग्रह धरिला
तुजविण अमुची बहु आपदाची ॥ घडि० ॥ ३ ॥
सप्रेमें गोप अलिंगुन, गोपिस विनवुन, नमुनि वडिलांला
भगवान रथावर चढला
त्या समयीं तो अक्रुर-रथ, गमे रवि-रथवत्, ढगा-आड दडला
गोपींचा वेढा पडला
बहु गोड लागला स्वार्थ, कटु परमार्थ, वाटला पुढला
जणुं प्राण कुडिमधें अडला
गहिंवरले स्वर्गिंचे लोक, अपरमित शोक, गोपिला घडला
सांगतां कथा शुक रडला
( चाल ) त्या करुणामृत घन-धारा
जगिं वर्षति जगदोद्धारा
भवताप-पाप-विदारा
ही विष्णुदास बोलिला, अनुपम लीला, गोविंदाची ॥ घडि० ॥४॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७३ ) पद– श्रीहरीचें

( चाल : पंढरपुरासि जातें बाई. )

हरि मज कसा करिल भवपार ॥ ध्रु० ॥
भवसंसारीं भ्रमलों, श्रमलों, फिरलों दारोदार ॥ हरि० ॥ १ ॥
मी दुष्कृतनिधि, मी दुर्बुद्धी, मी अपराधि अपार ॥ हरि० ॥ २ ॥
निराधार मी, जगतिं कुणाचा नाहीं मज आधार ॥ हरि० ॥ ३ ॥

धीर धरवे ना, मज तरवे ना, भवसागर अनिवार ॥ हरि० ॥ ४ ॥
विष्णुदास म्हणे हरि-भक्तां-प्रति, विनवितों वारंवार ॥ हरि० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७४ ) पद

( चाल : थोर तुझे उपकार. )

शेवट करशिल गोड । कसा रे हरी ॥ ध्रु० ॥
व्यर्थ प्रपंचीं निशिदिनिं लागली । हव्यास ओढाओढ ॥ १ ॥
विषय-विषाची धुंद निशा मसी । लागली न सुटे खोड ॥ २ ॥
स्मरण तुझें क्षण घडुं नये म्हणुनी । दैवानें पाडिली होड ॥ ३ ॥
विष्णुदास म्हणे काढी अशामधें । कांहीं तरि तडजोड ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७५ ) पद–श्रीरंगाचें

( चाल : असा धरि छंद )

कुणी तरि सांगा । असा निरोप त्या श्रीरंगा ॥ ध्रु० ॥
आजवर जड-मुढ नर-पामरां । बसविलें मोक्षपदीं झरझरां ।
आतां तव सदनीं विश्वंभरा । नाहिं का जागा ॥ असा० ॥ १ ॥
दाता धर्म नष्ट जाहला । कशाला जावें त्याच्या माहला ।
कृपेचा सिंधु आला तर आला । येउं द्या रागा ॥ असा० ॥ २ ॥
उपेक्षा अनाथाचि करताल* । नांव कसें नाथाचें धरताल ।
काय लावताल तरी हरताल । भक्ता भंगा ॥ असा० ॥ ३ ॥
गीता तुमची तुम्हां पढविन । तुसचा पदर धरुन ओढिन ।
म्हणे विष्णुदास बडवीन । टाळ मृदंगा ॥ असा० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

* करताल, धरताल, हीं भविष्यकाळाचीं रूपें पुसद, माहूर, या भागांत प्रचलित आहेत.

## अष्टपदी

( श्रीगीतगोविंद या प्रसिद्ध काव्याचे कर्ते श्रीमत् जयदेव कवि यांचे अष्टपदींतील ध्रुवपद घेऊन नंतर सर्व पद श्रीविष्णुकवि यांचें आहे.

'राधिका विरह हे तव केशव । केशव माधव वामन विष्णु ।'

### ( ७६ ) पद[1]

येऊनि झडकरि गोविंदा । मज दावा मुकुंदा ॥ ध्रु० ॥
तिनें केला बहु सुंदर हार । सखि घाली हृदयावर ।
तिला झालासे बहुभार । काढुनि टाका दूर ।
अन्य उपाय कांहीं साधा । मज दावा मुकुंदा ॥ १ ॥
जीव झालासे अंगार । कुणी मज वाळा गार ।
लाविला मैलागिरी सार । वाटे उष्ण पूर ।
शीतळ कांहीं मज मर्दा । मज दावा मुकुंदा ॥ २ ॥
केली पल्लवाची शेज । सख्या म्हणाति वर नीज ।
म्हणे हा इंगळाचा माज । तिला झाली गजबज ।
शीतळ कांहीं मज मर्दा । मज दावा मुकुंदा ॥ ३ ॥
आपुले मुखीचा श्वास । वेग कीं बहु त्यास ।
होतसे अग्नीचा भास । कसें पेटवी मनास ।
शीतळ कांहीं मज मर्दा । मज दावा मुकुंदा ॥ ४ ॥

---

१ श्रीकृष्णविरहाचे तळमळींत उच्च प्रेमसुख भोगण्याची राधेची हातोटी या पदांत उत्कृष्ट साधली आहे. अमर्यादाचें प्रेमसुख मर्यादित होऊन भोगण्याची रीत संतांची आहे. आनंद श्रीकृष्ण व प्रेम हें राधेचें रूप या उच्चतर भावनेनें हें प्रेमसुख लक्षांत यावयास पाहिजे. यांतील शब्द फार विस्कळित झाले आहेत; पण याचें अस्सल सांपडेपर्यंत यावरच निर्वाह करणें आहे. हें प्रेमळ पद मु. आरणी, जि. यवतमाळ, येथें नरसासानी या ८० वर्षांचे बाईचे मुखांतून ऐकलें. तिला प्रत्यक्ष कवींनीं करून दिलें होतें, म्हणूनच दुसरीकडे उपलब्ध झालें नाहीं.

मग ती चहुंकडे नेत्र आपुले । फिरविती कज्जले ।
दंतहीन जसें मुखकमल । वचन सकळ फोल ।
जाहाली विरहानळें बाधा । मज दावा मुकुंदा ॥ ५ ॥
श्रीकृष्ण श्रीकृष्ण जेव्हां । स्मरण करुनि तेव्हां ।
त्याजविण त्यागीन या देहा । आज निश्चय पाहा ।
मोकलुनि धाय रडे राधा । मज दावा मुकुंदा ॥ ६ ॥
ठेवुनि गालावरि हात । कशी झालिस भ्रांत ।
जसा सांजेच्या चंद्र दिसत । तशी वदनीची ज्योत ।
झाली क्षीण हरिविरहें राधा । मज दावा मुकुंदा ॥ ७ ॥
कृष्ण-राधिका पदयुक्त । जयदेवाचें कवित्व ।
श्रुति अशी बहुत सुख देत । हरिचरणीं अखंडित ।
म्हणे विष्णुदास प्रभु पादा । मज दावा मुकुंदा ॥ ८ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

# भाग ५ वा

—०:०—

## आख्यानपर पदें

### ( ७७ ) पद— शिव-भिल्लिणीचें

( चाल : पोवाड्याची. )

भुलला पाहुन भिल्लिणिला, मग बोले मदनारी
घडावा संग तुझा नारी हो ॥ ध्रु० ॥
नारीमध्यें एक नार शिरा तूं, त्रिभुवनिं मीं कोणी
पाहिली नाहिं तुझ्यावाणी हो
चंद्रवदन, मृगनयन, गळां हार, मणिकंकणपाणि
भुजंगाकृति भासे वेणी हो
लावण्याची ज्योत, सुशोभित रत्नाची खाणी
दिससी फार चतुर शहाणी हो
निर्भय पोटीं कशी एकटी फिरसी या रानीं
नूतन वय कोमल शरिरांनीं हो?
मीं सक्रोधें मदन जाळिला, ती हरलों वाणी
वेधलों अतां पंचबाणीं हो
ऐक भिल्लिणी, विनंति माझी, मला अंगिकारी
घडावा संग तुझा नारी हो ॥ १ ॥
भिल्लिण बोले, कसे भिल्लाचे होतां जांवाई
नका मासि बोलूं जा बाई, हो
घरिं लग्नाची तरि तुम्हांला प्रीतिजोगि कांहीं
अंगना आहे कीं नाहीं हो?

बहु दिवसाचे तुम्हि म्हातारे, हालुं लागली डोई
नका पडुं विषयाचे डोहीं हो
वाटतें मजला, राग तुम्हांला आला तिच्या पायीं
रुसुनि बसलां या ठायीं हो
तप करितांना परनारीची आस कशाला ही
खरें मसि बोला लवलाही हो
धड मन नाहीं परमार्थामधिं अथवा संसारीं
घडावा संग तुझा नारी हो ॥ २ ॥
बहु नटनाटकि, चेटकि, खोटी, मोठी, अपगरजी
आहे ती नांवाची गिरजी हो
ती नावडती, तूं आवडती, हो यास्तव राजी
नको करूं साजणि इतराजी हो
संपद सारी-पाट खेळतां तिनं लुटली माझी
बायको मुलखाची पाजी हो
होउं नको दुर, प्रसन्न लवकर, कर मजवर मर्जी
येवढी ऐकुन घे अर्जी हो
सुरवर सर्वाहि धन्यचि म्हणतिल मज वरतां आजी
मानवेल नारदाची आजी हो
जाउं नको तूं मजला सुंदरि, सोडुनि कांतारीं
घडावा संग तुझा नारी हो ॥ ३ ॥
नयनकटाक्षें बळकट फांसा घालुनिया कंठीं
चालली नार आल्या वाटीं हो
तोंवर जप, तप, जोंवर नाहीं वधु पडली दृष्टीं
मुलवी शास्त्रांच्या गोष्टी हो
टाकुनि आसन दंड कडासन, भिल्लिणिच्यां पाठीं
दिगांबर धांवे धूर्जटी हो

पहातां पहातां परी होतसे दृष्टी अदृष्टी
प्रभु हात लावी अदृष्टीं हो
म्हणे, तुजसाठीं प्राणवल्लभे, जिव झाला कष्टी
तुझ्याविण शून्य दिसे सृष्टी हो
जाउं नको मन-भंग करूनी परतुन माघारीं
घडावा संग तुझा नारी हो ॥ ४ ॥
देवाचा जो देव सदाशिव महान तपवाला
जयाचा आधार सर्वांला हो
पंचवदन तो पंचशरानें बहु मोहित केला
घेउनी ये कैलासाला हो
प्रकट करूनी रूप आपुलें नमी महादेवाला
जाहलें कौतुक देवाला हो
अशा परीनें शिव-गौरीचा फिटला अबोला
सदाशिव हर हर हर बोला हो
विष्णुदास म्हणे, गुंफुनि पांचा कडव्यांची माला
समर्पण केली तुम्हांला हो
ही स्मरतां शिव-शंकर तुमचें भवसंकट वारी
कृपाघन भक्तांला तारी हो ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७८ ) पद– शबरीचें

( चाल : भला जन्म हा तुला. )

पंचवटीच्या आश्रमवासी भिल्लिणि एकमेकिशीं
म्हणती, पाहुं चला ग रामासी ॥ ध्रु० ॥
सीता-कांत रघुनाथ दयाघन सदार सानुज आला
धन्य हा सुदिन आज उगवला !

सुरवर, मुनिजन, ब्रह्मदेवही, चिंतिति मनिं पावला
सदाशिव सदानंद पावला
ज्याच्या नामस्मरणें केला शितळ शरिर हलहला
वाल्हा वाल्मिकमुनि जाहला
काय भेटिचा योग लाभला अकस्मात आम्हांसी
आली जणुं कामधेनु गृहासी ॥ पंचवटी० ॥ १ ॥
सकळहि ऋद्धी सिद्धि राबती पुढें तिष्ठति अमर
वारिती नृपगण शिरिं चामर
पतित, पातकी, अनाथ केवळ जड-मुढ नर पामर
तारितो, करितो अजरामर
गौतमजाया मनुष्य केली, शिळा होति अजवर
लागतां पद-धुळ वरच्यावर
निजभक्तांची हृदयीं तळमळ, कळवळ मायबापसी
होउनी फिरतो वनिं तापसी ॥ पंचवटी० ॥ २ ॥
तो गंगेच्या कांठिं राहिला तृणसदनीं रघुपती
भक्षुनी फळ-मूळ-वनस्पती
श्रीरामाच्या भेटीसाठीं कांहीं न्यावें बोलती
जाउं नये बाई, रिकाम्या हातीं
यापरि बोलुनि, भिल्लिणि बदरीवृक्षातळिं नाचती
आनंदें मग बोरें वेंचिती
हिरवीं, आंबट-चिंबट, खातां गोड लागल चव कशी
करिती निज बुद्धिनें चवकशी ॥ पंचवटी० ॥ ३ ॥
नाहिं अणिकाचीं उच्छिष्ट बोरें स्वामी, तुझी आण कीं
आतां काय बोलावें आणखी
मुखिं न लावितां बोरें पाहिलीं टोंचुनि अपुल्या नखीं
आहेत कीं मदाळ, पिकलीं, सुकीं

अनंत-ब्रह्मांडांचा मालक, पालक, झाला सुखीं
समर्पुनि बोरें अपुल्या मुखीं
विष्णुस्वामी म्हणे, तत्पदकमलीं मति जडली भ्रमरसी
करिल खळ गंगाजळ समरसीं ॥ पंचवटी० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ७९ ) पद– अत्रि-आश्रमाचें

( चाल : उद्धवा शांतवन कर जा. )

श्रीरामा ! रघुवीरा ! राजकुमारा !
वनवास कठिण सकुमारा ! ॥ ध्रु० ॥
पुढें मोठें कंटकवन, माळ वसान
येतील असुर वासानं
कोमल ही तुझी काया वनवासानं
क्षिण होइल उपवासानं
परतुनिया भेटसील किति दिवसानं
मासि बोल विश्वासानं
( चाल ) कुठें दाट तरूची छाया
कुठें झाड नसे बैसाया
शित-उष्ण काळ सोसाया
सतत तुला लागतिल वर्षें बारा
कधिं होइल भेट दुबारा ॥ १ ॥
अनसुया म्हणे, “ सख्या, वर्षें बाराही
अमुच्याचि आश्रमीं राही
परि तुमची कृती कळली म्हणुनिया कांहीं
आक्षेप करित मी नाहीं

जानकिला संभाळुन सत्वर येई
परतून भेट मज देई"
( चाल ) अनसूया मुख कुरवाळी
दृढ हृदयिं अत्रि कवटाळी
दत्तात्रय वाजवी टाळी
प्रभु विष्णुदासाच्या सत्य आधारा
प्रकटलासी जगदोद्धारा ॥ २ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८० ) पद– सीताहरण

( चाल : ये धांवत माझे आई. )

खळ रावण, लंकापति,
जहाला यती,
कमंडलु हातीं, धरी नवि काया
आला कपटरूप धरुनि जानकीहरण कराया ॥ ध्रु० ॥
स्वहितार्थ कामसंन्यास,
दावि अन्यास,
करांगुलिन्यास, हातीं जपमाळा ॥
अति निर्मळ वरि, परि अंतरिं दुर्जन काळा ॥
शिरिं जटाभार वाढला,
नेसुनि वल्कला,
यतीची कला, बरोबर शिकला ॥
कपटांत निपुण तो तिळभर नाहीं चुकला ॥
जाहला शुद्ध भिकारि,
दुष्ट अविकारि

आलख पुकारी, म्हणे जिव थकला
बहु रंग ढंग सोंगाच्या दावी नकला ॥
( चाल ) म्हणे अति क्षुधित मी आहे भिक्षा द्यावी ।
आशिरवाद साधूंचीं वचनें घ्यावीं ।
चित्तांत धर्मवासना असो द्यावी ।
लावण्यदीपराजसा,
कमळडोळसा,
सांग लालसा, कुणाची जाया
एकली काळ कंठिसी कशी या ठायां ॥ १ ॥
सद्भावें नमुनि यतिराज,
आहो माहाराज,
कुणीकडे आज पाय हे वळले
अनंत जन्मोजन्मींचें सुकृत फळलें
प्रख्यात नाम मी सीता,
जनक मम पिता,
देही असता विदेहपण वरलें
सासरे धुरंधर दशरथ ते गुजरले
तत्पुत्र प्रथम रघुपती,
माझे ते पती,
दैवें दुर्गती वनाप्रति आले
यापरी पूर्ववृत्तांत जानकी बोले
तो म्हणे, क्षोमुनी हुंहु,
वाट किति पाहुं,
क्षुधा किति साहुं, कांहिं दे खाया
म्हणे विष्णुदास तें कपट न ये ओळखाया ॥ २ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८१ ) पद– रामविलाप

( चाल : विनंति करूनि चित्त. )

भक्तजन पदपंकज तारी । रघुविर हिंडे कांतारीं ॥ ध्रु० ॥
व्यापिला विरहज्वर आंगा सोडिली सीतळ जळगंगा ॥
आठवुनि जानकिआनुसंगा क्षणोक्षणीं पावें मन भंगा ॥
जाहली गोष्टहि होणारी म्हणे हा नारी, हा नारी ॥ भक्त० ॥ १ ॥
वनजहो, कां धरिला दावा । एकदां जानकि मज दावा
राम हा येथुन हांकावा ! कळला तुमचा हा कावा
करि ना मृगया मी न मारी । भेटवा माझी सकुमारी ॥ भक्त० ॥ २ ॥
क्षितिज हो, बोला हो बोला । विनोदास्तव पुरे आबोला
चेवला बाइल दादोला । मागें-पुढें जाये जणु दोला
जाहालों कामुक अविचारी । म्हणुन मज आली लाचारी ॥ भक्त० ॥ ३ ॥
आयुरदा स्नेहतंतु सरला । प्राणदीप कंठामधें उरला
धावुनी दृढ हृदयीं धरिला । जटायू पक्षी उद्धरिला
कृपेनें भवसंकट वारी । विष्णुदासाचा कैवारी ॥ भक्त० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८२ ) पद– लक्ष्मण-शक्ति

( चाल : उद्धवा शांतवन कर जा. )

कुणि लक्ष्मणाप्रति माझ्या वांचवा म्हणे रघुवीर ॥ ध्रु० ॥
जोंवरी उद्यांचा नाहीं गगनांत उगवला भानू
तोंवरी आणिल जो वल्ली तो धन्य त्याचे गुण वानूं
जो करिल यासि जिवदान आम्हिं त्यासि पित्यासम मानूं
( चाल ) हा केल्या अंगीकार
होईल थोर उपकार

किति बोलूं वारंवार
बोलतां होतो उशीर ॥ कुणी० ॥ १ ॥

तों सबळ चपळ निळ बोले द्या आज्ञा मजला स्वामी
घेवोनि वनस्पति येतों परतून तीन दिवसां मी
तों त्यासि चिकित्सक बोले हें कार्य पडे ना कामीं

( चाल ) मग द्विविध मैंदबळ खाणी
बोलती प्रतिज्ञा-वाणी
येण्यासि परत निर्वाणीं
द्वीरात्र पाहिजे धीर ॥ कुणी० ॥ २ ॥

शतमतकथा वर्जोनी गर्जोनि म्हणे कपिराजा
सोडून आतां भय चिंता तुम्हि स्वस्थ करा निद्रा जा
मी रविरथगतवत् जातों आज पहा पराक्रम माझा

( चाल ) दवडाया आवघा खटका
पाहिजे दहासक घटका
हा सत्य नेम नव्हे लटका
सुग्रीव बोले गंभीर ॥ कुणी० ॥ ३ ॥

आंगदाख्य पुत्र वाळीचा युवराज नातु इंद्राचा
उत्कंटक दशकंठाचा प्रियपात्र रामचंद्राचा
बळवंत दंत नागाचा जो काळ असुरवृंदाचा

( चाल ) तो म्हणे जोडुनी हात
येतों मी चार प्रहरांत
मग विष्णुदास म्हणे स्वस्थ
ठेविलें शिरावर शीर ॥ कुणी० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८३ ) पद– बकासुर-वधाचें

( चाल : ये धांवत माझे आई कृष्णाबाई. )

जो निश्चळ रत हरिनामीं, हरि तत्कामीं तत्पर साचा
प्रिय माधव भक्तिरसाचा ॥ ध्रु० ॥

खळ मातुळ शकुनिमतानें अंधसुतानें, मंदमतियोगें
बळें केले पंच हरि जागे
लाक्षागृहिं कृत्रिमवैभव, जाणुनि पांडव, निघती वेगें
दुर्योधन-मनोरथ भंगे
हें होतां श्रुत धृतराष्ट्रा, वाटे अरिष्टा, संशय न लगे
म्हणे धरिला डाव भुजंगें
( चाल ) सोडुनियां लाक्ष सदनातें
आले पांडव घोर वनातें
हा वृत्तांत श्रुत न जनाला, जाहला साचा ॥ प्रिय माधव० ॥ १ ॥

वृक्षातळिं निद्रित होतां, बांधव-माता,-भीमसेनाला
तें वाटे दुःख मनाला
हर हर ! शिव शिव ! उच्चारुन अति मधुसूदनाला
आक्रोशें करि रुदनाला
तें ऐकुनि राक्षसबोका, भीम हरि तो का, करि रुदनाला
तो पावे यमसदनाला
( चाल ) तद्भगिनी हिडंबा भामा
मनिं भुलली, रमली भीमा
सुत होय घटोत्कच नामा, नातु पंडूचा ॥ प्रिय माधव० ॥ २ ॥

निजराज्यपदच्युत भ्रमले, फिरुनि वनिं श्रमले, दिवस अणि रात्रीं
त्वरें ठाव न देत धरित्री
आले एकचक्र-नगरांत, विप्रगृहिं रहात, जाहले परतंत्री
चळ न पडे कधिं विधिसूत्रीं

ते राजपुत्र माधुकरी, मागति नगरीं, भास सर्वत्रीं
जन म्हणती ब्राह्मण क्षेत्रीं
( चाल ) जरि अभ्रामधिं रवि लपला
तरि झांकि न प्रकाश अपुला
गूण पुरुषाचा ॥ प्रिय माधव० ॥ ३ ॥
त्या नगरप्रदेशीं भयासुर, नाम बकासुर, निर्दय कपटी
बहु मानव नित्य चपेटी
गज, हय, सह दावणि पशुच्या, जनकाळाच्या, वाढिले ताटीं
कैकाची लागलि ताटी
राजा म्हणे, यापुढें न चले, धैर्यही खचलें, वाटे भय पोटीं
हा करिल सकळ गट सृष्टी
( चाल ) ही आली प्रजेवर धाडी
हरि यास्तव पांडव धाडी
भवभयसागर नावाडी, विष्णुदासाचा ॥ प्रिय माधव० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८४ ) पद— बभ्रुवाहन-आख्यान

( चाल : उद्धवा शांतवन कर जा. )

सुंदरा वरा नरवीरा । रणधीरा गुणगंभीरा ॥ ध्रु० ॥
अर्जुना, विजया, नारायणमित्रा, पंडुकुमारा
शुभवक्त्रा, पंकजनेत्रा, प्रियपात्रा, अति सुकुमारा
जें दिलें शंकरें तुजला, वंचुनिया स्वामिकुमारा
( चाल ) तें काय पाशुपत झालें
अग्नीचें तेज विझालें
मेरूचें शिखर बुझालें
कीं झाला अचेतन वारा ॥ सुंदरा० ॥ १ ॥

आजि उठा, तुम्ही व्हा जागे विप्राच्या नेल्या गाई
कुरुपती सुभद्रा वरितो, व्हा संन्यासी लवलाही
माहाराज जयद्रथ मारा रवि बुडतो आवधी नाहीं
( चाल ) अवलंबुन कुश्चल पापा
कटकासि लागल्या झोपा
गुरुपुत्रें घातला छापा
लाविली आग शिबीरा ॥ सुंदरा० ॥ २ ॥
पुत्राचे अवगुण गेला सांगाया श्रीभगवंता
कीं कांहीं संशय आला ऐकाया बसला गीता
कीं गेला पाशुपत घ्याया परतून गिरिजानाथा
( चाल ) ये धावत शौर्यसमुद्रा
दाखवी आतममुखचद्रा
या कामिनी-यामिनीचंद्रा
म्हणे विष्णुदास उदारा ॥ सुंदरा०॥ ३ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८५ ) पद– तारा-आख्यान

( चाल : जाई परतोनी बाळा. )

कोणि न कोणाचे दैवा
आपपर घरचे, सर्व सुखाचे, निर्वाणीचे मामा-मामी न भाचे ॥ ध्रु० ॥
जे साथी अनुकूल दिवसाचे होता एकोणीस-विसाचे
ते नर बदलून पडतिल साचे, जिवलग प्राणाचे ॥ दैवा० ॥ १ ॥
जोंवर आहे धनकनकांबर, तोंवर पुढें हात जोडति शंभर
तें सरल्यावर बांधिति कंबर, सेवक चरणाचे ॥ दैवा० ॥ २ ॥
संकटकाळीं सोडून देती त्यांच्या प्रतापावर पडो माती
विष्णुदास म्हणे धरि पद हातीं विश्वंभरणाचे ॥ दैवा० ॥ ३ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# भाग ६ वा



## भक्ति-ज्ञान-वैराग्य-उपदेशपर पदें

### ( ८६ ) कटाव

नेसुन जरिचा घट्ट पितांबर, भडक दुशाला लाल तंबुर, किंमत रुपये सुर्ती[1] शंभर, भरजानीची चढती उम्मर, रुंदावलि बहु सुखांत कंबर, शहाणपणामधें पहिला नंबर, परी कळे ना वड कीं उंबर, पूर्वजन्मिचा ऋणि विश्वंभर, वाटे आहे मी अजरामर, लक्ष्मीबाई ऐन भरावर, शत तोळ्यांचा गोफ उरावर, घटकोघटकीं ताव मिशांवर, नजर फिरे ना कधिं गरिबावर, नित्य पंक्तिचा बेत बरोबर, घोटिव रंध्याच्या पाटावर, सदर ठोकलीं फुलें कांठावर, चमके मुलामा वेलबुटावर, ओतिव गडवा जाड रुपेरी, दुसरी लहानशी त्या शेजारीं, पाणी पिण्याला सुंदर झारी, हुशार घरचे कारभारी, पुढें राबती बहु परिचारी, सुगंधाच्या उटथा शरीरीं, साखाळिचें उभें गंध केशरी, लाविती टिकले खलुन कस्तुरी, अडणीवर ताटें सोनेरी, पुढें कमानी रेषा दुहेरी, आर्धी शिंपुन गुलाल पुटुळे, गाळुनि वस्त्रामधें शिरगोळे, वर मोरांचे फिरे रांगोळें, घमघमाट पुढें उदबत्ती जळे, अंबेमोहर उंचीचे आगळे, तांदुळ शिजले शुभ्र मोकळे, मधें दाट तें वरण पिंवळें, तांथें लोणकढें तूप रवाळें, वाट्या भरून वराति उफाळे, नित्य कशाचे ऐसे सोहळे, गरीब ब्राह्मण लेंकुरवाळे, म्हणती आमचें निघेल दिवाळें, पिकलीं अंजिरें, सुकीं केळें, गोड लागती बऱ्याच खिरण्या, परोपरीच्या भाज्या चटण्या, जिरे-हिंगाच्या कडक फोडण्या, सगळीं वांगीं पाकिं रांधिलीं, शुभ्र कारलीं, गोड तोंडलीं, खाणाराची बुद्धि हरली, हिरवीं

---

१ ताजें.

वाळकें बारिक चिरलीं, मेथी कोथिंबिर चमेकोरा, गवार भेंडी चवळी अवेरा, चुका चाकवत माठ पोकळा, मुळे दोडके, दूधभोपळा, घ्या चिंचेचा चिघोर मोकळा, अंबट भाजी अंबाड्याची, घोळ पाथरी केळफुलांची, परोपरीचीं मिष्ट लोणचीं, परि वळखावीं कोण कोणचीं, माइनमूळें तळ-कोंकणचीं, अंबट अंब्याचीं लिंबाचीं, फळें कोंवळीं करवंदाचीं, अपूर्व लागे रुचि आल्याची, हिरवी चटणी कोथिंबिरिची, बारिक वाटल्या डाळीची, गोड जिऱ्याची पुड जवसाची, पंचामृतघट भरीत मेतकुट, गुळ मेथांबा तक्कु बोरकुट, फोडी घातल्या चिरुन गाजरें, वाजत करकर हिरविं भोकरें, लवण शर्करेपरी पांढरें, सार आमटी कढि सांबारें, उष्ण वर्पितां पळे भांबारें, खमंग लागति उड-दाचे वडे, पात्रावर गडबडतीं बोंडें, दुधांत उड्या टाकिति मांडे, कडबू दिंडें वासिति तोंडें, फेण्या चिरोटे साखरपारा, म्हणति दुधाच्या ओता धारा, करा एकिकडे मोदक शिरा, चमकोऱ्याच्या हिरव्या वड्या, पिवळ्या डाळीच्या पाटवड्या, सफेत सपिटाच्या चवपुडया, तळिव सांडगे आणि कुरवडया, सांडइवर कडकडती पापड, धक्का सोसे ना मर्जी तापड, फडफड करिती बहु कानवले, ते सकळांसी बहु मानवले, पातळ सपिठाच्या अंबोळ्या, मिसळुन पुरणामधें चारोळ्या, पात्रिं वाढिल्या उन-उन पोळ्या, परोपरीच्या खिरी रांधल्या, बहुत खातां नाहीं बाधल्या, बारिक नामी वळले देठवे, खातां दुसरें कांहिं न अठवे, चढली गोडी फार नखोल्या, दाविति दुसऱ्याला, वांकोल्या, गोल सरोळे लांब लांब सेवया, वाटति अवघड बहुत खावया, मोतिचूर दळ बेसन बुंदी, अटिव दुधाची क्षिर बासुंदी, श्रीखंडाची फार सुगंधी, आंबरसाची एकच गरदी, जाउन बसली मस्तकिं सरदी, पोकळ नळिची गोड जिलेबी, कंदी पेढे केशर बर्फी, साखरपाकाची गोडंबी, खाज्याकरंज्या घाऱ्या साटोऱ्या, नरम जाहल्या गोड

१ अळूची भाजी. २ घेवडा. ३ पडसें.

सांजोऱ्या, अपमानानें फुगल्या पुऱ्या, साखरभात रंगकेशरी, लवंग पत्री दोडे कस्तुरी, जायफळें बेदाणा मिश्री, पडले अक्रोड पिस्ते बदाम, खर्च जहाले बहुत छदाम, येतां पाहुन वांगी-भाता, जेवणार वर करती माथा, वाढा आतां काय पहातां, जहाला पात्रावर बेपत्ता, गोड घारगे धिवर अनरसे, दुध सायीच्यावर बत्तासे, भोजन आजचें झालें सरसें, साजुक आला भात मागला, घुसळुन सायीसकट चांगला, घट्ट दह्याचा मठ्ठा वाढिला, भला आजचा दिवस वागला, यापरि बहु थाटाचें भोजन, परोपरीचे मित्र-आप्तजन, व्याहि-सोयऱ्यांसहित प्रयो-जन, पांथस्थाचें काय प्रयोजन, धर्म पळाला दुर शत योजन, घरांत जमले बहुत पाहुणे, सारे मामे भाचे मेहुणे, एकाहुनि एक दुप्पट शहाणे, पुरता करुन विचार पहाणें, लाजिरवाणें ऐसें जीणें, हरिभक्ती-विण सर्वही उणें, संतत वा संपत कोणाची, लंका जळाली सुवर्णाची, कुर उडाली रावणाची, यास्तव धरि प्रीत हरिचरणाची, विष्णुदास म्हणे भगवंता, भज सोडोनिया सर्व अहंता ॥ १ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## उपदेशपर पदें

### ( ८७ ) पद

( चाल : आतां मी नाहीं मी नाहीं )

बाबा, तरि नाहीं तरि नाहीं । तळमळ झाली मना ही ॥ बाबा० ॥ध्रु०॥

सपिंड दूध-तुपाचा । बाळ लाडका आइ-बापाचा
जाहला तरणाही तरणाही ॥ तळमळ० ॥ १ ॥

रुचि विषयाची कळली । पसंत चित्ताजोगि मिळाली
सुंदर ललना ही ललना ही ॥ तळमळ० ॥ २ ॥

भडकली दुकानदारी । बहु वसुलाची खबरदारी
भरला खजिना ही खजिना ही ॥ तळमळ० ॥ ३

तारुण्यासी भरती । निजला छपर-पलंगावरती
टेकत गगनाही गगनाही ॥ तळमळ० ॥ ४ ॥
लक्ष्मी बोटोबोटीं । नव्हता परंतु जाहला पोटीं
बेटा तान्हाही तान्हाही ॥ तळमळ० ॥ ५ ॥
उलटापालट शिकला । सौदा देतां घेतां पिकला
दिसेना नयनांही नयनांही ॥ तळमळ० ॥ ६ ॥
बसे वसरिच्या कांठीं । मांजर हाणित आपटित काठी
घडिभर निज नाहीं निज नाहीं ॥ तळमळ० ॥ ७ ॥
तुटत कफाचा तारा । स्व-सुना म्हणती हा म्हातारा
आतां मरेनाही मरेनाही ॥ तळमळ० ॥ ८ ॥
विष्णुदास म्हणे, मरतां । मरतां नाठवे लक्ष्मी-भर्ता
जातां मसणाही मसणाही ॥ तळमळ० ॥ ९ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८८ ) पद

( चाल : कविरी )

शिकला बातबेत सारा । जुपला बैल संसारा ॥ ध्रु० ॥
सवड गुलामा नसे सलामा सदोदीत ज़ूं खांदीं
हरिभजनाच्या कधीं वांटणिस घडी नये एखादी ॥ शिकला० ॥ १ ॥
करि नित्याचा सणवाराचा खर्च बातबेतानं
झाडा झडती तेल मिठाची, पीठ मोजि हातानं ॥ शिकला० ॥ २ ॥
पुण्यतिथीला घे पंक्तीला व्याहि-आप्त-जांवाई
अतिथी दारामधें पाहतां चढे मस्तकीं वाई ॥ शिकला० ॥ ३ ॥
स्नान-संध्या-जप-तीर्थाटण-पुराण-कीर्तन वर्जी
धर्म वाढि ना, कदा मोडि ना बायकोची मर्जी ॥ शिकला० ॥ ४ ॥
शिरिं बेताची पगडी, गाडी, माडी, घोडी, खिडकी

दे धर्माला खोटा पैसा, घोटि सुपारी किडकी ॥ शिकला० ॥ ५ ॥
चिरेबंदीची उंच हवेली, बांधी बळकट पाया
रोकड वाढी-दिढी वाढवी, आपण ये अटपाया ॥ शिकला० ॥ ६ ॥
काकासाहेब, नानासाहेब, आदर करि पंतांचा
थट्टा-मस्करि करुनिया अपमान करी संतांचा ॥ शिकला० ॥ ७ ॥
जों जों थकला पिकला सुकला तों तों संग्रह केला
विष्णुदास म्हणे, अखेर एकला, रडत नागवा गेला ॥ शिकला० ॥८॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ८९ ) पद

( चाल : तक धिलांग धिमकिट )

या जगांत मुद्दल पैसा । शरिरामधें मुळ जिव जसा ॥ ध्रु० ॥
पैशाच्या लागती पायीं । पैशानं नाचे वरमायी
पैशास व्याहि-जांवाई । पैशास म्हणती 'या, बैसा'॥ १ ॥
पैशास करिति हां हां जी । पैशास साक्ष दे काजी
पैशाला हाकिम राजी । पैशानं मान ये सैसा ॥ २ ॥
पैशाच्या शिरावर झेंडा । पैशाला तूप, दूध, मांडा
पैशाला हजारों रांडा । नाहिं वरिष्ठ पैशाऐसा ॥ ३ ॥
नाहिं प्रियकर पैशापरता । चढे पैसा स्वर्गावरता
म्हणे विष्णुकवी, याकरितां । देवीनं मारिला म्हैसा ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९० ) पद

( चाल : छकडयाची. )

जन्मा येउनि केलेंस काय । नाहीं धरिले देवाचे पाय ॥ ध्रु० ॥
तुज दगडापरि वाहुनि उदरीं । नव महिने शिणली माय ॥ १ ॥
तनु रक्षाया दिली भक्षाया । तूप, साखर, दुधाची साय ॥ २ ॥

भीति पापाची, नसे बापाची । तुला बायकोची लागली बाय ॥ ३ ॥
रडत कुपासीं बसली उपासी । जसि शेतांत आंधळी गाय ॥ ४ ॥
फुटक्या दैवाच्या उठ बटक्या । आतां रडत मातिंत जाय ॥ ५ ॥
विष्णुदास म्हणे, मृदंगापरी । दोहिंकडूनि थप्पडा खाय ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९१ ) पद

( चाल : आतां मी नाहीं. )

म्हणुं नये तो ज्ञानी तो ज्ञानी । निज ज्ञानाभिमानी ॥ ध्रु० ॥
षट्शास्त्रेंही शिकला । वक्तृत्वाची खाशी कला
मीपण जो मानी ॥ निज ज्ञानाभिमानी ॥ म्हणुं नये० ॥ १ ॥
दिवसां मिरवि मशाला । उपदेशाच्या जमवी शाळा
जो मठ स्वस्थानीं ॥ निज ज्ञानाभिमानी० ॥ २ ॥
षड्रिपुवरती रुसला । गृह-सुत-स्त्री धन त्यागुनि बसला
जो आक्षेपें रानीं ॥ निज ज्ञानाभिमानी० ॥ ३ ॥
निवडि पराचीं वर्मे । संशय अविलंबुनि करि कर्मे
जो भ्रमभेदांनीं ॥ निज ज्ञानाभिमानी० ॥ ४ ॥
कौपिन-वल्कल-वस्त्रां । वेष्टुनि सोडी नित्य धूम्रास्त्रा
जो तपोनिधि मौनी ॥ निज ज्ञानाभिमानी० ॥ ५ ॥
विष्णुदास म्हणे केला । दुर कर्पुर परि वास न गेला
जो विषयाध्यानीं ॥ निज ज्ञानाभिमानी० ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९२ ) पद

( चाल : असा धरि छंद. )

तेंव्हां मज कळुन आलें । यमदूत सादर झाले ॥ ध्रु० ॥
घटत काळ पळ पळतो । आयुष्य ग्रासुनि दिनकर पळतो

घडयाळ बोले ॥ यमदूत० ॥ १ ॥
आली उमर परिपाकीं । कांहिंच उरली नाहीं बाकी
मतिचें बळ खचलें ॥ यमदूत० ॥ २ ॥
घरचे घरांत अवघे । ठाकले द्वाराबाहेर चवघे
शरीरीं तिघे शिरले ॥ यमदूत० ॥ ३ ॥
आया-बाया गाया । वाया काया गति भोगाया
पटति न ह्यावाले ॥ यमदूत० ॥ ४ ॥
आतां साधन साधू । विष्णुदास म्हणे, सद्‌गुरू साधू
स्मरतां पाप गेलें ॥ यमदूत० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९३ ) पद

( चाल : अभंगाची. )

संसार-अरण्य परम कठीण । करितां अटण करवे ना ॥ १ ॥
निवास-विश्रांती नाहीं क्षण एक । उठती अनेक भयचिंता ॥ २ ॥
आशेच्या कर्दमीं वाढल्या आगळ्या । कल्पनेच्या जाळ्या चहूंकडे ॥ ३ ॥
भ्रमाचे आगर दुःखाचे डोंगर । विखाचे अजगर मोठेमोठे ॥ ४ ॥
कामक्रोध व्याघ्र-तरस-लांडगे । हिंडती दांडगे भक्षावया ॥ ५ ॥
अज्ञान-अंधार पडलासे दाट । आतां मज वाट सांपडे ना ॥ ६ ॥
विष्णुदास म्हणे, अतां या निर्वाणीं । येइ नारायणी धांवुनिया ॥ ७ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९४ ) पद

सोड अज्ञुन तरि झोंप, वाजला रे डंका । कीं पडला डाका जी ॥ ध्रु० ॥
चौऱ्यांशीं लक्ष जन्मांत जोडिली रे जाडी । कीं कवडी कवडी जी
नव साल सुरू महिन्यांत केली कुळवाडी । कीं तोडिली झाडी जी
वैशाखिं जिवाची बहु ओढाओढी । कीं नागर मोडी जी

ज्येष्ठांत झाली पेरणी आखाडा-तोंडीं । कीं झाली तन-मोडी जी
श्रावणीं डवर पाळितां आवरा झोंका । कीं पडला डाका जी ॥ १ ॥
पित्राचा थोर आधार, वाढला रे शेंडा । कीं पोंखला धांडाजी
आश्वीन अनुसंधान भडकला रे घोडा । कीं सरकला शेंडा जी
दोन दिवस दिवाळी, बहार, वाणिचा रे हुरडा । कीं फुगला नरडा जी
निवरावे मार्गशिर्षांत पिकला रे थेरडा । कीं काळ करी वरडा जी
पौषांत कठिण चालला दंवाचा रे कडका । कीं पडला डाका जी ॥२॥
माघांत खुडण संपलें, मदन आलें रासीं । कीं पडल्या राशी जी
बातमी सकळ लागली तुझी चोरासी । कीं फाल्गुन मासीं जी
जिव घेउं पाहतो काळ उभा द्वारासीं । कीं कापी शिरासी जी
आला ब्रह्मधनाचा बहार ऐन बहारासी । कीं झोंपिं कां जाशी जी
म्हणे विष्णुदास हरिनामीं भजन करि कडका । कीं पडला डाका जी॥३॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९५ ) पद

( चाल : कबिरी. )

मारतिल चोर आघाडी, चालला दिवस हाण गाडी ॥ ध्रु० ॥
सुस्ति नको करूं, पडेल झांपड, रात्र मोठि अंधारी
अंगाभंवतीं चमकतील त्या तरवारीच्या धारी ॥ मारतिल० ॥ १ ॥
लागल ठोकर, बसेल टक्कर, चक्कर खाशिल राजा
चाकावरती उलथुनि पडशिल पिउं नको तूं गांजा ॥ मारतिल० ॥ २ ॥
दे सोडुनिया आडरानच्या आजु-बाजुच्या वाटा
आल्या वाटे चल संभाळुनि पाहुनि चिखल, गोटा ॥ मारतिल० ॥३॥
नको करूं तूं निमकहरामी, किती मारूं हांका मी
वारंटाच्या आधिंच रक्कम दाखल कर मुक्कामीं ॥ मारतिल० ॥ ४ ॥
गाफल राहूं नको गव्हारा ! पुढें दग्याचा खोरा

मालकाला घेउन बुडशिल, रडशिल फजीतखोरा ! मारतिल० ॥ ५ ॥
करतिल ताडातोडि फोडतिल शरिरधनाची पेटी
विष्णुदास म्हणे, तरि मग कैंची जगदंबेची भेटी ! मारतिल० ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ॐ ! ! !

## ( ९६ ) पद

( चाल : लावणीची. )

सावध गड्या, सावध गड्या । चोरांच्या पडल्या घरांत उड्या ॥ध्रु०॥
पहांट झाली, पहांट झाली । शुक्राचि फेरि मग फिरुनि आली
दिवाळी सारी झोंपत गेली । सुताची वात मग मुतानं नेली
वाऱ्यानं केल्या टिरि उघड्या ॥ चोरांच्या० ॥ १ ॥
दमडिचि किम्मत विषाची पुडी ! फुकट गेली लाखाची घडी
काळिया नागाची पांढरी फडी । लोण्यावर पडली बोक्याची उडी
थुंकुनि टाकला पानाचा विडा ॥ चोरांच्या० ॥ २ ॥
ओढ्याच्या ओढीनं फिरून फिरून । ढेकळाची तुरबत जाइल झरून
बगळिचि संगत धरून धरून । खेकड्या जासिल फुकट मरून
फांशांत पडुं नको दाटून वेड्या ॥ चोरांच्या० ॥ ३ ॥
बायकोच्या ताटांत तुपाची वाटी । आइच्या लागली कुसळ पाठीं
बायकोला जरिकांठाची धटी । आईच्या नशिबीं हजार गांठी
कशानं जिरतिल अफुच्या वड्या ॥ चोरांच्या० ॥ ४ ॥
चोरांनिं येउनि फोडिलं मकान । धुंडुनि बाहेर काढिलं दुकान
विष्णुदास म्हणे, अझुन कां न । उठसी ? बुजून गेलेत कान
बुरजाच्या फांदिला लाविल्या शिड्या ॥ चोरांच्या० ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९७ ) पद

दादा, एक ठकडी बायको आली । भल्याभल्याला ठकवुनि गेली ॥ध्रु०॥
ओळखि ना धर्म, पुण्यहि, पाप । जाणि ना बंधु, लेक, ही बाप

नवऱ्याला मारूनि थाप । निजवी महालीं ॥ दादा एक० ॥ १ ॥
नेसली काळी धटि जरतारी । तिच्या स्वरूपाला नाहिं उतारि
होइ ना कधीं तरि म्हातारी ! अमृत प्याली ॥ दादा एक० ॥ २ ॥
नाडले जोशि, पुराणिक, शाहणे । मांडलें नाच, तमाशा, गाणें
मोडलें हरीकथेचें ठाणें । रीत बुडवीली ॥ दादा एक० ॥ ३ ॥
भले भले पाडी अटकेंत । हटकुनी गुंग करी घटकेंत
शिरजोर गेली लंकेंत । आग लाविली दादा एक० ॥ ४ ॥
आडवुनि धरि मोक्षाच्या पदा । देई ना दाद व्यास-नारदां
भीमाच्या हातांतिल गदा । वेगळी केली ॥ दादा एक० ॥ ५ ॥
विष्णुदास म्हणे, सज्जना । ओळखावा प्रश्न हा जुना
सांगतों करूनि गर्जना । अर्जुना भ्याली ॥ दादा एक० ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ९८ ) पद

( चाल : कबिरी. )

पहा, काय अजब जलशाचा, तमाशा हा बिन्पैशाचा ॥ ध्रु० ॥
लक्षुनि भृकुटिस्थान, कपाटें लावुनि दों नयनांचीं
सगुण शोभा अवलोकावी पूर्णब्रह्मसदनाची ॥ पहा० ॥ १ ॥
दश अवतारांचीं हीं चित्रें नाचति दश दरवाजे
शंख, दुंदुभी, मृदंग, घंटा, मुरली, घुंगरु, वाजे ॥ पहा० ॥ २ ॥
असंख्य लखलखती नक्षत्रें, तळपति रविशशि कोटी
बहु रंगाच्या घड्या उकलती ब्रह्मांडाच्या पोटीं ॥ पहा० ॥ ३ ॥
शुभ्र वर्ण, निळे, हिरवे, तांबडि, प्रभा फांकली पिवळीं
रत्नजडित-सिंहासन-मंडित माणिक, मोतीं, पवळीं ॥ पहा० ॥ ४ ॥
रंगमंडळें येतीं जातीं गरगर चक्रें फिरतीं
विलोकितां तीं आनंदाच्या समुद्रासि ये भरती ॥ पहा० ॥ ५ ॥

शोभति नाना कल्पलता-द्रुम, वाहे अमृतगंगा
विष्णुदास म्हणे, गुरू गारुडी, खेळ आणिला रंगा ॥ पहा० ॥ ६ ॥
ॐ !　ॐ ! !　ॐ ! ! !

## ( ९९ ) पद

( चाल : कविरी. )

त्याचं नांव दादा, मला सांग, तें कोणतें पांखरूं ॥ ध्रु० ॥
मोठ्या मोठ्या पारध्यांच्या फांशामधें नातुडे
सप्तलोक नवखंड पृथ्वी पंखावांचुनि उडे ॥ त्याचं० ॥ १ ॥
जें जें दिसे ना तें तें पाहतं जन्माचं आंधळं
असूनि बायल राहतं वायलं, मुलखाचं शिंदळ ॥ त्याचं० ॥ २ ॥
चोंचीवांचुनि टोंची मारी, नाहिं कुणाला भीत
गरम-नरम निबर चारा खात पाणी पीत ॥ त्याचं० ॥ ३ ॥
आठव्या समुद्रामधें बांधिलं, वतनदारीचं घर
चक्रावांचुन उदंड मडकीं फिरवितसे गरगर ॥ त्याचं० ॥ ४ ॥
त्याला धरायासाठीं हिंडतं ब्रम्ह्याचं लेंकरूं
विष्णुदास म्हणे, त्यासि धरिल जो तोचि आमुचा गुरू ॥ त्याचं० ॥ ५ ॥
ॐ !　ॐ ! !　ॐ ! ! !

## ( १०० ) अभंग

चैत्र पौर्णिमा वासंत । गृहा आले साधुसंत ॥ १ ॥
ब्रह्मरूप दिसलें आज । रामचंद्रमहाराज ॥ २ ॥
थोर पुण्य होतें गांठीं । म्हणुनि झाली संत-भेटी ॥ ३ ॥
झालें समाधान चित्ता । गेली तळमळ चिंता ॥ ४ ॥
भवाटवीभयभंगा । आळशावरी आली गंगा ॥ ५ ॥
प्रेमामृत जळ प्रांजळ । झाला आश्रम सुफळ ॥ ६ ॥
कृतकृत्य झालों आम्ही । म्हणे पुरुषोत्तमा स्वामी ॥ ७ ॥
ॐ !　ॐ ! !　ॐ ! ! !

## ( १०१ ) आर्या*

[ उमरखेडचे प्रसिद्ध पंडित वे. शा. स. रावजीशास्त्री पाध्ये हे अंध होते. त्यांनीं श्रीविष्णुकवींना भेट देण्याबद्दल पाठविलेल्या पत्राचें उत्तर हें पत्र आहे. या पत्रांत कवीची उच्च भूमिका स्पष्ट दिसत आहे. ]

श्रीवेदशास्त्रमंडित रावजिशास्त्री प्रसिद्ध या नामीं ।
शिरसाष्टांगें नमितों औदुंबर क्षेत्रवासि यांना मी ॥ १ ॥
ज्यानें शुकवत् शतशः शिष्यां भागवतींच बोलविलें ।
भूमंडळ ज्ञानामृत-घनवृष्टीनें यथेष्ट ओलविलें ॥ २ ॥
केला दुर्दैवाच्या अभ्रानें ज्ञानसूर्य अंध कसा ।
त्या विरहें मज वाटे चंदन सूगंध उग्र गंधकसा ॥ ३ ॥
ज्या श्रीगुरुनें पत्रीं मज मोत्यांच्या वळीच पाठविल्या ।
त्या माय रेणुकेच्या म्यां पदहारामधेंचि गांठविल्या ॥ ४ ॥
भेटीसाठीं गुरुंनीं पाठविलें पत्र हें सखेद मला ।
यास्तव तुज जगदंबे जिव माझा प्रार्थितां सखे दमला ॥ ५ ॥
पत्रद्वारें आर्या आर्यो लिहिणें प्रशस्त आर्यास ।
दासाच्या दासाची विनवणि मानूं नये विपर्यास ॥ ६ ॥
भो स्वामि, रेणुकेच्या वदनीं वदतां कथा आशिव शिव हो ।
फसावेल कल्पलताही ऐसें बोलूं नयेचि शिवशिव हो ॥ ७ ॥
पत्रीं चोजविलें बिज उपदेशाचें अरंभि नाथांनीं ।
परि कशि पाजिल धेनू निज वासरुं झोंबल्याविना थानीं ॥ ८ ॥
श्रीगुरुगंगे! आलें, माझें हृद्गत तुला सकळ कळुनी ।
यास्तव धांवत आलीस आळशावर माउली तूं कळवळुनी ॥ ९ ॥
पत्रचि पाहतां वाटे आलें, कैवल्य आसनावरती ।
परि आपर दुःखेंही आनंदें साश्रु श्वास नावरती ॥ १० ॥

---

* ९-१०; २५ ते २७ व ३६ ते ४६ या आर्या जास्त मिळाल्यामुळें या आवृत्तींत घातल्या आहेत.

वाटे क्षितिवर आलें सोडुनिया चंद्रबिंब गगनातें ।
मी कोणतें चकोराविण दुसरें लावुं त्यांसि मग नातें ॥ ११ ॥
गुरुपदिं शरण रिघावें टाकुनि हव्यास शोकशाला हो ।
काया माया वाया आतां दैवा मला कशाला हो ! ॥ १२ ॥
श्रीगुरुकल्पतरुतळीं स्वप्नीं जातां न बोलवायास ।
हरि हा म्हणतिल भेटिस स्वगृहीं जाती न बोलवायास ॥ १३ ॥
मज शिष्यांत गणावें तुम्हि श्रीगुरुवेदव्यास भगवान ।
वैराग्य भाग्य द्यावें देतां बाणा परंतु भगवा न ॥ १४ ॥
पोंचलि हनुवटि नाकां काळाचा बैसला पुढें नाका ।
लागलि चंद्री नाकां गम्मत आतां तुम्ही पहाना का ॥ १५ ॥
ज्ञानांध झोंपिं गेलों नाहीं स्वहितार्थ हेतु जागाया ।
जागवि पायांपाशीं दे बाई, रेणुके, तुं जागा या ॥ १६ ॥
वाटतें आई जगदंबे, प्रेमळ गाणें मला तुला गावें ।
राहुनि हृदयांतरिचीं गाऊं गाणीं मला तुला गावें ॥ १७ ॥
पहातां पहातां श्रमलों जगतांतिल या समस्त भाउलिला ।
परि गुरु स्वस्थ करा मज हृदयास्थित दाखवोनि माउलिला ॥ १८ ॥
श्रीगुरुभजनीं केल्या अर्पण घटकाहि साठ रावजिला ।
संतोषलि जगदंबा बहु मानवला असा ठराव जिला ॥ १९ ॥
अंतःस्मृतिच्या पूर्वी बाहेरच्या रुचति देवता लटक्या
राणीच्याहि अगोदर रतिमंदिरीं वर्तती जशा बटक्या ॥ २० ॥
तुळशीविण विष्णुपुजा सागाच्या होय वंद्य पानांनीं ।
तरि आत्मज्ञानाविण मोक्षहि लाभेल मद्यपानांनीं ॥ २१ ॥
गुरु देव बाप आई आत्मत्वें एक सेज मानावी ।
ही वेदाज्ञा ढळतां तरि मग पुज एकसे जमा नांवीं ॥ २२ ॥
एकी एकी एकाचि आत्मा म्हणतात वेद निकरानें ।
बाकी एकाचि उरतो भागावे शंभरासि अकरानें ॥ २३ ॥

( गीता, श्लोक ४२, अध्याय १०; अथवा बहुनैतेन. )

किंबहुना तूं पार्था इतुकें ध्यानांत ठेवुनी पाहे ।
एक्यांशें सर्व जगीं परमात्मा मी भरोनिया आहे ॥ २४ ॥

( श्लोक. )

लाभावा स्वहितार्थ लाभ म्हणुनी हेंही बहू जाणतां
आत्म्यावांचुन श्रेष्ठ लाभ दुसरा सांगा तुम्ही कोणता
होऊनी स्वहितार्थ घात म्हणुनी हेंही बहू जाणतां
आत्म्यावांचुनि श्रेष्ठ घात दुसरा सांगा तुम्ही कोणता ॥ २५ ॥
देहाचा अभिमान मान धरुनी कां चालती चालणें
आत्म्याचा अभिमान मान त्यजुनी कां बोलती बोलणें
देहाचा जडभार घेउनि पशूऐसेंच कां चालती
आत्म्याचा जडही प्रभाव अवघा ऐसें न कां बोलती ॥ २६ ॥
देहापासुन एकपाक्षि म्हणती आत्मा असे वेगळा
या संधींत धरावयासि कविचा अद्वैत धांवे गळा
सोन्याची पुतळी दिसे जरि तरी सोनेंचि तें भर्पुर
ऐसें दाविल कोणहो निवडुनि तो गंध हा कर्पुर ॥ २७ ॥
अभ्यासें कळला करीं अकळला आतमा जयाला भला
त्यातेंची बहु भाग्यवान म्हणती योगी भला हो भला
शास्त्रें वेद श्रुति अशेष करती सिद्धांतची शंभर
आत्मा पाहिल आत्मदृष्टि नर जो तो तोचि विश्वंभर ॥ २८ ॥
शाब्दीक ज्ञान प्रकटे जरि गाढवाचें
ओझेंचि व्यर्थ श्रमतें तरि गाढवाचें
अभ्यासि लागल जेव्हां क्रमशा कळाया
तेव्हांचि येइल त्रिविक्रम आकळाया ॥ २९ ॥

सर्व घटीं परमात्मा एकाचि परि न ये उपासनेला हो
श्रीरामरूप धरुनी कृष्णे मारुति गृहास नेला हो ॥ ३० ॥
बहुविध गुण रुप रंगीं जिवनकला माय रेणुका ही हो
या सुखसरितेवांचुनि न रुचे मज आणुरेणु कांहीं हो ॥ ३१ ॥
करुणावते माझी करुणा तुझिया मनांत येवो दे
शिशुच्या लक्ष हकेला आई ! तूं तरि एक वेळ ये वो दे ॥ ३२ ॥
त्वां जरि बहुविध चिंता संकट दुःखींहि दाविली समज
तरि मी शरण कुणाला नाहीं जाणार माउली समज ॥ ३३ ॥
झाला आनंद पत्रीं तो जडकोशांत नाहिं सांठविला
अंतर्दिप चेतविला गुरुचरणाचा प्रताप सांठविला ॥ ३४ ॥
निर्गुण गुण वर्णावे पंडित धाराचि हा सदा साचा
परि सन्मान नको मज आहो तुमच्याचि दास दासाचा ॥ ३५ ॥
देइल अरुची गुरुची, वाणी गुळघृत हतांत कां कणकी।
नवरत्न-मुद्रिकेहुनि, साजे सतिच्या हतांत कांकण कीं ॥ ३६ ॥
श्रीमंत यंत्र तंत्र न या त्रय सोडी असूत्रकारास।
परि रंगीं नाचवावें, उचितचि गुरुराज सूत्रकारास ॥ ३७ ॥
मूर्खाप्रति मूर्खाचा, द्यावा दृष्टांत काकि काकाचा।
नोहे आइबापाचा, तो होइल काय काकि काकाचा ॥ ३८ ॥
हृदयांतरिं पाझर हा, ओला होइल काय हो बोला।
मुळपिठ रंगीं रंगा, शिणली धारिला म्हणून आबोला ॥ ३९ ॥
*अइपण त्यजिलें अईनें, गुरुपण त्यजिलें जरी गुरू गुरुनें।
तरि मीपण मी माझें सोडित नाहीं म्हणून गुरुगुरु ने ॥ ४० ॥
*मोडिन मीपण जेव्हां, मी तेव्हां मग तुम्ही न राहाल ।
तुमच्या चरणासाठीं, होतिल होवोत या नरा हाल ॥ ४१ ॥

---

* फारच उत्कृष्ट तत्त्वपर आर्या आहेत. त्यांचे वाचनापासून उच्च दर्जाचें समाधान वाटेल.

सगुणामृत सेवावें, निर्गुण निरधर्म काय चाटावें ।
आहं सोहं गर्भीं, भक्तिसुखाचे उपाय आटावे ॥ ४२ ॥
चंद्रवदन मृगलोचन, नामें बहु खास दान मोत्याचें ।
जो गुणरत्न हें दाविल, चरणानंदें सदा नमो त्याचे ॥ ४३ ॥
होइन पावन येइन, श्रीसद्गुरु सदानिं दर्शनाला हो ।
नमनें सहजचि येइल, तत्त्वमसी पद निदर्शनाला हो ॥ ४४ ॥
श्रीगुरु दर्शनमात्रें, तरतिल पापिष्ट हें असें काय? ।
विष्णुदास म्हणे तरि, बोलावें क्लिष्ट हें असें काय ॥ ४५ ॥
ह्या चट पटक्या फटक्या, आर्या अव्यंग व्यंग चाळीस ।
निजसेवेसी सजवुनि, घ्या एखाद्या तरी गचाळीस ॥ ४६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# भाग ७ वा



## जन्म व पाळणे

### जन्म

### ( १०२ ) दत्त-जन्म

( अंजनीगीत. )

श्रीगुरुनारायण जयहरी । अखंड गर्जे नामोच्चारीं ।
ब्रह्मवीणा करीं, ब्रह्मचारी । ब्रह्मपुत्र ॥ १ ॥
ब्रह्मानंदीं अंत:करण । ब्रह्म सनातन जो परिपूर्ण ।
करीत स्वानंदें परिभ्रमण । कैलासा गेला ॥ २ ॥
चंचळ चपळ मनोगति चाले । निश्चळ आत्मध्यानीं डोले ।
निर्गुण सगुण गांभिर बोले । त्रिभुवनिंची वार्ता ॥ ३ ॥
बोले सन्मुनिप्रति पार्वती । पतिव्रतासद्‌गुणकीर्ती ।
कोण वदाया पृथ्वीवरती । सुरकामिनि मान्या ॥ ४ ॥
बोले नारद त्रिवार वाणी । पतिव्रता पुण्यशिराणी ।
दुसरी अनुसूयेच्यावाणी । ब्रह्मांडीं नाहीं ॥ ५ ॥
रविपुढें जणुं खद्योत्वत् मलिना । भासति सुरविधिहरिहरललना ।
अनुसूयेची करिति न तुलना । पदअंगुष्ठाची ॥ ६ ॥
पवित्र अत्री-ऋषिची जाया । पवित्र जीचें चरित्र गाया ।
पवित्र व्हाया तीर्थें पायां । वंदन करिती ॥ ७ ॥
लक्ष्मी-पार्वती-सावित्रीला । यापरि सांगून नारद गेला ।
निजअपमानें तिघींस चढला । चिंताज्वर भारी ॥ ८ ॥
तिघांसी म्हणती तिघी वनिता । देवपणाची कैची सत्ता ।
आम्हांहुनि आली अधिकता । त्या विप्रस्त्रीला ॥ ९ ॥

यामध्यें नाहीं तिळ अनुमान । दुःखचि वाटे मरणसमान ।
म्हणती सोसे ना अपमान । क्षणभर आम्हां ॥ १० ॥
यास्तव आपण सत्वर जावें । कळेल जैसें तैसें करावें ।
निर्भिड होउनि सत्त्व हरावें । त्या अनसूयेचें ॥ ११ ॥
अनसूयेचें सत्त्व न हरितां । स्त्रीमोहानें मागें परतां ।
तरि मग प्राणत्यागापरता । संकल्प नाहीं ॥ १२ ॥
त्रिवर्ग बहु सक्रोधें निघाले । सत्वर अत्रि-आश्रमीं आले ।
स्त्री-अभिमानें मानव झाले । देवाचे देव ॥ १३ ॥
म्हणती, वस्त्र त्यागुनि भिक्षा । वाढी, आम्हां हीच अपेक्षा ।
अजि पुरवावी, नाहींपेक्षां । परतोनी जाऊं ॥ १४ ॥
वंदुनि सद्भावें यतिवर्यां । बोले अत्रिऋषींची भार्या ।
व्हावें त्रिवर्गांहि या सत्कार्या । अज्ञान बाळें ॥ १५ ॥
अनंत ब्रह्मांडांचा मालक । अनंत स्थूळसूक्ष्म जीवपालक ।
ते झाले अज्ञानी बालक । सति अनसूयेचे ॥ १६ ॥
विष्णुदास म्हणे, नव्हे अनुचित । सद्गुरुचरणीं जडलें चित्त ।
जगदोद्धारा यास्तव दत्त- । अवतार झाला ॥ १७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०३ ) पद– परशुराम-जन्म

( अंजनीगीत. )

श्रीजगदंबा अंबाबाई । एकवीरे, माझे आई ।
तूं रेणुके, तुझिया पायीं । वंदन माझें ॥ १ ॥
धन्य धन्य तूं आई दयाळ । करिसी दीनांचा सांभाळ ।
धन्य धन्य तुझा हा बाळ । परशुराम ॥ २ ॥
परशुराम तुझा बाई । पराक्रमी दिग्विजयी ।
अवतरला हा शेषशायी । नारायण ॥ ३ ॥

व्यासें कथिलें पद्मपुराणीं । ज्याला दत्तात्रय वरवाणी ।
अजिंक्य झाला सहस्रपाणी । तो कार्तवीर्य ॥ ४ ॥
त्रिभुवनीं नाटोपे कोणासी । केलें पदच्युत देवगणासी ।
समरीं जिंकुन रावणासी । घातलें बंदीं ॥ ५ ॥
ज्याच्या दुर्धर वीर्यप्रतापें । निशिदिनिं धरणीधर संतापे ।
सरितांसह सागरजळ तापे । कांपे ब्रह्मांड ॥ ६ ॥
अंतिं क्षोभुनि डळमळली सृष्टी । झाले दानव-मानव कष्टी ।
देवऋषि-गणांसह परमेष्टी । क्षीरसागरिं आले ॥ ७ ॥
शेषशायी नारायणी । केलीं झालीं श्रुत गाऱ्हाणीं ।
प्रसन्न होउनि चक्रपाणी । वरवाणी बोले ॥ ८ ॥
पवित्र नर्मदेच्या कांठीं । त्या दशशतकर हननासाठीं ।
होइल रेणुकेच्या पोटीं । अवतार आमुचा ॥ ९ ॥
जी आदि चैतन्याची ज्वाला । जी आदिमाया गुणवेल्हाळा ।
ब्रह्मांडाच्या अनंत वेळां । माळा जी फिरवी ॥ १० ॥
ती प्रकटेल यज्ञाग्निमधुनी । वरिल महामुनि पति जमदग्नि ।
ती पार्वति श्रीदेवी भवानी । श्रीशिव-शंकर तो ॥ ११ ॥
जननी-जनकाच्या कैवारें । मारिल सहस्रार्जुन परिवारें ।
सुर हो, धरणीतळ मी सारें । निःक्षत्र करीन ॥ १२ ॥
यज्ञयागयोगादि विधानें । धर्महि स्थापिन मर्यादेनें ।
सकल तोषविन पृथ्वीदानें । ब्रह्मवृंदासी ॥ १३ ॥
ऐसी ऐकुनियां वरवाणी । पावति सुरमुनि लोटांगणीं ।
मग सकळांसह वज्रपाणी । स्वस्थानीं गेला ॥ १४ ॥
रामकथामृतरस अमोघ । तो उद्भवला सुकृत-ओघ ।
सहजस्वानंदाचा योग । योगासि आला ॥ १५ ॥
मास वैशाख ऋतु नाम । वसंत द्वितिया दिनोत्तम ।
शुक्लपक्षीं परशुराम । जन्मासि आला ॥ १६ ॥

सुस्वर वाजंत्रीं वाजती । नारद-गंधर्व गुण गाती ।
सुरवर आनंदानें करिती । वृष्टी पुष्पांच्या ॥ १७ ॥
हा प्रभुचा अवतार सहावा । त्रिभुवनीं जाहली याची वाहवा ।
ऐसा सत्पुत्रचि असावा । कीर्तिध्वज पोटीं ॥ १८ ॥
वेदपरायण परमप्रतापी । दयासागर प्रचंड कोपी ।
'शापादपी शरादपी' । दाता भगवान ॥ १९ ॥
परशुरामजन्मकथा । गातां प्रपंच-संकट-चिंता ।
सर्व निवारिल जगन्माता । श्रीरेणुका ही ॥ २० ॥
विष्णुदासही बोलिला । कळेल तैसी गाइन लीला ।
कशास विनवूं माउलीला । संरक्षी म्हणुनी ॥ २१ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०४ ) पद–मारुतीजन्म

( चाल : अंजनीगीत. )

श्रीरामायणिं वाल्मिक बोली । बोले पाऊला पाऊलीं ।
धन्य अंजनीमाऊली । बाळ तुझा ॥ १ ॥
श्रीमहारुद्र मूर्तीमंत । चिरंजीव बहु बळवंत ।
तो हा तुझ्या हनुमंत । उदरासी आला ॥ २ ॥
ज्याची महिमा पवित्र मोठी । पावन होतीं कुळें कोटी
पुरे एकची मायपोटीं । सत्पुत्र ऐसा ॥ ३ ॥
दशरथसुतकामेष्टी याग । त्या यज्ञाचा प्रसादभाग ।
त्या भागाचा हा विभाग । बाळ तुझा ॥ ४ ॥
हा कपिनायक ब्रह्मचारी । याला वंदिती वेद चारी ।
होइल दिग्मंडळसंचारी । वायुऐसा ॥ ५ ॥
रामचंद्राचा हा दूत । होइल प्रतापी अद्भुत ।
याच्या धाकानें कृतांत । कळीकाळ कांपे ॥ ६ ॥

आटिव जेठी वज्रशरीरी । अति सुंदर कटिं कौपीनधारी ।
लांगुळाच्या फडत्कारीं । ब्रह्मांड गाजे ॥ ७ ॥
चैत्र-पौर्णिमा-वासंत । पूर्ण अरुणोदयसंधींत ।
प्रात:काळीं हनुमंत । जन्मासी आला ॥ ८ ॥
जननीजठरांतून जन्मतां । गगनीं झेंपावूनी सविता ।
फळ म्हणूनि प्रथमतां । गिळीयला यानें ॥ ९ ॥
जानकिच्या हा टाळिल शोका । रावणाची जाळिल लंका ।
अनाथ शरणांगत लोका । सांभाळील ॥ १० ॥
हें हनुमंतजन्मस्तोत्र । पठतां नित्य पुण्य, पवित्र ।
हराति संकटें सर्वत्र । निश्चय जाणा ॥ ११ ॥
मारुति अंजनीनंदन । तोडी स्मरतां भवबंधन ।
त्याच्या चरणाप्रति वंदन । वेळोवेळां ॥ १२ ॥
रामनामांकित हा ठसा । सन्मुख हनुमंत आरसा ।
पहातां होय विष्णुदासा । आनंदानंद ॥ १३ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०५ ) पद– श्रीकृष्णजन्म

( चाल : अंजनीगीत. )

श्रीमद्भागवतदशमस्कंधीं । श्रीकृष्णाच्या जन्मसंबंधीं ।
सांगतसे शुक, असतां बंदीं । देवकि, वसुदेव ॥ १ ॥
यत्कारण हें हेतू राया । पृथ्वीचा जडभार हराया ।
कंसाप्रति दुर्बुद्धि वराया । गर्जे सुरवाणी ॥ २ ॥
ही दृढ ध्यानीं वसुदेवाचा । जो अठवा सुत वसुदेवाचा ।
तो कंसांतक काळ जिवाचा । निश्चय जाणावें ॥ ३ ॥
तें ऐकुन वधुवर त्या काळें । दोघे घालुन बंदीशाळें ।
यथानुक्रमें साही बाळें । अविचारें वधिलीं ॥ ४ ॥

पुढें बाळिभद्र गर्भी आला । खेळ मायेनें विचित्र केला ।
देवकिचा निजगर्भ नेला । रोहिणिच्या उदरीं ॥ ५ ॥
कंस म्हणे तुम्हि जनहो अठवा । अठवा रात्रंदिन मनिं अठवा ।
अठवा जन्मतां मज उठवा । अठवा माराया ॥ ६ ॥
मी अठव्याचा करीन घात । मी अठव्याचा लाविन अंत ।
मी अठव्याचा पाहिन हात । मी रिपु अठव्याचा ॥ ७ ॥
शुभ वर्षाऋतु श्रावण । सहरोहिणी अष्टमी जाण ।
कृष्णपक्षीं रात्रीं कृष्ण- । जन्म झाला ॥ ८ ॥
स्वर्गीं दुंदुभी गर्जती । सुरवर पुष्पांजाळि वर्षती ।
नारद, गंधर्वांहि, गाती । श्रीकृष्ण कृष्ण ॥ ९ ॥
झाले निद्रित लोक-पाल । फुटलें कंसाचें कपाळ ।
देवकीसी झाला बाळ । हें त्यासि न कळे ॥ १० ॥
तुटली वसुदेवाची बेडी । उघडलिं कुलुपेंचि कवाडीं, ।
कृष्ण घेउनियां तांतडी । बाहेर आला ॥ ११ ॥
वर्षतसे घनवृष्टी मंद । पाउलि न दिसे, दृष्टी मंद, ।
भरली यमुना, झाली बंद । गोकुळची वाट ॥ १२ ॥
चढे यमुनेचें आकंठ पाणी । पदांगुष्ठें चक्रपाणी ।
स्पर्श करितां तत्क्षणीं । दुभंग झाली ॥ १३ ॥
सत्वर नंदगृहिं वनमाळी । येउनि यशोदेच्या जवळीं ।
महामायेची कांक्षी पुतळी । तो घेउन आला ॥ १४ ॥
पुनरपि जडली बेडी पायीं । कंस मायेसि लवलाही ।
मारायास्तव धरितां पायीं । निसटुन गेली ॥ १५ ॥
ती मुळपिठाची वल्लभी । यशोदेच्या येउन गर्भी ।
कृष्ण-लीला-कीर्ति आरंभीं । सांगुनि गेली ॥ १६ ॥
श्रीशुभमंगल गोकुळीं । कळलें जन्मला वनमाळी ।
जमल्या गोपी प्रातःकाळीं । नंदाच्या भुवनीं ॥ १७ ॥

म्हणति गोपिका अगाई । तुझ्या पोटीं यशाद बाइ ! ।
हा भगवान शेषशायी । जन्मासि आला ॥ १८ ॥
भरला ब्रह्मांडीं आनंद । आनंद-सागर झाला मंद ।
राधेगोविंद गोविंद । गोविंदराधे ॥ १९ ॥
याचे अनुपम गुण गाढे । त्रिभुवनिं याचे हो पवाडे ।
याचें नांवें वस्ती वाडे । मोक्षाचे घरणीं ॥ २० ॥
हा अवतरला जगदोद्धारा । याचा युगायुगिं ऐसा धारा ।
कोण शहाणा मोजिल धारा । पावसाच्या ॥ २१ ॥
हा सर्वांच्या हृदयीं वसतो । परंतु निज भक्तांसी दिसतो ।
कोठें असतो कोठें नसतो । हा निश्चय न कळे ॥ २२ ॥
वाजति वाद्यें मृदंग-टाळा । गुलाल-कुंकुम रंगमाळा ।
आनंदाचा सुखसोहळा । व्रजनंदभुवनीं ॥ २३ ॥
देवकीउदरांतुनी जन्मला । यशोदेनें प्रतिपाळिला ।
शेवटीं उपयोगासि आला । पांडवांच्या ॥ २४ ॥
सदासर्वदा, सर्वदा । नमन तुझिया पदारविंदा ।
हरे श्रीकृष्णा, हरे मुकुंदा, । गोविंदा रामा २५ ॥
अनाथनाथा ! दीनबांधवा । मज भवबंधांतुनि केशवा ।
विष्णुदास म्हणे माधवा । सोडवावें ॥ २६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०६ ) पाळणा– श्रीदत्ताचा

जो जो जो जो रे । श्रीदत्ता । त्रैमूर्ती अवधूता ॥ ध्रु० ॥
श्रीगुरु सिंहाद्री । पर्वतीं । भक्तास्तव अवतरती
लक्ष्मी, सावित्री । पार्वती । करिती मंगळ अरती
श्रीमंगळद्वारीं । नाचती । गणपती-सरस्वती
चौघडे वाजंत्रीं । वाजती । सुरवर पुष्पें वाहती
श्रमती वेद-श्रुति । गुण गातां । त्रैमूर्ती अवधूता ॥ १ ॥

करितां भवसृष्टी । श्रमलासी । कमळासनिं बसलासी
निर्गुण सगुणरुपें । सजलासी । शेषावरि निजलासी
सन्मुख ठेवुनियां । बैलासी । नांदसि गिरिकैलासीं
तो धरणीवरि तूं । आलासी । त्रिगुणात्मक झालासी
तूं गुरु अनाथाच्या । नाथा । त्रैमूर्ती अवधूता ॥ २ ॥
निज रे निज बाळा । श्रमहनना । देवा चतुरानना
निज रे निज बाळा । खगवहना । श्रीलक्ष्मीमनमोहना
निज रे निज बाळा । त्रिलोचना । भवसंकटमोचना
निज रे निज बाळा । सुखसदना । उन्मनिं न करी रुदना
आनंद घन दाटे । तुज पाहतां । त्रैमूर्ती अवधूता ॥ ३ ॥
त्रिगुणात्मक त्रिवेणी । ही गंगा । प्रकटलि खळ-मळ-भंगा
सहस्त्रकमळदळीं-। च्या भृंगा । शिवशंकर श्रीरंगा
घेउनि अनसूया । वोसंगा । दे घुटि, करि तुटि अंगा
विष्णुदास म्हणे । दे जागा । निश्चळ पदिं सुखसंगा
विभक्त न करावें । निजभक्ता । त्रैमूर्ती अवधूता ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०७ ) पाळणा– परशुरामाचा

जो जो जो जो रे । अभिरामा । बाळा, भार्गवरामा ॥ ध्रु० ॥
हालवि पाळणा । रेणुका । सगुण-गुणमाणिका
सन्निध सिंधूची । बालिका । लक्ष्मी महाकालिका
वंदिति सन्मुनिच्या । बायका । मूळपीठनायका
येती ऋषि, ऋषिच्या । आश्रमा । बाळा, भार्गवरामा ॥ १ ॥
श्रीगंगा, यमुना । भागिरथी । प्रणिता सरस्वती
जमल्या भगवतिच्या । चौभंवतीं । उदंड सौभाग्यवती
मंगळ वाजंत्रीं । वाजती । किन्नर गायन गाती
गंधर्व, रंभा । तिलोत्तमा । बाळा, भार्गवरामा ॥ २ ॥

सुंदर पाळणा । सोन्याचा । मंडित नवरत्नांचा
शोभे चांदवा । मोत्यांचा । चंद्रमणी माथ्याचा
दिनकर ब्रह्मांड-ा-सदनाचा । प्रकाश शुभ वदनाचा
नरहरि वामना । त्रिविक्रमा । बाळा, भार्गवरामा ॥ ३ ॥
वर्षे संभार । सुमनांचा । सुगंध चंदनाचा
सुगंध हळदीचा । कुंकाचा । गुलाल-केशरांचा
परशुरामाच्या । नांवाचा । होय गजर सर्वांचा
वर्णिति गुण पुरुष । आणि भामा । बाळा, भार्गवरामा ॥ ४ ॥
झाला आनंद । परिपूर्ण । वाटिति धन-सुवर्ण
नक्षत्रमाळा । आभरण । चंद्र प्रकाशित किरण
विष्णुदास सदाऽऽश्रित शरण । अवलंबुनिया चरण
ठेवियलें नाम । अनामा । बाळा, भार्गवरामा ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०८ ) पाळणा– श्रीरामाचा

जो जो जो जो रे । श्रीरामा । त्रिभुवन-जन-विश्रामा ॥ ध्रु० ॥
जो जो जो जो रे । रघुवीरा । कुळभूषणरत्नहिरा
दशरथ भूपतिच्या । कुमारा । कोमल तनु सुकुमारा
करुणासिंधु महा । रणधीरा । अनंतगुणगंभीरा
जय जय जग-जिवना । घनःश्यामा । त्रिभुवन-जन-विश्रामा ॥ १ ॥
निज रे निज बाळा । अहिशयना । सुंदर पंकजनयना
निज रे निज बाळा । गुणगहना । सुंदर पंकजवदना
निज रे निज बाळा । मनमोहना । सुंदर पंकजसदना
निज रे निज बाळा । निजधामा । त्रिभुवन-जन-विश्रामा ॥ २ ॥
श्रीवाल्मिक-ऋषिनें । विचित्र । रचिलें रामचरित्र
सुरवर मुनि गाती । सर्वत्र । पावन परमपवित्र

रात्रंदिन जपतो । त्रिनेत्र । श्रीरामाक्षरमंत्र
न कळे वेदांसी । गुणमहिमा । त्रिभुवन-जन-विश्रामा ।। ३ ।।
अवतरलासी तूं । प्रभुराया । सद्यशकीर्ति वराया
दुर्जन-दुष्टांसी । माराया । शरणागत ताराया
विष्णूदास म्हणे । करुन दया । हृदयांबरिं ये उदया
अखंड दे भजनाऽ मृतप्रेमा । त्रिभुवन-जन-विश्रामा ।। ४ ।।
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १०९ ) पाळणा – बलभीमाचा

जो जो जो जो रे । गुणवंता । बलभीमा, हनुमंता ।। ध्रु० ।।
श्रीधर्मक्रम हा । वरिलासी । क्षितिवरि अवतरलासी
अरुणोदयिं अरुण । गमलासी । रविमंडळिं भ्रमलासी
चघळुनिया बिंबा । वमलासी । बहुतचि तूं श्रमलासी
निद्रा करि आतां । बळवंता । बलभीमा, हनुमंता ।। १ ।।
एकादश रुद्र । शुळपाणी । बोले वाल्मिक-वाणी
रघुविर-विजयाची । निशाणी । लावण्याची खाणी
कुंडलें धृतमकरा- । कृति कर्णीं । गर्जति नुपुरें चरणीं
कटिं कौपिन शोभे । व्रतवंता । बलभीमा, हनुमंता ।। २ ।।
निज रे निज बाळा । शुभगात्रा । सुंदर पंकजनेत्रा
निज रे निज बाळा । जगमित्रा । पावन परमपवित्रा
निज रे निज बाळा । सत्पात्रा । तूं व्यापक सर्वत्रां
निज रे निज बाळा । भगवंता । बलभीमा, हनुमंता ।। ३ ।।
हलवी पाळणा । अंजनी । अखंड निरंजनी
मुखकमळीं मधुची । तर्जनी । काजळ नेत्रांजनीं
शीतळ पवन मनो-रंजनी । पदरा द्या व्यंजनी
त्रिभुवन आनंदें । गुण गातां । बलभीमा हनुमंता ।। ४ ।।

सुरवर पुष्पांचे । संभार । वर्षति वारंवार
गंभिर ऐकुनिया । बुभुःकार । करिती जयजयकार
विष्णूदास म्हणे । शतवार । माझा नमस्कार
जय जय बजरंगा । जयवंता । बलभीमा, हनुमंता ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११० ) पाळणा— श्रीकृष्णाचा

जो जो जो जो रे । अनंता । श्रीकृष्णा भगवंता ॥ ध्रु० ॥
अनंत पुण्याची । शिराणी । व्रजनंदाची राणी
सच्चिदानंदाची । खाणी । तो हा चक्रपाणी
हलविती घालुनियां । पाळणीं । गोकुळच्या गौळणी
जैशा चमकति त्या । चंचलता । घनमंडळिं विद्युल्लता ॥ १ ॥
श्रीपति सुत झाला । नंदाचा । दिवस आनंदाचा
उद्भवला म्हणती । या पदाचा । सुरवरव्रजवृंदांचा
करति गजर श्री- । वरदाचा । उत्सव गोविंदाचा
जमल्या व्रजवनिता । लघुदुहिता । देवि देव त्या सरिता ॥ २ ॥
पदतळिं बळी धरिला । का नाहीं । ती तुज स्मृति का नाहीं
सहस्रार्जुन वधिला । का नाहीं । ती तुज स्मृति का नाहीं
रावण क्षय केला । का नाहीं । ती तुज स्मृति का नाहीं
प्रस्तुत कंसाची । तरि आतां । करितोसी कां चिंता ॥ ३ ॥
वाजति वाजंत्रीं । करताळा । लोंबति तोरण, माळा,
मंगल गीत गाती । वेल्हाळा । होत बहुत सुखसोहळा
निद्रा करि बाळा । गोपाळा । श्रीकृष्णा, घननीळा
विष्णुदासासी । नसे चिंता । चिंतीता अच्युता ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

# भाग ८ वा



## आरत्या

### ( १११ ) आरती– गणपतीची

जय जय श्रीगजवदना, हे गणराया, गौरिकुमारा हो
करुणाकर सुकुमारा, महारणधीरा, गुण गंभिरा, हो ॥ ध्रु० ॥
शेंदुरवक्त्र-सुरंगित, अनुपम दोंदिल, रूप साजरें हो
शुंडादंड सुशोभित, सदा मद गंडस्थळिं पाझरे हो
कनक-कटक-मुकुटाच्यावर जडिताचे चकमाते हिरे हो
श्रीकृष्णागर चंदन अंगीं उटि मर्दित केशरें हो
मस्तकिं धरिसी बरवा हिरवा मरवा दुर्वांकुरा हो ॥ जय जय० ॥ १ ॥
कासित पितांबर पिवळा, गळां हार पुष्पांचे डोलती हो
तळपति कुंडलें कर्णीं, पंखे कर्णांचे हालती हो
सिद्ध, सरस्वति, ऋद्धि, सिद्धि, बुद्धीनें चालती हो
रुणझुण पैंजण चरणीं, वाणि गीर्वाणी, बोलती हो
वंदिति सुरनर पन्नग, निजगण वारिति शिरिं चामरें हो ॥ जय० ॥२॥
सकळ मंगळारंभीं, सकळहि चिंतिति चिंतामणी हो
चिंतन करि चतुरानन, गुणगण वर्णी दशशत फणी हो
नामस्मरणें पळती, कोटी विघ्नांच्या त्या श्रेणी हो
उद्धरि भक्त न हलतां, किंचित नेत्राची पापणी हो
त्राता तूं सर्वत्तां, रविशशिइंद्रासह सुरवरां हो ॥ जय जय० ॥ ३ ॥
शरणांगत मी आलों, तुज फरशांकुश-मोदक-धरा हो
धांवे, पावे, कृपा कर सत्वर, यावें लंबोदरा हो
ओवाळिन आरती उजळुन दीपावळी कर्पुरा हो

वाहुनिया पुष्पांजलि पदयुग वंदिन जोडुन करा हो
विष्णुदास म्हणे, करी पावन वर देउनि किंकरा हो ॥ जय जय०॥४॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११२ ) आरती– उनकेश्वराची

( चाल : आरति भुवनसुंदराची. )

जय जय श्रीगुरुशरभंगा । आरती उनकेश्वर-लिंगा ॥ ध्रु० ॥
भूमंडळीं उनकेश्वर क्षेत्र । पुण्यस्थळ पावन सुपावित्र
सन्मुनि वसति दिवस-रात्र । जपति शिवपंचाक्षरि मंत्र
गंधाक्षता, बिल्वपत्र । अर्पितां प्रसन्न त्रिनेत्र
(चाल) भक्तजन पुजिति नीळकंठा
गर्जती शंख, दुंदुभि, घंटा
महोत्सवपर्व—गाति गंधर्व—स्तविति सुर सर्व
उजळुनि कर्पूर, दीप रांगा । ओवाळिती कर्पुरांगा ॥ १ ॥
निकट अर्धांगि शैलबाळी । विराजे अर्धचंद्रमौळी
नंदि विरभद्र भद्रकाळी । नाचती गण सायंकाळीं
उष्ण जळिं करितां आंघोळी । होय कुळपातकांचि होळी
(चाल) भ्रमत अवधूत दत्त लहरी
फिरत शुक-नारदाचि फेरी
उडे भजनरंग—सदा सत्संग—डुल्लति भुजंग
पूर्वमुखाऽमृत जळ-तरंगा । प्रदक्षिणि वाहे बाणगंगा ॥ २ ॥
सुरभिसम विपुल वृषभ-गाई । सुशोभित वनचंपक-जाई
कल्पद्रुम-लता-आमराई । वाहती पाट ठाइं ठाईं
येति वट-अटन करित पायीं । राम-सौमित्र-सिताबाई
(चाल) अखंडित उष्ण शितळ पाणी
करि कोदंड चापपाणी

सगुण गंभीर—महारणधीर—बाप रघुवीर
सनातन भक्त-कामिं जागा । प्रकट करि पुण्याश्रम-जागा ॥ ३ ॥
नमस्ते विश्वंभरभरणा, करुणानिधे, करी करुणा
निवारी जन्ममरण भ्रमणा, दयाळा, श्रीपार्वतिरमणा
दिनाच्या दुरित दुराचरणा नाठवी दावि सुखद चरणां
(चाल) विष्णुस्वामि म्हणे स्वानंदें,
निरंतर भजनीं वासना दे
शंभुशंकरा—प्रभो दशकरा—प्रमोदित करा,
प्रबोधी ज्ञानपदाभंगा, जयजय उनकेश्वर-लिंगा ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११३ ) आरती– शंकराची

जय जय शिवशंभो, शंकरा । हर, हर, कर्पुरगौरा ॥ ध्रु० ॥
अघटित घटित कृती तुझि सारी । विश्वंभर, संसारी
तुंबळजळगंगासहित शिरीं । प्रळयानळ तेजःश्री
केवळ निळकंठ विषधारी । चंद्रामृत रसधारी
लंपट अर्धांगीं प्रिय नारी । अससी परि मदनारी
समान अहिमुषकासनमयुरा । गणपति-स्कंदकुमारा ॥ १ ॥
अनंत ब्रह्मांडांच्या माळा । फिरविसि अनंत वेळां
सच्चिदानंद तुझी कळा । न कळे, भ्रम पडे सकळां
किंचित् जाणिल तो नर विरळा । ब्रह्मांडामधिं आगळा
ब्रह्मज्ञानाच्या विशाळा । अभ्यासाच्या शाळा
नेणुनि बहु करती पुकारा । मूळाक्षर ॐकारा ॥ २ ॥
आज्ञेविण न हले तृण, पाणी । पवनगजाज्जिववाणी
भ्रमतीं नक्षत्रें शशितरणी । प्रन्नग, शिरिंधरी धरणी
खग-मृग-तरु-कीटक जडप्राणी । वर्तति ज्या अनुसरुनीं

स्वतंत्र तो तूंची, तुझी करणी । शिव, शिव, हे शुळपाणि
अनाथ दीनांचा तूं आसरा । लोकत्रयीं नसे दुसरा ॥ ३
शरणागत आलों पायांस । संरक्षण करि यास
अखंड रक्षिसि तूं । विश्वास । आहे बहु विश्वास
सदैव हृत्कमलीं करि वास । एवढी पुरवी आस
आशा न करावी उदास । बोले विष्णूदास
अनंत भूलिंगा अवतारा । भवनिधिपार उतारा ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११४ ) आरती– सिद्धेश्वराची

जयदेव, जयदेव, जय सिद्धेश्वर देवा
जय करुणाकर शंकर हर हर महादेवा ॥ ध्रु० ॥
श्रीमातापुरक्षेत्रोत्तरपंचक्रोशीं
सिद्धेश्वर पुण्यस्थळ निर्मळ निर्दोषी
वसाति श्रीदत्तात्रय-कपिलादिक ऋषी
म्हणती, मोक्षपुरी ही न तुळे सहस्रांशीं ॥ १ ॥
श्रीप्रणिताख्या गंगातट दक्षिणभागीं
वाहे पूर्वाभिमुख पार्वति वामांगी
सन्मुख गणपति, नंदी, गण, शृंगी, भृंगी
वाजति मृदंग, घंटा, दर, डमरू, पुंगी ॥ २ ॥
ऋद्धि, सिद्धि, सरस्वती, लक्ष्मी, महाकाळी
नारद, तुंबर, गंधर्वादिक सायंकाळीं
गाती, नाचति, गर्जति, परमगदारोळी
सुरवरमुनिजन भजती शिव चंद्रमौळी ॥ ३ ॥
शोभति गुल्मलताद्रुम-घनमंडपव्योमीं
निजस्वानंदें खगमृगगण क्रीडति भूमीं

झाले साधक सिद्धचि जन या बहु धामीं
विष्णुस्वामि वदे, श्रुति न वदे बहुधा मी ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११५ ) आरती– परमेश्वराची

जयशिवशंकर, सर्वेशा । परमेश्वर, हरिहरवेषा ॥ ध्रु० ॥
कर्पुरगौरा, शुभवदना । श्रीघननीळा, मधुसुदना
सदाशिव, शंभो, त्रिनयना । केशवाच्युता, अहीशयना
अखंड, मी शरण मदनदहना । दाखवी चरण गरूडवाहना
चाल– दयाळा हिमनगजामाता । कृपा कर श्रीलक्ष्मीकांता
स्तवितों दिनवाणि, पाव निर्वाणीं, गजेंद्रावाणि
सोडवी तोडुनि भवपाशा । धाव अविलंबें जगदीशा ॥जय०॥ १॥
सुशोभितजटामुकुटगंगा । धृतपदलांच्छनभुजंगा
वामकरतलमंडितलिंगा । त्रिशुळ, जपमाळ, भस्म अंगा
निरंजन, निर्गुण, निःसंगा । सगुण रूप सुंदर आभंगा
चाल– क्षितितळवर्टी जगदोद्धारा । करुणामृतसंगमधारा
जाहली प्रकट, चिंतितां लगट, शीघ्र सरसकट
करी नटखट चट गट क्लेशा । पालटवी प्राक्तनपटरेषा ॥जय०॥ २॥
लाविती कर्पुरदिप सांभा । आरती करिती पद्मनाभा
दिसतसे इंद्रभुवन शोभा, कीर्तनें होति, गाति रंभा
निरसुन कामक्रोधलोभा । लाभति नर दुर्लभ लाभा
चाल– द्विजांच्या सहस्रावधि पंक्ति । प्रसादें नित्य तृप्त होती
चंद्रदिप भडके, वाद्यध्वनि धडके, पुढें ध्वज फडके
पतित जन होतो निर्दोषा । ऐकुनि भजनाच्या घोषा ॥जय०॥ ३॥
दीन ब्रिद वत्स वाढविणें यास्तव एचिलें वाढवणें

---

१ 'वाढवणें' माहूरचे दक्षिणेस १५ कोसांवर आहे तेथें श्रीपरमेश्वराची उत्कृष्टमूर्ति मंदिरासह आहे.

प्रभुच्या चरणाश्रयिं रहाणें । वांच्छिति सनकादिक शाहणे
कशाला भागिरथिंत न्हाणें । तरि नको पंढरपुर पहाणें
पहातां समुळ दुःख विसरे । भुलोकीं वैकुंठचि दुसरें
गरुड-बैलास, वाटे कैलास, चढे उल्हास
विष्णुदास पावे हर्षा । करितां नमन आदिपुरुषा ॥ जय० ॥४॥

ॐ !   ॐ ! !   ॐ ! ! !

## ( ११६ ) आरती– काळभैरवाची

जय जय श्रीशिवकाशीविश्वेश्वररूप, विश्वंभरा हो
ओवाळुं आरती तुजप्रति काळभैरवेश्वरा हो ॥ ध्रु० ॥
जय जय विराट पुरुषा, विराट शक्तीच्या वल्लभा हो
अनंत ब्रह्मांडांच्या माळा फिरवित अससी उभा हो
शशिसूर्यांच्या बिंबीं तुझिया तेजांशाची प्रभा हो
प्रचंड चंडप्रतापें कळिकाळाच्या वळती जिभा हो
नाजळसी नाढळसी भू-जलिं-अनिलीं-नीलांबरा हो ॥ १ ॥
अद्‌भुत काया, माया, अद्‌भुत वीर्याची संपत्ती हो
पाहतां भ्रमले श्रमले कमलोद्‌भव श्रीकमलापती हो
तुझिया नामस्मरणें विघ्नें शतकोटी लोपती हो
वर्णिति शंकर-पार्वति-कार्तिकस्वामी-गण-गणपतीहो
निज इच्छेनें करसी उत्पत्ति-स्थिति-लय संहारा हो ॥ २ ॥
अनंत अवताराच्या हृदयीं जपतां गुणमालिका हो
मूळपीठ-नायका प्रकटे साक्षेपें महाकालिका हो
श्रीअन्नपूर्णा, दुर्गा, मणिकर्णिका, गिरिबालिका हो
तूंचि पुरुष-नटनारी-श्रीविधि-हरि-हरतालिका हो
तूं सुरतरु, भाविका, भावें ओपीसि इच्छित वरा हो ॥ ३ ॥
जटा-मुकुट, कुंडलें, त्रिपुंड्र गंधाचा मळवटीं हो
रत्नखचित पादुका शोभती चरणींच्या तळवटीं हो

शंख त्रिशुळ, करकमळीं, सुगंध पुष्पांचे हार कंठीं हो
तिष्ठसि भक्तांसाठीं अखंड भागिरथीच्या तटीं हो
विष्णुदासावरि करि करुणा काशीपुर-विहारा हो ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११७ ) आरती– दत्ताची

जय जय श्रीअनसूयात्मज अवधूता दत्तात्रया हो ।
तूं जगज्जननी जनकाचि सद्गुरु वंद्य तूं लोकत्रया हो ॥ ध्रु० ॥
जय जय दिगंबरा, परम उदारा, भवविस्तारा हो ।
कर जोडुनिया नमितों सहस्रवेळां, या अवतारा हो ।
जैशा दिनकरउदयीं लोपति गगनीं असंख्य तारा हो ।
तैशा अपदा हरती मुखिं निघतांची अक्षरें तारा हो ।
तूं स्मरगामी स्वामी विटलों या मी तापत्रया हो ॥ १ ॥
तूं महायोगी अर्धांगस्त्रीधारी हे मदनारी हो ।
तूं नट नरनारायण नारायणि नर तूंचि नारी हो ।
तूं रघुवीर श्रीनरहरी, हिरण्यकश्यपुहृदयाविदारी हो ।
ब्रह्मचारी तूं ब्रह्मचि, राधाकृष्ण जय कुंजविहारी हो ।
तूं दाता, तूं त्राता, तूंचि विधाता, मुनि आत्रेया हो ॥ २ ॥
तूं भक्तांकित जैसी जैसी भक्तिची भावना हो ।
तैसी तैसी करणी करणें पडे तुज जगजीवना हो ।
जिकडे पाउस अळवी तिकडे हरणी धांव घे वना हो ।
उदंड देसी परंतु प्रसाद पदरीं मज घेवना हो ।
विश्वरुपासी पाहाया करि पार्थापरि सुपात्र या हो ॥ ३ ॥
प्रसन्नवदन सुशोभित कोमल घननीळ तनु साजिरी हो ।
जटा-मुकुट कुंडलें माळा पीतांबर भरजरी हो ।
केशरी गंध सुचंदन पुष्पें तुलशीदल मंजरी हो ।

दंड कमंडलुमंडित कृष्णाजिन डमरू खंजिरी हो ।
आनंदघन स्वरुपाला देवा कधीं पाहतिल नेत्र या हो ॥ ४ ॥
सद्गुरु माउलि, कृपेचि साउलि धरि तूं दयाळु गडे हो ।
ये आई म्हणतां येसी लगबग नेसुनिया लुगडें हो ।
जरि झांकिसि तूं एवढें मातें बाळ तुझें उघडें हो ।
विष्णुदास म्हणे तरि झडतिल कीर्तीचे चौघडे हो ।
उदंड कविच्या वदनीं सतत वाजतील वाजंत्रया हो ॥ ५ ॥
ॐ! ॐ!! ॐ!!!

## ( ११८ ) आरती– दत्ताची

जयदेव जयदेव जय त्रिगुणात्मक देवा
श्रीगुरूदत्तात्रय, विधि-हरि-हर, महादेवा ॥ ध्रु० ॥
जय जय श्रीमृगराजाचल पर्वतवासा
जय जय श्रीमहायोगी जन-मानस-हंसा
जय जय श्रीदशशतदल पंकजनिवासा
जय जय श्रीनिरंजन भुवनविलासा ॥ जय० ॥ १ ॥
दंड-कमंडलुमंडित रुद्राक्षमाळा
जटा-मुकुटधृतकुंडल पीतांबर पिवळा
कंथा त्रिशुळ, डमरू, भुजंगहार गळां
मुद्रा भस्म विलेपन त्रिपुंड्र गंधटिळा ॥ जय० ॥ २ ॥
भ्रमोनि दिग्मंडळ भूस्थळ अंतराळीं
येतसे अवधुत मूर्ती सायंकाळीं
होतसे जयजयकार गजर गदारोळी
नाचे भूतगणांसह शिव चंद्रमौळी ॥ जय० ॥ ३ ॥
श्रीषड्गुणसंपन्न श्रीषड्भुजमूर्ती
भूवैकुंठ विराजे सिंहाद्रीवरती

नांदे भुक्ती, मुक्ती, धर्म, दया, शांती
विष्णुदास म्हणे श्रीगुरूपदिं विश्रांती ॥ जय० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( ११९ ) आरती– अत्रीची

जयदेव जयदेव अत्री ऋषिवर्या
ओवाळुं आरती महापुरूषाचार्या ॥ ध्रु० ॥
जय जय नाथ सनातन अक्षर ॐकारा
अनुहत अहं सोहं ध्वनि अहंकारा
त्रिगुणातीता आणिसी त्रैगुणाकारा
अनंत गुणगणकांसी न येसि गुणाकारा ॥ १ ॥
श्रीमुनि ब्रह्मपरायण, दिव्यतपोरासी
पढविसि सद्विद्या विधि-हरि-हर-पोरांसी
त्रैमूर्तींच्या दारा येउनि दारासी
प्रार्थिति पतिप्राप्तिस्तव स्वामि उदारासी ॥ २ ॥
झाला चंद्र विधाता शोभत आकाशीं
आक्रमि शिव दुर्वास सप्तहि लोकांसी
श्रीपति दत्तरूपें गृहिं तोषवि जनकासी
यास्तव म्हणती माहुर जवागळें काशी ॥ ३ ॥
श्रीसिंहाद्रीपर्वतिं दत्तात्रय अत्री
सह अनसूया पूजिति द्विज वेदमंत्रीं
वर्षति घन पुष्पांजलि, वाजति वाजंत्रीं
विष्णुदास महोत्सव अवलोकित नेत्रीं ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२० ) आरती– अनसूयेची, पहिली

जयदेवी, जयदेवी, जय देववंदे । श्रीवेदवंदे
श्रीअनसूये, माये, जय मंगळ वरदे ॥ ध्रु० ॥

जयजय श्रीचतुराननदेवात्मज कांते
जयजय कर्दम दुहिते, दत्तात्रय माते
येती तडि तापडि यति भवदाश्रमातें
पावति मुनिजन-खगमृगगण-विश्रामातें ॥ जय० ॥ १ ॥
नाना गुल्मलताद्रुम-अमृतरसवल्ल्या
आनंदघन पद्वैभव श्रीहरि कैवल्या
सुपुत्रवंत्या भार्गवि, देवकि, कौसल्या
वानिति अनसूये तव बहुविध कौशल्या ॥ जय० ॥ २ ॥
देउनि भोजन सकळां सकळांच्या पाठीं
करसी भोजन स्वसुतासह एक्या ताटीं
अनंत ब्रह्मांडांचे घट ज्याचे पोटीं
तो प्रभु ढेंकर देउनि अन्नांगुल चाटी ॥ जय० ॥ ३ ॥
श्रीलक्ष्मी-पार्वति-सावित्रीसहभर्त्या
अखंड ऋद्धीसिद्धी नांदति गिरिवरि त्या
चौसष्ट-अठरा करती त्वद्गुणआवर्त्या
विष्णूदासाच्याही ऐकिसि पदार्त्या ॥ जय० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२१ ) आरती– अनसूयेची, दुसरी

( चाल : आरति भुवनसुंदराची. )

जय शिखरेश्वरि भगवंते । भवानी अनसूये, माते ॥ ध्रु० ॥
कुंकुम-कंकण-सौभाग्ये । अखंडित मंडितविमलांगे
शुभासनिं शोभसि अनुरागें । जडितमणि मखर पद्मरागें
पद्मजात्मज मानसरंगे । गुरू दत्तात्रय माय गंगे
( चाल ) महासति देवहुति- तनुजा
कपिल–महामुनिची तूं अनुजा

भवाश्रमिं सिद्धि–तिष्ठती रिद्धि–विपुल समृद्धी
षड्गुणालंकृत श्रीमंते । कृपा करि अनसूये, माते ॥ १ ॥

चित्कलानंदे, अर्धमात्रे । जय जगजननी जगधात्रे
सगुण रूप सुंदर सुपवित्रे । सदा सुप्रसन्न पद्मनेत्रे
ताम्रध्वज तोरण नक्षत्रें । डोलती शिरिं चामर-छत्रें
 ( चाल ) सदानंदोत्सव दिनरातीं
 वाजती चौघडे वाजंत्रीं
वेदविद् भाट–करति बोभाट–दाविती वाट
या षट्पद पदपद्मातें । कृपा करि अनसूये, माते ॥ २ ॥

वसति श्रीसिंहाद्रिप्रकुटीं । सरिता सर तीर्थें कोटी
देवऋषि-हरिहर-परमेष्ठी । अप्सरा अमर तुझ्यासाठीं
गाति गंधर्व कीर्ति मोठी । अशि नसे म्हणती वैकुंठीं
 ( चाल ) सिद्ध चिंतामणि कामाक्षी
 देव देवेश्वर सर्वसाक्षी
महाकालिका–कोरिभूमिका–प्रकट रेणुका
प्रणिता पुण्य संगमातें । कृपा करि अनसूये, माते ॥ ३ ॥

भवाटविं जिव झाला कष्टी । विलोकुनि पहा अमृतदृष्टीं
यथा ऋतुकाळीं जळवृष्टी । करोनी करि सुफलित सृष्टी
चालवी धर्म-यज्ञ-इष्टी । देइ आरोग्य तुष्टिपुष्टी
 ( चाल ) विष्णुस्वामीची प्रार्थना ही
 दयाळे ! अन्य स्वार्थ नाहीं
भेट मज देइ–पाव लवलाही–दिनाचे आई
कृपामृत पाजि कृपावंते । कृपा करि अनसूये, माते ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२२ ) आरती– जमदग्नीची

जयदेव, जयदेव, जय दाक्षिणकेदारा
श्रीजमदग्नी महामुनि, जय परमोदारा ॥ धृ० ॥

दर्भ, कमंडलु, कुंडलमंडित रवलेशा
श्रीरत्नाचलनिलया अमृतवल्लेशा
ज्योतिर्लिंगा, भंगा, संगा, अक्लेशा
शरणागततापत्रय नुरविसि लवलेशा ॥ १ ॥

यज्ञोपवीत धारण रुद्राक्षमाळा
सन्निध ऋद्धी, सिद्धी, क्रतुराजबाळा
चंदनबिल्वसमीधाघृत होमशाळा
सुवर्णमंडपतोरण नवरंगमाळा ॥ २ ॥

जमदग्नि रेणुकासुपुत्रोत्यर्थ
वसती सिंहाद्रिवरी भक्ताप्रीत्यर्थ
देती भुक्ती, मुक्ती, चारिहि पुरुषार्थ
प्रसन्न जाहल्या करतिल काय न समर्थ ॥ ३ ॥

तूं महा-तेजोमय रवि, क्रोधानळहंता
अक्रोधचि झालासि अमृतकरमहंता
न कळे तव महिमा मुळमायेच्या कान्ता
दर्शनमात्रें वारिसि भवभय-आकांता ॥ ३ ॥

बंधू राम, पिता तूं, माता एकविरा
या त्रिपुटीनें हरल्या सहस्रानेकविरा
केला पामर आमर अंध, मुका, बहिरा
विष्णूदासा दिधला परमामृत विहिरा ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२३ ) आरती- रेणुकेची, आठवी

( चाल : आरती भुवन. )

ही आदिमाया जगदंबा । रेणुका, कुलस्वामिणी, अंबा ।। ध्रु० ।।
जागृत करुनि निरंकारा । निर्गुण आणिलें आकारा ।।
त्रिविध गुण लावुनि संसारा । रचिला जगडंबर सारा ।।
भू, जल, तेज, गगन, वारा । बहु तत्त्वांचा परिवारा ।।
( चाल )- उत्पत्ति स्थिति संहारा । लाविले इनें विधिहरिहरा ।।
करुनि परिमाण, केलें निर्माण, जगाचे प्राण
सकळहि सृष्टि मुळारंभा ।। रेणुका० ।। १ ।।

दुर्लभ जय देवासि दिला । दुर्जय महिषासुर वधिला ।
रक्तें क्षितिपट रंगविला । सहस्राजुंन घट भंगियला ।।
कटकट लावुनि लंकेला । कुळासह राक्षसक्षय केला ।।
( चाल )- द्रुपदपुरि जाहलि याज्ञसेनी । करुनी विरविरहित अवनी ।
उतरला भार, शौर्य आपार, लागेना पार
सुरवर मानिती आचंबा ।। रे० ।। २ ।।

रेणु राजाची दुहिता । अति सुंदर रूप कनकलता ।।
श्रीजमदाग्निची वनिता । त्रिभुवन-जन-पावन सरिता ।।
भार्गवरामाचि माता । जिचे गुण वदुं न शके धाता ।।
( चाल )- सगुणरुप सौख्याची खाणी । सकळ मुळ दुःखांची खाणी
प्रकटली धरणी, भवार्णव-तरणी, कलिमल-हरणी ।
दुर्घट संकट विटंबा ।। रेणुका० ।। ३ ।।

उत्तम मुळपिठ रम्यस्थळ । वसती देवऋषि सकळ ।।
वाहे अमृततुल्य जळ । प्राशितां होती श्रम सफळ ।।
बैसली सिंहासनिं अढळ । सदा सुप्रसन्न मुखकमळ ।।
( चाल )- जोडुनि विष्णुदास पाणी, प्रार्थुनी म्हणे दीनवाणी,

दाखवी पाय, पाहसी काय, कोटि अन्याय
क्षमा करि, न करी विलंबा ॥ रेणुका० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२४ ) आरती– रेणुकेची, सातवी

विपुल दयाघन गर्जे तव हृदयांबरिं श्रीरेणुके हो ।
पळभर नर-मोराची करुणावाणी ही आयके हो ॥ ध्रु० ॥
श्रमलिस खेळुनि नाचुनि गोंधळ घालुनि ब्रह्मांगणीं हो ।
निजलिस काशि दिनांची चिंता सोडुनि अंतःकरणीं हो ।
उठ लवकर जगदंबे, त्रैलोक्याची तूं स्वामिणी हो ।
विधि-हरि-हर अज्ञानी, पूर्णज्ञानी तूं शाहणी हो ।
समर्थ परमेश्वरि तूं, अनंत ब्रह्मांडनायके हो ॥ १ ॥
शरणागत मी आलों, परि बहु चुकलों बोलावया हो ।
तुज जननीचें नातें लाज न वाटे लावावया हो ।
परि तूं जनानि दिनांची, अनाथांची बहु तुज दया हो ।
ही श्रुति सत्याऽसत्य कीं, अनुभव आलों मी पहावया हो ।
कळेल तैसें करि, परि निज ब्रीद रक्षी मां पालके हो ॥ २ ॥
भवगर्दे पिडलों भारी, मजला दुःख हें सोसे ना हो ।
अझुनी अंबे, तुजला माझी करुणा कां येइ ना हो ।
तारी अथवा मारी, धरिलें चरण मी सोडि ना हो ।
कृपा केल्यावांचुनी परतुनि विन्मुख मी जाइ ना हो ।
तुजविण जगिं कोणाचे वद पद प्रार्थावे अंबिके हो ॥ ३ ॥
ऐकुनि करुणावाणी हृदयीं सप्रेमें द्रवली हो ।
प्रसन्नमुख जगदंबा, अंबा, प्रसन्न जाहली हो ।
अजरामर वर द्याया, प्रकटुनि पुढें उभी राहिली हो ।
भक्तांकित अभिमानी विष्णूदासाची माउली हो ।
जी निज इच्छामात्रें सूत्र हालवी कौतुकें हो ॥ ४ ॥

## ( १२५ ) आरती– रेणुकेची, पहिली

जय जय जगदंबे । श्रीअंबे । रेणुके, कल्पकदंबे ॥ ध्रु० ॥
अनुपम स्वरुपाची । तुझि धाटी । अन्य नसे या सृष्टीं
तुजसम रुप दुसरें । परमेष्ठी । करितां झाला कष्टी
शशिरस रसरसला । वदनपुटीं । दिव्यसुलोचन दृष्टीं
सुवर्ण रत्नाच्या । शिरिं मुकुटीं । लोपति रविशशि कोटी
गजमुखि तुज स्तविलें । हेरंबें । मंगल सकळारंभे ॥ १ ॥
कुंकुम-चिरि शोभे । मळवटीं । कस्तुरीटिळक ललाटीं
नासिक अति सरळ । हनुवटी । रुचिरामृत रस ओठीं
समान जणुं लवल्या । धनुकोटी । आकर्ण लोचनभ्रुकुटी
शिरिं निट भांगवळी । उफराटी । कर्णाटकची धाटी
भुजंग निळ रंगा-। परि शोभे । वेणि पाठिवर लोंबे ॥ २ ॥
कंकणें कनकाचीं । मनगटीं । दिव्य मुद्या दश बोटीं
बाजूबंद नगे । बाहुवटीं । चर्चुनि केशर उटी
सुगंध पुष्पांचे । हार कंठीं । बहु मोत्यांची दाटी
आंगीं नवि चोळी । जरिकांठीं । पीत पितांबर तगटी
पैंजण पदकमळीं । अति शोभे । भ्रमर धांवती लोभें ॥ ३ ॥
साक्षप तूं क्षितिच्या । तळवटीं । तूंच स्वयें जगजेठीं
ओवाळित आरती । दीपताटीं । घेउनि करसंपुष्टीं
करुणामृत हृदयें । संकटीं । धावासि भक्तांसाठीं
विष्णुदास सदा । बहु कष्टी । देसिल जरि निज भेटी
तरि मग काय उणें । या लाभें । धाव पाव अविलंबें ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२६ ) आरती– रेणुकेची, दुसरी

**जय जय श्रीरेणुके, अंबे, मुळपीठनायके, हो**
**ओवाळूं आरती अखंडसौभाग्यदायके, हो ॥ ध्रु० ॥**

प्रसन्न वदन सदा, द्विजराज विराजित राजिवनेत्रे, हो
बहु गंभिर गुणपात्रे, त्रिभुवनपावन परम पवित्रे, हो
रत्नजडित सिंहासन, दंड, मोरचल, चामर, छत्रें, हो
कटक-मुकुट-कुंडलें मौक्तिक-माणिक-मणि-नक्षत्रें हो
सकल भूषणालंकृत सुंदर गुणराजसबालके, हो ॥ जय० ॥ १ ॥
आनंदघन मंडपीं बैसालिस स्वानंदें आनंदें हो
तुजपुढें गीत-प्रबंधें करि तांडव शिव ब्रह्मानंदें हो
शुभ मंगळ नवरात्रीं वाजती पर्वतिं सुस्वर वाद्यें हो
मांडिति नव पल्लव घट सनक-सनंदन सन्मुनि-वृंदें हो
घालिति गोंधळ गोंधळी सहस्र वदनादिक बोलके हो ॥ जय० ॥ २ ॥
भरजरि- शाल-पितांबर, काजळ, कुंकुम, कंकण, चुडे, हो
चंदन, पुष्पें, तांबुल, नारळ, लिंबें, साखरपुडे, हो
सुरवरगण संभारें ऋद्धि सिद्धि राबती पुढें हो
प्रचंड बाळि होमानाळिं पडती चंडमुंड बापुडे हो
तुझिया प्रौढ प्रतापें हरिहर डोलविती मस्तकें हो ॥ जय० ॥ ३ ॥
होम-हवन-विधि रात्रीं नवमिस पूर्णाहुति पारणें हो
विजयादशमिस झालिस अंबे, विजयी शमी-धारणें हो
कष्ट युगायुगिं सोसुनि केवळ भक्तांच्या कारणें हो
आदिमाये, तुज पडती नानाविधरूप आकारणें हो
विष्णुदास म्हणे, जय जय जय अनाथदिनपालके, हो ॥ जय० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १२७ ) आरती– रेणुकेची, तिसरी

जय जय रेणुके, सदा सदय तूं प्रसन्न रूपमूर्ती
मृगराजाचल पावक अघ नग दाहक महिवर्ती
सिद्ध साधुसम पतित पापि नर नमनें उद्धरती ॥ ध्रु० ॥

दिनरक्षक, जगसाक्ष, यशध्वज चुंबित गगनाला
अति उत्कंठित देवमुनी जन येती नमनाला
तारिसी त्यांसी वाटे हें मम कौतुक न मनाला
उद्दंड तरती मजसम नर जे दुरितें आचरती ॥ जय० ॥ १ ॥
विषयप्रपंचीं गुंतुनि नर जे जगिं वायां गेले
ते अनुकंपामृत-घन वर्षुनि त्वां पावन केले
चंड-मुंड तव शत्रु परंतू मोक्षपदीं बसले
सांप्रत मजप्रति ताराया कां धरिली मनिं आढि ती ॥ जय० ॥ २ ॥
सन्मुख घट स्थापित, लोंबती सुमनांच्या माळा
कंठीं मुक्तहार, कटीं शोभतो पीतांबर पिवळा
वांच्छिति विधि-हरिहर त्वत्पदरज लागो भाळा
तव गुणमाहिमा भक्त विरामा निशिदिनीं मुखिं गाती ॥ जय० ॥ ३ ॥
नवदिनिं नवरात्रीं पर्वतीं वाद्यध्वनि गर्जे
अंब, अंब, जगदंब, उदय, रव दिग्मंडळिं गाजे
जगज्जननि हे दीन दयाळे, नांव तुला साजे
विष्णुदास म्हणे, करि करुणालये, करुणा मजवरती ॥ जय० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १२८ ) आरती– रेणुकेची, चवथी

( चाल : आरती भुवनसुंदराची )

अंबे, चित्सुखकल्पलते । जय जय करुणामृत-सरिते ॥ ध्रु० ॥
अविद्या तम होतां हरण । जाहला ज्ञानोदय पूर्ण
अरुणोदयीं रक्त वर्ण । मुखावर पडतें रविकिरण
अंबे, तुझे नमुनि चरण । भास्कर करितो पुढें भ्रमण
( चाल ) सिंहाद्रिवासि सिद्ध पुरुष
म्हणाति आम्हांस–घडो हा वास–नको कैलास
प्रणिता प्रदक्षणि वहाते । दुजें वैकुंठ महीवरतें ॥ १ ॥

लोपति चंद्र-सूर्य कोटी । तुझ्या सुवर्ण रत्नमुकुटीं
सभोंवतीं मोत्यांची दाटी । लाजती शुक्र-गुरू पोटीं
अनुपम सुंदर हनुवटी । कुंकुम कस्तुरी मळवटी
( चाल ) आंगीं उटी केशराची
कमळदळनयन–सदा शुभ वदन–सुपंक्तीरदन
अवलोकिती भक्त नर तें । दुर्लभ दर्शन सुरपतितें ॥ २ ॥
शोभाति अळंकार गळां । त्यांवर पुष्पांच्या माळा
शतपट चपळेहुनि अगळा । कांसे पीतांबर पिवळा
जो नर पाहिल पदकमळां । तो नर साधु जगीं विरळा
( चाल ) हरिहर-ब्रह्मदेव हृदयीं
धरिति तवध्यान–त्यजुनि अभिमान–उडालें भान
न कळे अंत नारदातें । भ्रांती पडे सरस्वतितें ॥ ३ ॥
सुवर्णपात्रिं लक्ष वाती । लाविल्या उजळुनिया ज्योती
प्रार्थुनि रेणुकेचि मूर्ती । भावें ओवाळिन आरती
कृपेनें भवनिधि जग तरती । विघ्नें दुर्धर दुर सरती
( चाल ) विष्णुदास, शरण विनवी
जाहालों कष्टि-कृपेची वृष्टि-करूनिया दृष्टि
धांवे पावे विश्वकर्ते । जय जय रेणुके, सुख भरते ॥ ४ ॥
ॐ! ॐ!! ॐ!!!

## ( १२९ ) आरती– रेणुकेची, पांचवी

जय जय ब्रह्मविलासी, श्रीमृगराजाचलरहिवासी, हो
दर्शनमात्रें देसी अंबे, शिवपण सहज जिवासी हो ॥ ध्रु० ॥
तूं आदिमाय, भवानी, श्रीमुळपीठाची जगदंबा, हो
आइ भार्गवरामाची, मुनि जमदग्नीची वल्लभा हो
भगिनी श्रीकृष्णाची, तूं यशोदेच्या आलिस गर्भा हो

दुर्धर खळ मर्दिले सह महिषासुर, शुंभ, निशुंभा, हो
होउनिया भिल्लिणी त्वां भुलविलें महादेवासी हो ॥ जय जय० ॥ १॥
कामधेनु चिंतामणि आंगणिं कल्पवृक्ष डोलती हो
पुष्पलता घन शोभति, चंपक, बिल्व, कुंद, मालती, हो
हंस, केकी, शुक, कोकील पक्षी 'अंब, अंब' बोलती हो
पंचवदन एकानन तुझिया आज्ञेनें चालती हो
दोघे तळिवर बसले, दोघे भ्रमती नित्य प्रवासी हो ॥ जय जय० ॥२॥
कटिं कर ठेवुनि उभी राहुनि श्रमलिस भीमातटीं हो
विश्रांतिस्तव येथें येउनि बसलिस या मुळपीठीं हो
दशशतमुखमंचकिं तूं निजलिस क्षिरसागरपोटीं हो
कोठें भक्षिसि बोरें, पोहे, तक्र, भाजि, कणि, रोटी, हो
तूं गुरु, जननी, जनकाचि, दुर्गम अगम-निगम प्रणवासी हो ॥जय० ॥३॥
जो करि आवडा-निवडी त्यावरि दृष्टि सदा वांकडी हो
नेसुनि पिवळी साडी, घालुनि केकत मुद राखडी हो
येउनिया तांतडी दाखवी पदपंकज पलघडीं हो
पुरवावी आवडी विष्णुस्वामीची येवढी हो
अवगुण कांहीं न पहातां पावुनि अपुल्या ये नांवासी हो ॥जयजय०॥४॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३० ) आरती– रेणुकेची, सहावी

( चाल : इस तनधनकी. )

जय जय रेणूके आइ, जगदंबे । ओवाळुं आरति मंगळारंभे ॥ ध्रु० ॥

शुभ मंगलोत्सव मंगळवारीं
मंगळ वाजत्रिं वाजति द्वारीं
मंगळकृतजागर समारंभें ॥ १ ॥
मंगल मंडपिं तूं राजबाळा

शोभति मौक्तिक नक्षत्रमाळा
भरजरि झालर नारळ आंबे ॥ २ ॥
भडक पितांबर, कंचुकि पिवळी
नवरत्नें माणिक-मणि-मोतीं-पवळीं
तळपति रविशशिचीं प्रतिबिंबें ॥ ३ ॥
कुंकुम कंकणालंकृत वायन
चंदनचर्चन, अर्चन, गायन
उतरति नरनारि तुज लोणलिंबें ॥ ४ ॥
आदिमूळ माये, तूं विश्वाची राणी
लावण्यरूप सौभाग्यशिराणी
पहातां तुज देहभान विसंबे ॥ ५ ॥
जाहलि दुर्लभ भेट आनंदें
पाहिलिं विमल हीं चरणारविंदें
मन विष्णुदासाचें विरो अविलंबें ॥ ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३१ ) आरती– महालक्ष्मीची

( चाल : आरति भुवन. )

जय जय नदिपति प्रिय तनये । भवानी, महालक्ष्मि, माये ॥ ध्रु० ॥
आदि क्षिरसागरराहिवासी । जय जय कोल्हापुरवासी
अंबे भुवनत्रायिं भ्रमसी । सदा निजवैकुंठीं वससी
दुर्लभ दर्शन अमरांसी । पावसि काशि मग इतरांसी
( चाल ) करुणालये मोक्षदानी
भक्त जे परम– जाणती वर्म– सदा पदिं नरम
कृपेनें त्यांसी सदुपायें । संकटीं रक्षिसि लवलाहे ॥ १ ॥
अमरेश्वर विधिहरिहर । मिळाले असुरांचे भार

मंदाचल नग रवि थोर । केला वासुकिचा दोर
ढवळिला सागर गर-गर । रगडिले जलचर मीन मगर
(चाल) लाजती कोटि काम पोटीं
तुझें सौंदर्य- गळालें धैर्य- म्हणती सुर आर्य
जाळितो रतिपति सोसुं नये । होतां जन्म तुझा सुनये ॥ २ ॥
त्रिभुवनस्वरूपें तूं आगळी । वरिलासी त्वां वनमाळी
तुजसम न मिळे वेल्हाळी । शंकर मकरध्वज जाळी
न मिळे स्पर्शेंहि पदकमळीं । पदरज लागो तरि भाळीं
(चाल) पितांबर शोभतसे पिवळा
बहारजरतार- हरिभरतार- तरि मज तार
स्तवितां तुज जरि गुणग्रहे । दशशतवदनांही भ्रम ये ॥ ३ ॥
सनकादिक ब्रह्मज्ञानी । ध्याती चरण तुझे ध्यानीं
दृढासन घालुनि निर्वाणीं । बैसले महामुनि तपिं-ध्यानीं
तरी मी मंदबुद्धि जननी । तुझे गुण वर्णुं कसे वदनीं
(चाल) जरी हा विष्णुदास तूझा
बहु अपात्र- करी सुपात्र- कृपा तिळमात्र
करोनी मोक्षपदीं वाहे । अंबे लवकर वर दे ये ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## (१३२) आरती- शारदेची (सरस्वतीची)

जयदेवी जयदेवी जय मंगल-निलये
ओवाळुं आरती कमलोद्भव तनये ॥ ध्रु० ॥
अनुपम सुंदर गुणगंभिर कोमलगात्रे
मयुरारूढ विराजासि पंकजदलनेत्रे

---

१ श्रीक्षेत्र बासर येथें श्रीसरस्वतीचा साक्षात्कार व कृपाप्रसाद होताच ही आरती केली.

श्रीगंगातट बासरक्षेत्रीं सुपवित्रें
वससी उद्धरसी जड-मुढ दर्शनमात्रें ॥ जग० ॥ १ ॥
वीणा पुस्तक शुभ्रांबर कंचुकि साजे
धुप, दिप, नैवेद्या क्षीर, साखर-घृत, सांजे
चौघडे घन वाजंत्रीं मृदंग दर वाजे
श्रवणें मोक्षपुरीचे उघडति दरवाजे ॥ जय० ॥ २ ॥
तळपति कुंडल-युगलें मकराकृति कर्णीं
भरला अखंड करूणार्णव अंतःकरणीं
लोपति मुकुट प्रभेतळिं उदंड शशितरणी
अवतरलिस तूं माये, भवसागर-तरणी ॥ जय०॥ ३ ॥
पुढें महासत्पुरुषासह मूर्ती व्यासाची
पहातां प्रपंचीं वितळे मति हव्यासाची
तूं दिनवत्सल, तूं जगज्जननि, सदा साची
तूं माउलि, प्रतिपाळक विष्णुदासाची ॥ जय० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३३ ) आरती– तुळशीची

श्रीतुळसी, जय तुळसी, वृंदावनवासी
तूं प्रियराधा दामोदर-माधवासी ॥ ध्रु० ॥
करुणावंते, माते, प्रगटसि तूं जेथें
वसती अक्षयिं लक्ष्मी-नारायण तेथें
सप्तहि सागर, संगम, गंगादिक तीर्थें
सकळ दैवतें पावाति तुझिया सामर्थ्यें ॥ १ ॥
कार्तिकमासीं शुद्ध द्वादशि आनंदें
लाविति लग्न तुझें सुर-नर-नारी वृंदे
म्हणाति मंगळाष्टकें द्विज मंगळ शब्दें
मंगळ मंडपिं वाजति शुभ-मंगळ-वाद्यें ॥ २ ॥

वाहाति अक्षता, कुंकुम, पुष्पांच्या माळा
तिष्ठति अष्टहि सिद्धि जोडुनि कर सोळा
ओवाळिति पंचार्ती उजळुन दिपमाळा
होतसे श्रीकृष्णासी लग्नाचा सोहळा ॥ ३ ॥
वैकुंठींहुनि आलिस जागिं जगदोद्धारा
खंडिसि संकटें जैसी सुदर्शन-धारा
रक्षिसि दिन जन पाजुनि प्रेमामृतधारा
विष्णुस्वामि म्हणे, दिन जननीचा धारा ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३४ ) आरती– सूर्याची

जयदेव जयदेव जय सहस्त्राकिरणा
वंदिति सुर, नर, कामिनि, यामिनि, तम-हरणा ॥ध्रु०॥
आदि नमोस्तु ते श्रीमद्दिनकर मणिराजा
एकचक्ररार्थं शोभसि सहस्त्र आरा ज्या
हिरण्यगर्भादित्या महा तेजःपुंजा
परम कृपाघन पावन त्रिभुवनसंपूज्या ॥ १ ॥
आरक्त चंदन सुमनालंकृत मार्तंडा
करूं धुप, दिप, नैवेद्यार्पण तिळ, गुळ, मांडा
दधि, मधु, नवनित घृत, क्षिर, साखर, श्रीखंडा
तांबुल, श्रीफळ, द्राक्षांजिर, इक्षुदंडा ॥ २ ॥
आरूढसि रथसप्तामिसि नूतन रथावरती
नित्यास्तोदय पावसि पृथ्विपरावर्ती
सामरदानव, मानव, मुनिजन, मोक्षार्थी
स्मरती, स्तविती, पुजिती, करिती, पंचार्ती ॥ ३ ॥
वर्तति तुझियाऽधारें हरिहर परमेष्ठी
अर्पिसि तुष्टी पुष्टी संतर्पिसि सृष्टी

पावती सुरक्षित दीक्षित क्रतुफळ परमेष्ठी
विष्णुस्वामीवरि करि करुणामृतवृष्टी ॥ ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १३५ ) आरती–वामनाची

जयदेव जयदेव जय वामनमूर्ती
भवभंजन मनरंजन निरंजन आरती ॥ ध्रु० ॥
अनंत ब्रह्मांडांच्या भेदुनिया शकला
अनंत लावण्याची चैतन्यांशकला
सद्रूपाकृति कधिं विधिहि न करूं शकला
जणुं यास्तव बळि तत्पदकमळीं आशकला ॥ १ ॥
दंड कमंडलु कौपिन बटु कुंडल कर्णीं
बुटुबुटु बोलत, लुटुलुटु चालत बटु चरणीं
बटुपदभारें थरकत धरणीधर-धरणी
बटु-मुख-चंद्रप्रभातळिं लोपति शशितरणी ॥ २ ॥
उठले ऋत्विज ब्राह्मण, मात्रागण उठले
उठले यज्ञाग्नित्रय, ॐ फट् स्वाहा खुटलें
उठले बळिसह नृपवर, क्रतुकंकण सुटलें
उठले विघ्नांतक द्रुत भवभयभ्रम खटले ॥ ३ ॥
त्रिपाद भूमि बळीप्रति बटु-वामन मागे
शुक्र म्हणे हो राजा सावध, सर मागें
होइल काळ अतां जो बाळरूपें रागे
परि बळि संकल्पाचि जळ ओपित अनुरागें ॥ ४ ॥
प्रथमपदींच प्रभु तो आटवी भूमी
द्वितियपदातें अदितीसुत ठेवी व्योमीं
तृतियपदें बळि घालीत पाताळग्रामीं
चतुर्थ पद हृदयीं धरि पुरुषोत्तमस्वामी ॥ ५ ॥

## ( १३६ ) आरती- चंद्राची

जयदेव जयदेव जय रजनीनाथा
तूंचि कृपाघन चंद्रा, अमृतरसदाता ॥ ध्रु० ॥
गुंफुनि मंदाचल-रवि-कटिं वासुकि व्याला
मंथन करितां सागरीं त तुजप्रति व्याला
अखंड मस्तकिं धरितो जो क्रुर विष प्याला
तूं जिवरक्षक, साक्षक, दिव्यामृत प्याला ॥ १ ॥
तुझिया दर्शनमात्रें पावति नर अमर
धांवति उदय विलोकुनि सुरमुनिजन भ्रमर
दैत्य न करती धाकें देवांशीं समर
पुजितां तुज संतोषे श्रीगौरीकुमर ॥ २ ॥
द्वादश मासारंभीं शुद्ध द्वितियेसी
जीर्णांबर-दसि व्याया उदयाप्रति येसी
नव पीतांबर अमृत अर्पिसि स्त्री-पुरुषीं
पावति निजसुखशांती सुरवर देवऋषी ॥ ३ ॥
संकट-वद्य-चतुर्थीसि तुज संकटहरणा
ओवाळिति नर-नारी शुभशीतलकिरणा
विधि-हरि-हर-सावित्री-लक्ष्मी-अपर्णा
विष्णुदास निरंतर लागतसे चरणा ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३७ ) आरती- श्रीबालासाहेबाची

जय जय श्रीप्रभूबालासाहेब, सच्चिद्‌गुणगहना हो
ओवाळुं आरती तुजप्रति लक्ष्मीमनमोहना हो ॥ ध्रु० ॥
जय जय श्रीघननीळा, दीनदयाळा, परम पवित्रा हो
अनंतरूप विचित्रांचि दाविसि नानाविध चरित्रा हो

सुंदर पंकजवदना, कोमलगात्रा, पंकजनेत्रा हो
सोडुनि क्षीरसागर तूं नांदसि वाशिम पुण्य क्षेत्रा हो
उभा राहसी तिष्ठसि भक्तांसाठीं भुजंगशयना हो ॥ १ ॥
लोपति रविशशि कोटी तुझिया रत्नखचित मुगुटीं हो
सुरगण धरिसी पोटीं, असुरावर करिसी भ्रुकुटी हो
केशर गंध सुचंदन, तुळसी-पुष्पांचे हार कंठीं हो
उत्तरपट जरिकांठी पित पीतांबर कसला कटीं हो
संकटिं स्मरतां धांवासि, पावसि सत्वर मनमोहना हो ॥२॥
वाशिम क्षेत्र भुलोकीं वाटे वैकुंठचि दुसरें हो
अखंड जेथें रात्रंदिन करुणामृत घन ओसरे हो
येथें स्वस्थपणें क्षीरप्रसाद भक्षिसिया ओसरे हो
गोकुळिं विराम न कळतां गाइ आणि निज वासरें हो
दुग्धासाठीं रूससि, स्वकरें करिसी गोदोहना हो ॥ ३ ॥
वाजंत्रीं वाजती, त्रिकाळ चौघडे पुढें धडकती हो
कनकांबरें तोरणें मंडपद्वारीं ध्वज फडकती हो
देवालयिं अमरांचे मुगुट मुगुटासी धडकती हो
दिपवाळी लखलखती गगनीं चंद्रज्योति भडकती हो
सन्मुख ध्याती, गाती, नारद, गंधर्व, गायना हो ॥ ४ ॥
ऋद्धी सिद्धी चिंतामणी कल्पलताद्रुम मंदिरीं हो
तेथें काय उणें मग जेथें स्वयं लक्ष्मी सुंदरी हो
देवादिकां पळसी नच मी काळयवन थरथरी हो
दे दर्शन कां लपसी मी नव्हे मुचकुंदाची दरी हो
विष्णुदास म्हणे किती विनवुं भेटीविण राहवेना हो ॥४॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

१ वऱ्हाडांतील प्रसिद्ध वाशिम क्षेत्र.

## ( १३८ ) आरती–व्यंकटेशाची

( चाल : आरती भुवनसुंदराची )

जय जय श्रीव्यंकटरमणा । आरती प्रभु विश्वंभरणा ।। ध्रु० ।।
जय जय श्रीलक्ष्मीकांता । जय जय श्रीहरिभगवंता
जय जय श्रीपति श्रीमंता । जय जय श्रीनिधि अनंता
जय जय निर्गुण गुणवंता । जय जय परम कृपावंता
चाल– जय जय विभू व्यंकटेशा
जय जय सद्गुरु सर्वेशा
भुवनसुंदरा—सुखद मंदिरा—निकट इंदिरा
हृदयधृतकौस्तुभभृगुचरणा । आरती प्रभु विश्वंभरणा ।। १ ।।
प्रकट शेषाद्रि गिरीवरती । विराजे चतुर्भूज मूर्ती
वंदिती सुर, नर, चक्रवर्ती । कराति गिरिप्रदक्षिणा वरती
दक्षणा कनकपात्रें भरती । करूणानिधीस ये भरती
चाल– अराधन, भोजन, संभार
शर्करा·दधि·क्षिर·घृतधार
सिद्ध परमान्न—पंचपक्वान—जेवि भगवान
स्वहस्तें वाढि अन्नपूर्णा । आरती प्रभु विश्वंभरणा ।। २ ।।
सच्चिदानंदाचा गाभा । निरंतर पद्मनाभ उभा
अनुपम घनमंडपशोभा । सांडिती अमर स्वर्गलोभा
गाति गंधर्व राग रंभा । डोलती आम्रपर्ण रंभा
चाल– बोलती महाऋषी बोला जी
नाथगिरिसाहेब बालाजी
नीरसची भुक्ति—विरसची मुक्ति भक्ति—सुरसची
म्हणाति शिवशंकर अपर्णा । आरती प्रभु विश्वंभरणा ।। ३ ।।
तूंचि जिब शिव निगमाधारा । तूंचि जय जय जगदोद्धारा

अखिल स्थुळ सूक्ष्म अवतारा । भुमंडळ सूर्य-चंद्र-तारा
कृपाघन पावन दातारा । पतित हा शरणागत तारा
चाल— पूर्वाश्रम विष्णुदास हा मी
कराया पुरुषोत्तम स्वामी
केशवा धाव—माधवा धाव—चरणीं दे ठाव
निवारून जन्ममरणभ्रमणा । आरती प्रभु विश्वंभरणा ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १३९ ) आरती–विठ्ठलाची

( चाल : आरती भुवनसुंदराची )

जय जगज्जननि, विठाबाई । उठ हो जागृत लवलाही ॥ध्रु०॥
क्षिराब्धीवासि गरूडवाहन । नावडे शेषावर शयन
दवडिला पुत्र वेदवदन । विशेषहि लक्ष्मीवर न मन
आगळें वैकुंठाहून । आवडे पंढरपुर भुवन
( चाल) निर्मळ वाहे चंद्रभागा
पावति कोटि पापें भंगा
दंडकारण्य- धन्य लावण्य- पुण्याहि अगण्य
कटिं कर विटेवरता राही । उभा प्रत्यक्ष शेषशायी ॥ १ ॥
सुयोधन लाक्षागृहीं कोंडी । पांडव दहनांतुनि काढी
वसन बळें दुःशासन ओढी । नेसवी द्रौपदिला लुगडीं
बंधनें पतितांची तोडी । पुरवी भक्तांच्या आवडी
( चाल ) मृत स्त्री संकट जयदेवा
मेहता नरसिंह करि धावा
धावणें आज- राखणें लाज- उचित हें काज
गौरवी त्याचा जावाई । उग्र विष प्याालि मिराबाई ॥ २ ॥
पितांबर शोभतसे पिवळा । गळ्यामधें तुळसीच्या माळा

हर हर सदाशिव भोळा । सदा शिरिं धरिसी घननीळा
मिळाला भक्तांचा मेळा । ललाटें घासिति पदकमळा
( चाल ) नीरांजन-धूप-दीप-आरती
सुमंत्रें पुष्पांजुळि वाहती
सदा आनंद– राधेगोविंद– लागला छंद
विठ्ठल, विठ्ठल, रुखमाई । भजनें होति ठाइं-ठाईं ॥ ३ ॥
तुजविण एकला मी कष्टी । कृपेची सकळांवर वृष्टी
एकदां मजकडे जगजेठी । क्षणभर करिसिल जरि दृष्टी
तरि मग स्वमुखें परमेष्ठी । मजला धन्य म्हणेल सृष्टी
( चाल ) ऐकुनी करुणेची वाणी
कृपेनें द्रवे चक्रपाणी
प्रभु, वनमाळि– ब्रीद सांभाळि– दिनाप्रति पाळि
प्रकटे भक्ताच्या हृदयीं । विष्णुदास लागे पायीं ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# भाग ९ वा

## अष्टकें

### ( १४० ) अष्टक-नरहरींचें

( वृत्त : शिखरिणी )

नमस्ते श्रीविद्याधर, गुणनिधे, श्रीगणपती
नमस्ते वाग्देवी, विजयवरदे, श्रीभगवती
नमस्ते श्रीदत्तात्रय, गुरुकृपानंद-लहरी
नमस्ते श्रीनारायण, दिनदयाळा नरहरी ॥ १ ॥

स्वभक्ताचा अंकीं, धरुनि वधिला बाप नखरें
जणूं त्यानें केलें, सुकृत बहु तें पाप न खरें
पुजा सन्मानीली, करतल-लता-मुष्टि-प्रहरीं
नमस्ते श्रीनारायण, दिनदयाळा, नरहरी ॥ २ ॥

कवी प्रल्हादाही-परिस म्हणती बाप बरवा
प्रभूच्या ओसंगीं निजुनि हसला मोक्ष-परवा
विरोधी भक्तांचे विषद गुण गाई विषहरी
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ३ ॥

अरीपुत्रा मित्रा प्रभुचिसमदीक्षा उघड ती
खळांही मोक्षाचीं दुरगम कवाडें उघडतीं
हरे नामोच्चारें जिव न पडती गर्भ-कुहरीं
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ४ ॥

अहंकारें झालें विषय-विष कीं बाधक मला
म्हणोनीया आलों शरण प्रभुच्या पादकमलां
कृपावंता तारी, जनन मरणा वा परिहरी
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ५ ॥

अतां देवा माझे, अवगुण मनीं आठवुं नको
प्रसादावांचोनी विन्मुख मला पाठवुं नको
न भंगावी आशा, जय जगदिशा, हे मुरहरी
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ६ ॥
तुझ्यापाशीं बापा, तुजवरि असे स्पष्ट अरजी
स्वयें तारी मारी, आशि करुं नको रुष्ट मरजी
मला कां काळाच्या निरदयपणें देसि पदरीं
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ७ ॥
न घेवो ये नानाविध जप-तपें साधुनि करें
मिळे भक्तीनें श्रीपतिच म्हणती साधु निकरें
निज स्कंधीं घेती, निकट बसती वानर हरी
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ८ ॥
वरेण्या ! कारुण्या ! करुनि करुणा पाव मजला
अनाथाच्या नाथा, सकलहि अभीमान तुजला
कृपेनें सद्‌बुद्धी, निजभजनिं दे अष्ट-प्रहरीं
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ ९ ॥
जसा संरक्षीला कमल-सुमना-कारण करी
तसा अष्टश्लोकी स्तवनसर हा धारण करी
दुहेरी विष्णूतें चढल प्रितिचा रंगहि तरी
नमस्ते श्रीनारायण दिनदयाळा नरहरी ॥ १० ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४१ ) अष्टक–रेणुकेचें पहिलें

( वृत्त : दिंडी )

आखिल पतितांची, दुरित कृती केली
पतितपावन ही, कीर्ति आयकेली

म्हणुनि पडलों येउनी तुझ्या द्वारीं
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ १ ॥
मूळपीठ स्वस्थानिं वास केला
सतत जपलों मी नाममालिकेला
बहुत दिन गे, घातली तुझी वारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ २ ॥
जरी आहें मी स्वार्थ-काम-साधू
तरी लोकांनीं मानियलें साधू
तुझ्या नांवाची दाखवितों थोरी
लाज याची रेणुके तुला सारी ॥ ३ ॥
नसे ब्रह्मांडीं तुझ्यावीण कोणी
अतां वेगें उडि घालि सुनिर्वाणीं
त्रिविध तापें तापलों असे भारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ४ ॥
गृहीं व्यालेली कामधेनु माय
ग्रामलोकांसी ताक मागुं काय
कृपण म्हणतिल निर्दैवि हा भिकारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ५ ॥
जन्मतां गाजे सिंहिणिचें तोक
ग्रामसिंहाचे संगें करी शोक
जंबुकाचें भय कंप घे शिकारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ६ ॥
होय सर्पांची दासि गरुड-माता
गलंडानें वैद्याचि रडे कांता
समर्थाचा आश्रीत करी चोरी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ७ ॥

तुझ्या नामीं विश्वास अल्प नाहीं
म्हणुनि धांवे दुष्कीर्ति कल्पना ही
पतित पापी मी परम दुराचारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ८ ॥

तुझ्या चरणाची भेट घ्यावि वाटे
परी नेतें प्रारब्ध आडवाटें
गळां पडली दृढ संचिताचि दोरी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ९ ॥

अहा! दारिद्र्यें पीडित गृह-दारा
कर्जदारहि धावोनि येति दारा
त्यांत रोगाची दाटली उभारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ १० ॥

चलित दिवसाची साथि काकि मामी
परी निर्वाणीं कुणी न ये कामीं
निर्धनाची मानिती ते शिसारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ ११ ॥

पहा बुडतों मी दुःखसागरांत
कशी बसलिस तूं स्वस्थची घरांत
कृपावंते ही विनती अवधारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ १२ ॥

सर्व माझे अजि हारले उपाय
म्हणुनि अंबे धरियले तुझे पाय
विष्णुदासाची दीनजननी, तारी
लाज याची रेणुके, तुला सारी ॥ १३ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४२ ) अष्टक-रेणुकेचें, दुसरें

( वृत्त : चामर )

लक्ष-कोटि चंडकीर्ण सुप्रचंड विलपती
अंबचंद्रवदनबिंब दीप्तिमाजि लोपती
सिंहशिखर अचलवासि मूळपीठनायका
धर्म-अर्थ-काम-मोक्ष-कल्पवृक्षरेणुका ॥ १ ॥
आकर्ण अरुणवर्ण नेत्र, श्रवणिं दिव्य कुंडलें
डोलताति, पुष्पहार भार फार दाटले
अष्टदंडिं, बाजुबंदि, कंकणादि, मुद्रिका
धर्म-अर्थ-काम-मोक्ष-कल्पवृक्षरेणुका ॥ २ ॥
इंद्रनीळ, पद्मराग, पाच, हीर वेगळा
पायघोळ बोरमाळ, चंद्रहार वेगळा
पैंजणादि भूषणेंच लोपल्याति पादुका
धर्म-अर्थ-काम-मोक्ष-कल्पवृक्षरेणुका ॥ ३ ॥
इंद्र, चंद्र, विष्णु, ब्रह्म, नारदादि, वंदिती
आदि-अंत-ठावहीन आदि शक्ति भगवती
प्रचंड चंड मुंड खंडविखंडकारि अंबिका
धर्म-अथ-काम-मोक्ष-कल्पवृक्षरेणुका ॥ ४ ॥
पर्वताग्रवासि पक्षि 'अंब अंब' बोलती
विशाल शालवृक्ष रानिं भवानि ध्यानिं डोलती
अवतार-कृत्यसार जड-मुढादि तारका
धर्म-अर्थ-काम-मोक्ष कल्पवृक्षरेणुका ॥ ५ ॥
अनंत ब्रह्मांड पोटिं, पूर्वमुखा बैसली
अनंत गुण, अनंत शक्ति, विश्वजननि भासली
सव्यभागिं दत्त, आत्रि, वामभागिं कालिका
धर्म-अर्थ- काम-मोक्ष-कल्पवृक्षरेणुका ॥ ६ ॥

पवित्र मातृ-क्षेत्र-धन्य वासपुण्य आश्रमीं
अंब-दर्शनासि भक्त-अभक्त येति आश्रमीं
म्हणुनि विष्णुदास नीज लाभ पावला फुका
धर्म-अर्थ-काम मोक्ष-कल्पवृक्षरेणुका ॥ ७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४३ ) अष्टक–रेणुकेचें, तिसरें

( वृत्त : चामर )

तूं विचित्र गारुडीण काय खेळ मांडसी
रक्तमांसअस्थिच्या गृहांत जीव कोंडसी
प्राण कंठिं पातल्याहि सोडसी न कां मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ १ ॥
तारिलेस, तारतीस, तारशील, पातकी
अपरोक्ष साक्ष देति हे तुझेचि हात कीं
हेचि पाय हासतील कौतुकें तुला मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ २ ॥
एकदांहि दाविसी न आत्मरूप रेखडें
घालसी, सुलोचनांत राख खूपरे खडे
तारसी न मारसी न बारसीनं कां मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ ३ ॥
मुख्य कार्यकारणांत तूंचि होसि वांकडे
दोष हा जिवाकडे न दोष हा शिवाकडे
आवघें तुझेंचि कृत्य हें कळोनि ये मला
हें विहीत काय, सांग, माय, रेणुके तुला ॥ ४ ॥
तूं दिनाचि माय साचि, होसि, कां ग मावशी
विद्यमान हें सुशील नाम कां गमावशी

---

१ कुऱ्हाडीनें

नित्य मार शत्रुहातिं मारवीसि कां मला
हें विहीत काय, सांग, माय, रेणुके ! तुला ॥ ५ ॥
जो गुन्हा करी अधीक तो प्रितीस आगळा
मीं तसा कधीं न कांहिं बाइ ! कापिला गळा
हाचि न्याय अनुभवासि दाखला अला मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ ६ ॥
रासभीण नारदादि आहिराजी वासना
जी अटोपली प्रत्यक्ष नाहिं राजिवासना
ती उनाड सांगतीस आटपावया मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ ७ ॥
ओढती न पेरुं देति हात चालु चांडिचे
दुष्ट काम-क्रोध मांग जातिचे लुचाडिचे
त्यांचि पाठ राखितेस हें कळोन ये मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ ८ ॥
काय जन्म घातलासि, लाविलीस काळजी
काळजांत इंगळीच खोंचलीस काळ जी
ही जराचि धाड धाडलीस खावया मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ ९ ॥
काय स्वस्थ बैसलीस मूळपीठपर्वतीं
काय घातलासि हा अनाथ देह कर्वतीं
काय लोटलेंसि घोर दुःखसागरीं मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके ! तुला ॥ १० ॥
काय लीहिलेंसि दैविं गर्भवास सोसणें
काय दीधलेंसि जन्म-मृत्युलागिं पोसणें

---

१ ज्यांतून बीं पेरतात तें लांकडी अवजार.

काय लाविलेंस नित्य तोंड वासणें मला
हें विहीत काय, सांग. माय रेणुके! तुला ॥ ११ ॥
आदि मध्य-आवसानिं सर्व विश्व चाळसी
होसि तूं तरूण, वृद्ध, बाळ खेळ खेळसी
विष्णुदास व्यक्त नाम-रूप-गूण कां मला
हें विहीत काय, सांग, माय रेणुके! तुला ॥ १२ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४४ ) अष्टक—रेणुकेचें, चवथें

( वृत्त : दिंडी )

तुझें सुंदर रुप रेणुके विराजे
वर्णितातो मुनि-देव-देवि-राजे
कोण स्वगुणाचा करिल गुणाकार
तुला माझा अंबिके! नमस्कार ॥ १ ॥
सदानंद मुख-चंद्रमा सबंध
रत्नहार, मणी, वांकि बाजुबंद
मुक्तजडित सुवर्ण अलंकार
तुला माझा अंबिके! नमस्कार ॥ २ ॥
विलोकुन नथ नासिकीं, काप कानीं
मार्ग विसरावा मोक्ष-साधकांनीं
हांक द्यावी लक्षुनी लक्षवार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ ३ ॥
साडि पिवळी खडिदार भरजरीची
तंग चोळी अंगांत अंजिरीची
टिळा कुंकुम, निट वेणि पिळेदार
तुला माझा अंबिके! नमस्कार ॥ ४ ॥

सप्तशतिचे पुढें पाठ घणघणाट
टाळ, घंटा, कंकणें, खणखणाट
पायिं पैंजण घन देति झणत्कार
तुला माझा अंबिके! नमस्कार ॥ ५ ॥
मूळ धाडी दर्शना यावयासी
लावि भजनीं या उर्वरित वयासी
तोडि सारा हा दुष्ट अहंकार
तुला माझा अंबिके! नमस्कार ॥ ६ ॥
पर्वतीं या बसलीस अह्मांसाठीं
परी अमुची खरचली जमा साठी
भरत आला स्थळ-भरतिचा अकार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ ७ ॥
माय वंची दुरदेशिं मुलांनाही
अशी वार्ता ठाऊक मला नाहीं
अगे आई ! हा काय चमत्कार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ ८ ॥
ब्रीद सोडुन बसलीस बेफिकीर
मला केलें सरदार ना फकीर
काय म्हणतिल व्यासादि ग्रंथकार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ ९ ॥
तरी आतां ये, धांव, पाव, तार
त्वरित आतां तरि धांव, पाव, तार
करी माझा अविलंबें अंगिकार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ १० ॥
काय रागें झालीस पाठमोरी
तेरि अम्मा फिर एकि वाट मोरी

केशराचा हरपेल कीं शकार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ ११ ॥

पहा जातो नरजन्म-रंग वायां
नये सहसा परतून रंगवाया
म्हणुनि करितों विशेष हाहा:कार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ १२ ॥

कृपासूत्रें वोढोनि पाय दावी
जशी बांधी कृष्णासि माय दावीं
अहो मीही अन्यायि अनीवार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ १३ ॥

मीच अथवा तुज हृदय-मंदिरांत
प्रेमसूत्रें बांधीन दिवस-रात
यथातथ्य परि नसे अधीकार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ १४ ॥

कसा एका पुष्पाचिया आवडीनें
मुक्त केला गजराज तांतडीनें
तसा मीही अर्पितों सुमनहार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ १५ ॥

केलि दुल्लड ही पदर पंधराची
तुझ्यासाठींची, आण शंकराची
विष्णुदास म्हणे रेणुके स्विकार
तुला माझा अंबिके ! नमस्कार ॥ १६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४५ ) अष्टक-रेणुकेचें, पांचवें

( वृत्त : वसंततिलका )

श्रीमूळपीठ-शिखर-स्थळिं कोटि लक्ष
चिंतामणी सुरभि शोभति कल्पवृक्ष
मी तेथ मंदमति कां श्रमतों बसूनी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ १ ॥
यावी दया तुज बया ! शतशः अशांची
जो फार दीन बसला धरुनी अशाची
गेली निघून म्हणतां म्हणतां जवानी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ २ ॥
केलें तुझें भजन कीं निष्काम नाहीं
आतां असो दुर परी दुष्कामना ही
आहे विनंति इतुकी जननी ! निदानीं
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ३ ॥
वाटे मला परम घातकि मी मनुष्य
म्यां नासिलें परम दुर्लभ हें अयुष्य
काळासि केलि तुज वंचुनि मेजवानी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ४ ॥
झाली शरीरिं विषयानलिं यातनाची
गंजी जशी समुळची जळते तणाची
यासाठीं आइ ! तुज प्रार्थित दीनवाणी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ५ ॥
गेली बहीण, जननी, दिविं तोंवि तात
गेली वधू प्रमुख मानिली जी हितांत
ही जाहली अशि, असो, जरि सर्व हानी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ६ ॥

जी केलि म्यां जपतपादिक साधनाही
ती व्यर्थ गेलि सहसा तरि बाध नाहीं
आलों तुला शरण मी निज-सौख्यदानी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ७ ॥
आलीस तूं सकलही स्वरूपीं अकारा
हें नेणुनी उगिच मी करितों पुकारा
येती जशीं नउ नऊ गणितां नवांनीं
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ८ ॥
शक्ती असो जग-हितास्तव अंगिं बाकी
यावीण कांहिं नलगे मजलागिं बाकी
हें विष्णुदास विनवी श्रीमृगराज-यानी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी ॥ ९ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४६ ) अष्टक– रेणुकेचें, सहावें

( वृत्त : भुजंगप्रयात )

दयाळे ! तुझ्या कोटि ब्रह्मांड पोटीं
स्वयें पाळिशी जीव कोट्यानकोटी
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो[1] रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ १ ॥
कधीं आपुलें दाविसी मूळपीठ
मिळो ना मिळो खावया गूळ-पीठ
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ २ ॥
तुझ्यापाशिं राहीन खाईन भाजी
जगामाजि सांगेन ही माय माझी

---

१ 'आइ रेणुके' असा मूळपाठ आहे.

नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ३ ॥
बरा नाहिं का मी धुया लूगडें हो
अशा पूरवावी दयाळू गडे, हो
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ४ ॥
तुझी भक्ति अंगामधें संचरावी
तुझी माउली वेणि म्यां विंचरावी
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ५ ॥
तुला प्रार्थना हीच जोडूनि पाणी
तुझ्या द्वारिं राहीन, वाहीन पाणी
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ६ ॥
नसे द्यावया वस्त्र यद्वा दशीला
तुझ्या पंक्तिला येउं दे द्वादशीला
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ७ ॥
जिवाहूनि आतां करूं काय दान
आईनें रुसावें असा कायदा न
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ८ ॥
सदा विष्णुदासाचिया हे अगाई
दया येउं दे जाहलों गाइ-गाई
नुपेक्षी मला आदिमाये ! परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ९ ॥

## ( १४७ ) अष्टक– रेणुकेचें, सातवें

( वृत्त : भुजंगप्रयात )

सदा सर्वदा मोरया, शारदाही
सदा सर्वदा सद्गुरूंच्या पदांही
नमावें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ १ ॥
सदा सर्वदा नित्यनेमें प्रभातें
विधी-श्रीहरी-पार्वतीवल्लभातें
स्मरावें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ २ ॥
सदोदीत माता, पिता, ज्येष्ठबंधू
सदोदीत धेनू, यती, विप्र, साधू
भजावें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ३ ॥
षडन्यास, मुद्रा, योगसूत्रें पदेचीं
अनुष्ठान, संध्या, मालिका त्रिपदेचीं
जपावी, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ४ ॥
सदा सर्वदाही तपोयज्ञदान
यथा सांगची देवपूजाविधान
करावें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके रेणुके रेणुके ! तूं ॥ ५ ॥
बहू देव, देवी, रवी, चंद्र, तारा
बहू रंग लीला, बहू आवतारा

---

१ येथेंही 'आइ रेणुके' असा मूळांत पाठ आहे.

गणावें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ६ ॥
सदा वेद शास्त्रें, पुराणें, कवीता
सदाऽभंग, ज्ञानेश्वरी, मूळगीता
पढावी, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ७ ॥
अयोध्यापुरीं, द्वारका-पुण्यक्षेत्रीं
प्रयागीं, त्रिवेणी, महातीर्थे यात्रीं
भ्रमावें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ८ ॥
प्रकाशीत नानाऽऽकृती-रंग-रूपें
शिळा, हेम, ताम्र, लोह, वंग, रूपें
आकारें, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ ९ ॥
सदा विष्णुदासाचिया सन्निधानीं
रहावें अतां निर्वाणीं निधानीं
नुपेक्षी, परंतू परंतू परंतू
अवो रेणुके, रेणुके, रेणुके ! तूं ॥ १० ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४८ ) अष्टक– वंदे मातरम्

( वृत्त : मालिनी )

जय जय गणराया, मोरया, शिघ्र येई
जय जय जय माते, शारदे, रंग देई
जय जय जय गंगे, श्रीगुरू, पांडुरंगे
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ १ ॥

जय जननि, भवानी, मेदिनी, सारसाक्षी
जय शुभ-वर-दानी, मालिनी, सार-साक्षी
जयगुण अभिमानी मोहिनी, हे शुभांगे
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ २ ॥

मन परधनमोहें पावलें रंजनासी
तरि हितकर नेत्रीं घालि ज्ञानांजनासी
निज स्तन-पय प्रेमें पाडसा दे कुरंगे
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ३ ॥

हर हर ! अविचारें पात्र झालों भ्रमाला
समजुन सुमनांची घेतली शुभ्र माला
दुरधर विषदंतें दंश केला भुजंगें
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ४ ॥

दिनमणि उदया ये स्वेच्छया सौख्यराशी
तशि मज झणिं आपोआप तूं देइ आशी
अनुदिनिं अनुरागें टाळ-वीणा-मृदंगें
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ५ ॥

शिशु, नर, वधु, वंदे मातरं अक्षरांनीं–
गरजति, पशुपक्षी डोलती वृक्ष रानीं
निशिदिनिं मधु गाती देवगंधर्व रागें
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ६ ॥

क्षणभर तव नामावीण जिव्हा न राहो
रघुपति समभावें मान दे वानरा हो
तदुपरि निज बाळें तोषवी आत्मसंगें
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ७ ॥

ऋतुशिल जळवृष्टी; तृष्टि-पुष्टी असो दे
सुखमय करि सृष्टी दुःख दृष्टीं नसो दे

हरिहर-परमेष्ठी पृष्ठिं रक्षीत मागें
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ८ ॥
हरिशिल भय, चिंता, संकटें, माउली ! तूं
करिशिल स्वकरांची सर्वदा साउली तूं
म्हणवुन गुण गायी विष्णुस्वामी अभंगे
जय जय जय वंदे मातरं–मातरं गे ॥ ९ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १४९ ) अष्टक– रेणुकास्तवं[1]

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

श्रीमातापुरवासिनी भगवती चिंतामणी शारदा
चिंतीतों तुज त्यासहीत नमितों श्रीसद्गुरू नारदा
पावे सत्वर, श्रेष्ठ नाममहिमा जाणूनिया आपुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ १ ॥
जन्मापासुनि घोर पाप अवघें म्यां ठेविलें साधुनी
माते ! तूंचि पतीतपावन, मला सांगीतलें साधुंनीं
जाळी पातक यज्ञअग्नितनये, ही कापसाची तुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ २ ॥
कापाया निकरें जरी निजकरें तो राम धावे गळां
नाहींची जिव जाहला, तरि तुझा प्रेमांतुनी वेगळा
चित्तीं निर्दयता तुझ्या न उमटे, कांटे न येती फुलां
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ३ ॥
अद्यापी मज कामक्रोध खळ हे शत्रू पहा गांजिती
अद्यापी तव नाम पावन कथा आभंग गंगा जि ती

---

[1] पहिल्या आवृत्तींत नसलेलीं ९।१० हीं कडवीं उपलब्ध झाल्यामुळें येथें छापलीं आहेत.

अद्यापी नच उष्णता प्रकटली श्रीलक्ष्मीबंधुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ४ ॥
अज्ञानी पडलों अम्ही पतितची अन्याय केले, करूं
टाकावें तरि कां कुपोदरिंच तें जें नायके लेंकरूं
नाहीं विन्मुख जाहला रवि कधीं त्रासूनिया केतुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ५ ॥
आतां योग्य नव्हे कुदोष अमुचे चित्तामधें ठवितां
केला नाहिंस कां विचार पहिला ऐसें करंटें वितां
श्रेष्ठत्वासि न ये परीस शिवल्या सोन्याचिया धातुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ६ ॥
हा बाई बसला कसा दगडसा दारीं ऋणाईत कीं
कांगाई करितो उदंडचि, नसे लज्जा तृणाईतकी
ऐसेंही म्हणतां मि बाई तुझिया या सोडिना पाउलां
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ७ ॥
तारीं या व्यसनीं दिनासि अथवा मारीं जगन्नायके
येथूनी उठ जा परी कुणिकडे हें बोलणें नायके
देवो दुग्ध किं उग्र माय विषही प्यावेंचि लागे मुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ८ ॥
ऐसा पातकि शंकराहि न मिळे, भावार्थ यावा मना
नाहीं पालटलें त्रिविक्रमरुपें, जें नाम तें वामना
माझा त्याग करील क्षाराचे तुझ्या, सत्कीर्तिच्या सिंधुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ ९ ॥
आनाथा प्रतिपाळिसी म्हणुनियां तूं नाथ नारायणी
श्रीव्यासात्रि शुकादि नारदमुनी, गाताति पारायणीं
विष्णूदास म्हणे तरी त्यजुं नये, पीतांबरें तंतुला
श्रीअंबे, जय रेणुके, जननि हे, कां राग आला तुला ॥ १० ॥

## ( १५० ) अष्टक -- अंबाबाईचें

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

जन्मा येउनि व्यर्थ मानवकुळीं एरंडसा वाढलों
झालों मी धड ईकडे न तिकडे आधें-मधें नाडलों
नाहींची परमार्थ-स्वार्थ लवही स्वप्नांतरीं लाभला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ १ ॥
संसारीं कुळदेवताच सगळी म्यां मानिली बायको
अज्ञेनें परि वागलों मिच तिच्या ती आयको नायको
झाला लंपट वीषयांध खळ हा बैलापरी शोभला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ २ ॥
माती खातिल कां घरींच बसल्या हीं कारटीं पोरटीं
जातां दूर स्थळीं कुणीकडे तरी पाहील स्त्री गोरटी
एवं काळजि काळजीच करितां काळेंचि आटोपला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ३ ॥
पोटासाठिंच दाविलीं वरघडी सोंगें जनाला भलीं
हातीं एकहि शेवटास फुटकी कौडीहि ना लाभली
आशा-सर्पिणिच्या मुखीं अखुपरीं गे देह हा कोंबला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ४ ॥
अंगाला विभुती, कमंडलु करीं, कानांमधें कुंडलें
केले रंग विरंग ढंग अगळे, शिष्ये बहू मुंडले
मोक्षाला मुकलों, धनार्थ शिकलों, सारी नटाची कला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ५ ॥
आशा रांड खराब तोंडचि सदा नीलाजरि वासवी
सोडी ना परि वाट दैवगतिनें झाला जरि वासवी
मेल्याही मरेना समंधचि करी जी लागलीसे मुलां
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ६ ॥

लक्षाची घडि चालली झरझरा ही रात्र हा दीवस
गेली आलि दिवाळि जाय दसरा ही पौर्णिमा आवस
काळानें अवचीत कंठ तितुक्या संधीमधें दाबला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ७ ॥
कामक्रोध पहा महारिपु कसे साही जणे दांडगे
दारा-पुत्र-कलत्र व्याघ्र-शुकरादी अस्वलें लांडगे
वांछीती जिव घ्यावयास अवघा शत्रू जगीं व्यापला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ८ ॥
सांगूं मी तुजला घडी घडि किती कर्मांचि ही काहणी
विघ्नें हीं दुर वारिसी कुठवरी आहेस तूं शाहणी
विष्णूदास म्हणे म्हणून इतुकी आहे विनंती तुला
अंबाबाइ, अतां नको पुनरपी संसारिं घालूं मला ॥ ९ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १५१ ) अष्टक– तुकाबाईचें

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

झालों जानकिच्याविणें थकित मी आरण्य कंठावया
कौसल्येपरि धांवुनी आलिस या रामासि भेटावया
हा-हा ! काय अजी जगांत जननी त्वां धन्य केलें मला
माझा हा प्रणिपात आइ, तुळजाबाई, तुकाई तुला ॥ १ ॥
कौसल्येहुनि कैकयी जननिचा आभार हा केवढा
झाला दर्शनलाभ निश्चय जिच्या कोपामुळें एवढा
केलें सत्य तिनें कृतार्थ मजला, या दाविले पाउलां
माझा हा प्रणिपात आइ, तुळजाबाई, तुकाइ तुला ॥ २ ॥
आलों मी तुज हाननार्थ मुळ हें स्त्रीबुद्धिनें वांकुडें
केलें कर्म विशेष लावुं कसला मी दोष देवांकडे

आतां या परिणामिं भोगहरणा मी भोगितों आपुला
माझा हा प्रणिपात आइ, तुळजाबाई, तुकाई तुला ॥ ३ ॥
रे वत्सा, उपकार आठवुं किती मी पाउला-पाउलीं
भेटाया तुजकारणें मज आली विश्वाचि ही माउली
धालों दर्शनिं मीहि चातक जसा पाहूनि मेघांवुला
माझा हा प्रणिपात आइ, तुळजाबाई, तुकाई तुला ॥ ४ ॥
हें चिंताभयशोकदायक वनं येथें तुकाई बरं
ऐसीं कां सजलीस वल्कलपटें सोडून पीतांबर
एकाकी दुर काननीं अलिस कां सोडूनिया शंमुला
माझा हा प्रणिपात आइ, तुळजाबाई, तुकाई तुला ॥ ५ ॥
ऐशाही परि वल्कला विनटली जी आदिमाया कदा
दावी या नयनांसि चंद्रवदना, ती जानकी एकदां
अंबे, सत्वर हो प्रसन्न मजला या पूरवी हेतुला
माझा हा प्राणिपात आइ, तुळजाबाई तुकाई तुला ॥ ६ ॥
तेव्हां ती शिववल्लभा रघुविराच्या बोलिला मानवी
लौकीकास्तव पूर्णब्रह्म प्रमु हा दावी लिला मानवी
आला जानकिच्या मिसें क्षय कराया राक्षसांच्या कुला
माझा हा प्राणिपात आइ, तुळजाबाई, तुकाई तुला ॥ ७ ॥
सीतेचें रुप त्यागुनी निजरुपें हेमाद्रिची बालिका
श्रीरामापुढें ठाकिली निलग्रिवाच्या कंठिंची मालिका
पाहूनी तिजला रघूविर म्हणे ढाळीत प्रेमाश्रुला
माझा हा प्राणिपात आइ, तुळजाबाई तुकाई तुला ॥ ८ ॥
येथें स्वस्थपणें निरंतर रहा भक्तांसि तारावया
व्हावें साह्य भवानिमाय, मजला दुष्टासि मारावया
माझी जानकि शीघ्र भेटावि मला सिद्धांत हा इतुला
माझा हा प्राणिपात आइ, तुळजाबाई तुकाई तुला ॥ ९ ॥

तारया पतितासि राहिलि तशी तेथेंचि अद्यापि ती
दुर्बुद्धीच तिच्या कथामृतरसा टाकून मद्या पिती
विष्णूदास म्हणे ललाट कधिं त्या लागेल पादांगुळां
माझा हा प्रणिपात आइ, तुळजाबाई तुकाई तुला ॥ १० ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १५२ ) अष्टक– दत्तात्रयांचें

( वृत्त : वसंततिलका )

श्रीवक्रतुंड चतुरानन बालिका ही ।
श्रीलक्ष्मी भगवती महा कालिका ही ॥
गाती वसंततिलकामृततुल्यवृत्त ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ १ ॥
सिंहाद्रि पर्वत महाभुवनप्रकोटीं ।
इंद्रादि देव वसती तेहतीस कोटी ॥
गंधर्व-यक्षगण किन्नर ब्रह्मभूत ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ २ ॥
श्रीरेणुका, अनसुया, श्रुति वेदधात्री ।
गाधी, कपील मुनि, भार्गवराम, अत्री ॥
ध्याती समग्र सरिता नवकोटि तीर्थे ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ३ ॥
श्रीव्यास, वाल्मिक, शुकादिक नारदांही ।
वाटे तरीच भवसागर पारदा ही ॥
भूकोरि मूळपिठिकाहि सर्वोपसंत ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ४ ॥
कल्पद्रुमा हिणवुनी तरु डोलताती ।
पक्षी विवीध स्वर मंजुळ बोलताती ॥

आखंड नाम पठणीं करिती अवृत्त ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ५ ॥
जंबूक, व्याघ्र, हरणें, फिरती समोर ।
चंडोल, कोकिल, करंडक, हंस, मोर ॥
त्या रम्य काननिं सदा रव कानिं येत ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ६ ॥
त्राता दिगंबर अगोचर सूर्यचंद्रा ।
मातापुरीं करि तृणासनिं योगनिद्रा ॥
दाता दयार्णव कदापि नव्हे अदत्त ।
श्रीदत्त, दत्त, जयश्रीगुरुदेवदत्त ॥ ७ ॥
जेव्हां वसंत ऋतु यामिनि शुक्लपक्षीं ।
नक्षत्रराजमुख लक्षि चकोर पक्षी ॥
तेव्हां कधीं म्हणिन त्या बसुनी वनांत ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ८ ॥
आनंदसिंधु शशिबंधु उदारवाणी ।
कौपीन, कुंडल, कमंडलु दंडपाणी ॥
माळा जटामुकुटमंडित आवधूत ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ९ ॥
होतील प्राप्त म्हणती मुनि ब्रह्मचारी ।
धर्मार्थकाममोक्षादिक लाभ चारी ॥
उच्चारितांचि वदनीं संसारसक्त ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ १० ॥
द्यावी सुभक्ति भजनीं म्हणे विष्णुदास ।
आशा धरून एवढी बसलों उदास ॥
केव्हां कृपा करुनि हा पुरवील हेत ।
श्रीदत्त, दत्त, जय श्रीगुरुदेवदत्त ॥ ११ ॥

# भाग १० वा



## पोवाडे

### ( १५३ ) पोवाडा ( आत्मकथनपर )

रंगपटावर स्त्री-पुरुषांची फुटली रे जोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ध्रु० ॥
नरजन्माचा नरा ! येइना पुनः पुन्हा खेळ
जशी का केळीला केळ
तरुणपणाचा बहार अंगीं येतो एक वेळ
नदीचा पूर केवळ
वृद्धपणामधिं शिरिं पांढरी फुटली हरळ
अवघी मग पडली मुरळ
आयुष्याची शिल्लक बाकी राहिली थोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १ ॥
जोंवर आहे स्त्रीपुरुषांची संगत संसारीं
तोंवर ही गम्मत सारी
रामचन्द्रही स्त्री-दुःखानें करि 'नारी', 'नारी'
झाला वेडा मदनारी
विवाहिताचा विधूर झाला पुरुष निराधारी
कोळसा पडला अंधारीं
प्रारब्धानें केलि प्रीतिच्या मधें ताडातोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २ ॥
लग्न लाविंती वैदिक ब्राह्मण म्हणाति सावधान
आतां द्या दुरवर अवधान

प्रसिद्ध झालें जगांत राधाबाई अभिधान
ऐका पुढें अनुसंधान
दारिद्र्यांतहि पार्वति ऐसें मानि समाधान
सदोदित राहे आनंदानें
भ्रतार मानुनिया शिवरूपी पुढें हात जोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ३ ॥
गृहकार्याला अनुकुल होती ती भार्या माझी
अखण्डित मजवर ती राजी
कधिं खावी शिळि भाकर-भाजी, कधिं साजुक-सोजी
करी सर्वांसि हांजि हांजि
नित्य क्रमानें उदक गायी-वासरांसि पाजी
आवड सर्वत्रांमाजी
पतिकार्यासी तत्पर राहुनि साधे आघाडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ४ ॥
या परि गेले सहज आनंदामधें दिवस चार
पुढें काय सुचला विचार
दैवबळानें गोड वाटला असुनी अविचार
करावा मु-लोकीं संचार
द्यूत खेळतां धर्म न ऐके विहीत उपचार
कळविला तिला समाचार
ऐकुनि वाटे पडली अंगावर पर्वत-धाडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ५ ॥
काळ-गतीचा कठीण फांसा, ओढुनिया नेतो
उद्यां मी मुलखावर जातों
तुजवांचुनि जळहीनमिनापरि केवळ तळमळतों
वल्लभे, जिव, व्याकुळ होतो

परंतु तव संमतें तुझा मी निरोप अतां घेतों
परतुनि अविलंबें येतों
कसें करूनिया चार दिवस हे विरहाचे काढी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ६ ॥
ऐकुनि राधा झाली उलटी खड्गाची धारा
वाहती नेत्रांतुनि धारा
टाकुनि द्यावी अपुलि बायको दुसऱ्याचे दारां
नव्हे हा सूज्ञाचा धारा
टाकुनिया गृहदीप-प्रकाशित पतिच्या आधारा
कोण स्त्री पडेल अंधारां
म्हणे, का करितां ब्रह्मगांठिची तुम्हि सोडासोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ७ ॥
येइन तुमच्या समागमें मी, तुम्हि मजला न्यावें
येवढें वचन ऐकावें
मला वाटतें अपण वनामधें आनंदानें रहावें
ऋषींचे पुण्याश्रम पहावे
चार दिवस निश्चिंत वनाचें वैभव भोगावें
तुमच्या सेवेंत वागावें
खाउनि ओला सुकला पाला करूं सुकृत जोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ८ ॥
अधिकाचि तळमळ वाटे, पडेना चैनाचि अणुमात्र
सती ती गुणगंभिर पात्र
जागत बसली, नाहिं लाविला नेत्राला नेत्र
सोडिली झोंप सप्त रात्र
परंतु मोठें कर्मगतीचें चारित्र विचित्र
अचेतन केलें जसें 'चित्र'

अठवे दिवशीं त्या संधीमधें साधलि घरफोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ९ ॥
जसा काय नळ दमयंतीचें अर्धवस्त्र कापी
तदा ती गेलि होति झोंपीं
ताशि दुष्टानें धेनु घातली व्याघ्राच्या खोपी
असोनि जिवाचे संगोपी
त्या दुष्कर्माचे पहा झाडे पटती अद्यापी
कोणि नसे मजऐसा पापी
अन्यायाविण त्या साध्वीची केलि मानमोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १० ॥
टाकुनि गेला पती सतीला त्या निजल्या जागीं
झाली दचकुन ती जागी
अकस्मात दुर बिरबार शंभर विंचवाचे नांगी
टोंचल्या वाटाति सर्वांगीं
दुःखाग्निमधें करपालें गातें जशि सगळीं वांगीं
विपत्तिस जाहली बिभागी
रडे पडे आक्रोशें ओरडे आरडे शिर फोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ११ ॥
एक वेळ येउनि कांहीं तरि तुम्हि मजसी बोला
आतां कां धरिला अबोला
दिली गळ्यांतुनि फेंकुनि पुतळी कवडीच्या मोला
आली काय किंमत समतोला
टाकुनि गेला नळ निळ कंटकवनीं बायकोला
उसाचा फड पाहुनि कोल्हा
ज्ञानहीन अज्ञान जात ही बायकोचि वेडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १२ ॥

ही इकडे असे, पति तिकडे मग धुंडे रानोमाळ
पडेना चैन अळूमाळ
कोठें राहणें, मास, पक्ष, ऋतु ऐन वर्षकाळ
कोठें एक दिन, संध्याकाळ
मिळाली भ्रमतां पहा विश्रांती माहुरच्या पहाडीं
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १३ ॥
श्रीदत्तात्रय निद्रास्थळ निळ अवाळि महासिद्ध
देव देवेश्वर सन्निध
त्या स्थळिं केलें तप मागुनिया माधुकरी शुद्ध
कटाक्ष न सोडी प्रारब्ध
तदनंतर मातापुरिं केला बहु नाटक छंद
जोडिली कविता कटिबंद
परंतु झाली त्या स्वस्त्रीची स्मृति थोडी थोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १४ ॥
रणुराव सरदेशमूख रणशूर अखाड्यांत
राहिलों त्यांच्या वाड्यांत
त्या पुरुषाशीं जडला स्नेह-संबंध थोडक्यांत
अडकला कासव हंड्यांत
तो झाला नर गत व्याघ्राच्या पडुनी जबड्यांत
ज्याचे गुण गावे पोवाड्यांत
मग त्यामागें गृह पत केली पाटिल पासोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १५ ॥
प्रयाग, काशी, मथुरा, वृंदावन, गोकुल-शाळा
धुंडिल्या अनेक देशाला
कृष्णा, वेण्या, गंगातट, मठ दाही दिशांला
शोधितां पावे निराशेला

करितां बहु जपतपव्रत खचलें मानिं उपदेशाला
दया मग ये जगदीशाला
दाखवि लीला कला चरित्रचि विचित्र गारुडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १६ ॥
सकळ जगावर तुझि भगवंता करुणामृत-वृष्टी
असूनी मज करसी कष्टी
बाप नव्हे तो साफ बुडवितो दुःखामधिं सृष्टी
यमाहुनि निर्दय परमेष्ठी
शुभाशुभ फळें काय लिहितो न कळे अदृष्टीं
आतां कधिं पति पाहिन दृष्टीं
आइ धरणि ! घे पदरामध्यें, उदरामधिं ओढी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १७ ॥
अशा परीनें त्या साध्वीचा अवलोकुनि शोक
कृपेनें शांतविती लोक
भ्रतार भेटेल, पलटेल विपरित काळाचा झोंक
अतां त्वां रहावें बिनधोक
पर्जन्य पडतो परी न दिसतें गगनाला भोंक
ईश्वरी चरित्र अवलोक
धैर्य धरूनी हृदय-बिळामधिं पंचप्राण कोंडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १८ ॥
अशि इकडे मग झाली षोडश वर्षांची भरती
तिकडे खबर नसे पुरती
म्हणती, वाटे विपरित सुकृत गति शतशिरती
कल्पना विवीध जन करिती
दुःशब्दांचे इंगळ पडती त्या साध्वीवरती
ऐकुनी हळहळती गरती

कां झाला हरि कंटक संकट-सागर-नावाडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ १९ ॥
रहिमतपुरिं सद्भावें पूजन विठ्ठलाचें केलें
तयाचें पुण्य फळा आलें
पाषाण-मूर्ति प्रत्यक्षचि ती संक्षिप्तहि बोले
आतां तुझें कार्य सिद्ध झालें
या महिन्याचे अंतीं जाइल वर्तमान कळलें
बोलुनी असें मौन धरिलें
त्या कालिं गमे मनीं तीजला लक्ष लाभ कोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २० ॥
सदोबा काळे होते मेहुणे रहात शेजारीं
सहज ते आले माहूरीं
मनिं खुण पटली, भेट जहाली मग तिसरा प्रहरीं
उठली सौख्याची लहरी
वृत्तांत कळवुनि, कुशलक्षेम मग पत्र सुविस्तारीं
घेउनी गेले माघारीं
सकळ जनाला वृत्तांत कळला मग तोंडातोंडीं
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २१ ॥
वृत्तांत कळला सातिला विठ्ठल-संकेताचे दिवशीं
पावला रुक्मिणिपति नवशीं
मग त्या नाहीं पारावारा थारा आनंदासी
चढली राज्यपदीं दासी
मग अविलंबें लगबग करुनी आली माहुरासी
भेटली नार भ्रतारासी
परंतु राहिली होती अंगीं कर्म-मळी थोडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २२ ॥

तेथें जाहला ताप असा कीं जीवचि त्यागावा
तरि तो कशासि मग गावा
परंतु कधिंही नाहिं वांचिलें पतिच्या मनोभावा
पाहुनी जन म्हणती वाह्वा
गरोदर झालि असतांनाही क्षणभर वीसांवा
जाच हा तिनेंचि सोसावा
प्रसुत-काळच्या संधिंत ग्रह-गति बाहेरी काढी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २३ ॥
पाहुनी तो क्रुर कृतघ्नपर्या वाटलें आश्चर्या
उतरली सखिची मुखचर्या
मित्रोत्तम गोविंद दामोदर यमुना तद्भार्या
झाले साह्य अडित कार्या
घालिति संकटिं आप्त, परी परिजन देती धैर्या
वाटलें नवल तें सूर्या
तदा पतीची मति शुद्धीवर आलि, जिरली भोंडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २४ ॥
कामिनिसह गृहद्वार-ठिकाणा मग केला दुसरा
वाटला सुदीन तो दसरा
लग्नापासुनि तरि घडला हा पतिसंगम तिसरा
म्हणति जन, पूर्वदुःख विसरा
श्रीदत्तात्रय-जगदंबेच्या पदकमलाऽनुसरा
धरुनि रहा त्यांचाची आसरा
अनुकुळ जाहला काळ माइना आनंद ब्रह्मांडीं
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २५ ॥
तप्त अंगावर सदा पाझरे चंद्रामृत-किरण
पावले स्वस्थांतःकरण

लक्ष्मीपतिनें धनधान्यादिक भरपुर सुवर्ण
पुरविली बहुवस्त्राभरणं
जी जी वासना धरिली ती ती केली परिपूर्ण
झाला सकळ शोक हरण
दैवें कंटकवनीं लाभली कल्पद्रुम झाडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २६ ॥
सकळहि केले पूर्ण मनोरथ जय तुळशी माते
अतां नको दाऊं दुःख मातें
अखंडीत सौभाग्य रक्षुनी करि या देहातें
आनंदें मुक्त पती-हातें
जसें जसें दैवामधें लिहिलें तसें तसें होतें
चुकेना नर हो ! कदापि तें
भविष्यकाळाकडे मनानें बळें घेतलि ओढी
आतां काय खेळण्याचे गोडी ॥ २७ ॥
भेटायास्तव माय पार्वती पिता शंकरासी
म्हणे मी जातें माहेरासी
सकळ पावलें शुभ मंगळ सौभाग्य भरपुरासी
लाभलें सुख संसारासी
ज्येष्ठ शुद्ध द्वितिया दिनिं दक्षिणायन दशहारासी
मिळाली गौरी-हरासी
वाटे सुख-सिंधुच्या बुडाली अधेंमधें होडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २८ ॥
कामिनि-वांचुनि काय करावें उजाड सदनासी
निघूनी जावें अरण्यासी
सांगावें तरि काय कर्महिन दुःख धन्यासी
दाउं नये दिन मुख अन्यासी

काय करावें उत्तम कनकांबर धनधान्यासी
टाकुनी व्हावें संन्यासी
गेलीं वायां बाळी, बुगडी, नथ, लुगडीं, साडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ २९ ॥
प्रपंच-भुवनांगणीं सुशोभित द्राक्षाची वेली
मंडपीं होती पालवली
प्रारब्धानें मुळासकट ती उपटुनिया नेली
जगांतुनि या नाहींशी केली
संसाराची सर्व उभारी येथुनिया सरली
सुखाची सरिता ओसरली
परि काळानें केळ कोंवळी कापिली अघाडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ३० ॥
जातों आतां अम्ही जेथुनी अलों तेथल्या गांवा
आमचा नमस्कार घ्यावा
अजवर होता लोभ तसाची पुढें असूं द्यावा
मनामधें राग नसूं द्यावा
ह्याची सर्वांहि मित्रजनांला निरोप सांगावा
पोवाडा पंडितांत गावा
बहुत काय लिहिणें, विनंती मोडिली मांडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ३१ ॥
आरस नाहीं, सरस आहे खिरस गाईचा
मिळे ना बहु महागाईचा
घ्यावा मासला मधूर केवळ साखर-साईचा
आहे बहु तुमच्या सोईचा
सुगंध पुष्पांसहित प्रसरला वेल जाईचा
पोवाडा राधाबाईचा

विष्णु कवीची घांट वाजली, सुटली रेलगाडी
आतां काय खेळण्याचि गोडी ॥ ३२ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

( १५४ ) पोवाडा– ( राजाराम मडके ह्यांचा )

नका खाउं हें जहर दादा पैसा सरकारी
नाडले पाटील-पटवारी ॥ ध्रु० ॥
या पैशानें केलि खराबी हुशार लोकांची
उडाली फजिती कैकांची
पैशासाठीं कां गमवीतां अब्रू लाखाची
पुडी का खातां विखाची
पोटासाठीं पसरुन ओटी भीक मागावी
परंतु कैद न भोगावी
मुलुनि जाल, चुकुनि खाल, द्याल ओकारी ॥ नाडले० ॥ १ ॥
या कर्माच्या परिणामाची गोष्ट ऐकावी
वाटलें पोवाड्यांत गावी
वाशिम जिल्हा, पुसद तालुका, वरुडी या गांवीं
झाली गम्मत ऐकावी
सन अठराशें ब्याण्णव इसवी शुरु फेब्रुवारी ॥ नाडले० ॥ २ ॥
पुण्यवान सद्भक्त दाजिबा मडके अवतरले
आपल्या पुण्यानें तरले
गीता-पाठ आणि शिवलिंगार्चन अखण्ड व्रत धरिलें
कधीं तें नाहीं अंतरलें
प्रपंचांत परमार्थ साधिला अन्नदान केलें
वाहवा मिळवुनिया गेले
तोचि म्हणावा धन्य धन्य जो नर परोपकारी ॥ नाडले० ॥ ३ ॥

चार चिरंजिव दाजीबाचे जिवास विश्राम
तिसरा पुत्र राजाराम
पांडेपणाचें त्याकडे होतें वरुडीचें काम
सुस्तिनें झाला बदनाम
जोंवर चलती तोंवर करिती अवघे रामराम
बिघडल्या होती हराम
होउनि जाती कधीं टळे ना गोष्ट होणारी ॥ नाडले० ॥ ४ ॥
वार्यंद्याचे रुपये बारा लिहिले रपोटांत
उतरलें जहर पोटांत
त्या रुपयांची गफलत झाली पाटिल-पांड्यांत
पेटलं धुपट उकंड्यांत
फौजदारिची कलम जारी चाले दरबारीं ॥ नाडले० ॥ ५ ॥
तारिख लोटत पुढें चालली लोटाळण्यावाणी
जिवाची झाली धुळधाणी
मग अवकाळीं चिखल माजला ठीकठिकाणीं
लागलं दहा दिवस पाणी
मित्र शिरोमणि भाउरावजी धांवले निर्वाणीं
राखिली मित्राची बाणी
त्यांनीं केली होति अगोदर बहूत हुशारी ॥ नाडले० ॥ ६ ॥
चवघे अगोदर झाले होते साक्षीला राजी
मनामधें स्मरती बालाजी
पोटदुखीतें काय करावें बोले संभाजी
चुक्याची सोसेना भाजी
जावें घराकडे परतुनि आतां बोले शामाजी

---

१ सरकारी सान्याचे.

चालेना पुढें हिम्मत माझी
नारायण पाटील राहिला आणिक मूरारी ॥ नाडले० ॥ ७ ॥
मग वकिलाची सुगी पीकली दावीती बोट
दटाविति चावीती होट
कोणि हातपाय तोंड कोणिकडे केलि होति पाठ
कायदा सारा मुखपाठ
जिकडे तिकडे हांक गाजली उठली ललकारी ॥ नाडले० ॥ ८ ॥
पांडुपाटलासहीत जमले साक्षिदार बारा
वाजले कोरटचे बारा
लगबग झाली कोठें मिळेना गवताचा भारा
चाललें भोजन परभारा
म्हणती गेली नवी नव्हाळी दिपवाळी दसरा
अतां एक देवाचा असरा
अण्णा मडके मग वकिलाच्या फिरे दारोदारीं ॥ नाडले० ॥ ९ ॥
दाजीबाचा नातु बळीराम तेव्हां वाशमास
घालि हेलपाटे दिडमास
खटपट करिती अनसिंगाचे बहु अंबादास
चाले ना बसले उदास
होणाराची गती चुके ना पहा पांडवांस
भोगणें लागे वनवास
कधीं निघेल ती निघो विधीची वाहि नंबरवारी ॥नाडले०॥१०॥
वाशिमकर हे क्षेत्र उपाध्ये बहु झाले गोळा
मागती नगदीचा गोळा
भेटीसाठीं धावुनि आला आप्तांचा मेळा
उगवली भाग्याची वेळा
देव धावती नवस मागती मग पंध्रा-सोळा

बनल्या दिवसाचा सोहळा
सुखदुःखाचें चक्र सदोदित फिरतें संसारीं ॥ नाडले० ॥ ११ ॥
प्रारब्धाची मर्जी फिरली नाहिं लागालि घटका
जाहली पांडयांची सुटका
कोण्यावेळीं कोणिकडे जाईल जरीपटका
गडे हो, अभीमान लटका
अवघी केली उचापतींची मग वारासारी ॥ नाडले० ॥ १२ ॥
सुवर्णाचा दिवस उगवला वाटलें सर्वांस
आलि त्या करुणा देवास
कृपा असावी काय म्हणावें भाऊरावास
सहजची कापूरा वास
जहाला निवाडा, गावा पोवाडा, म्हणे विष्णुदास
अला शुभकाळ आनंदास
श्रीदत्तात्रय देवि रेणुका दीनाची कैवारी ॥ नाडले० ॥ १३ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

---

# भाग ११ वा



## लावण्या

### ( १५५ ) लावणी, दिपवाळीची

( चाल : ये धांवत माझे आई. )

श्री मंगळ लक्ष्मी वरद, प्रकटली शरद्-ऋतूचि नव्हाळी
कार्तिक मास दीपवाळी ॥ ध्रु० ॥
ही यामिनि कामिनि शीतळ, पिवळें पातळ, नेसुन लग्ना
चालली प्रकाशित गगना
नक्षत्र लक्ष दिपे दाट, रत्नमणि थाट, लखलख आयना
ऋतु शांति-रसाचा महिना
श्रीमंत सभासद्-रंगिं, वाजे सारंगे, डोळे मृगनैना
मंजूळ गीत बोले मैना
शिरिं चंद्रकोर राखडी, कंचुकिवर खडी, फुलांची जाळी
कार्तिक मास दीपवाळी ॥ १ ॥
उद्याऽर्धीं मंगळ स्नानें, बहु सन्मानें, तेल सुवासें
अवलंबिति दीपप्रकाशें
शुभ्र गोरजलग्निं नगरजन, लक्ष्मीपूजन, करिती हर्षे
सुगंध पुष्प-घन वर्षे
ध्वज, मंडप, स्तंभ, तोरणें, उंच आभरणें, कनक पुट सरसे
चमकती चहुंकडे आरसे
या यम द्वितियेसी चंद्रा, बहिण सुभद्रा, हरिसि ओवाळी
कार्तिक मास दीपवाळी ॥ २ ॥

श्रीहरिनें मारुनि भ्यासुर, खळनरकासुर, मुक्तिस नेला
वर त्यासि समर्पण केला
जो या सत्कृतिला चुकल, सहसा मुकल, सकळ सुखाला
तो पावे नर नरकाला
ही ऐकति गुणगणनायक, गातिल गायक, मंगळमाला
अर्पिली अम्हीं तुम्हांला
म्हणे विष्णुकवी, विश्वंभर, देइल सुखकर, वर वनमाळी
कार्तिक मास दीपवाळी ॥ ३ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १५६ ) लावणी, शिमग्याची

( चाल : भला जन्म हा तुला. )

पंचोत्सव हा पंचशरांचा पंचदिवस जिवलगा
आला वर्षाचा सण शिमगा ॥ ध्रु० ॥
कृतनिश्चय संकल्प तप्राचा भंग पावला जेव्हां
शिवानें मदन जाळिला तेव्हां
सुरवरगण गंधर्व सांगती वृत्तांत हा केशवा
लागली तळमळ अवघ्या जिवा
तो पुनरपि श्रीलक्ष्मीउदरीं जन्म पावला नवा
जहाला आनंद बहु मानवा
फाल्गुन पुनवेचा हा शुभदिन ठाउक अवघ्या जगा ॥ आला० ॥ १ ॥
क्या मदनोका हुकूम बाका उसे कोइ नाहि बडा
भडकला लाल रंग तांबडा
रहा साठ हजार बरस जो एक पावपर खडा
उडविला त्याच्या तपाचा खडा !
बडे बडे ग्यानीभि देखके औरतका मुखडा

लाविती अंगाला राखडा

क्या खुपसूरत बन गयि औरत आइ पेनकर झगा ॥ आला० ॥ २ ॥

वाजति कर्णे, ढोल, नगारे, मृदंग, डफ, चौघडे

स्वयंवर रतिमदनांचें घडे

गुलाल, केशर, पंचरंग, भरली पिचकारी उडे

शोभती मंडप द्वारापुढें

ख्याल, ध्रुपद, तिल्लाना, ठुंबरी, छंदाचे चौकडे

पवाडे गाती जन चहुंकडे

पंच दिवस लग्नाचा त्याचा समारंभ हा बघा ॥ आला० ॥ ३ ॥

देशमूख, पटवारी, पाटिल, येति नगरचे पती

गळ्यामधिं हारतुरे शोभती

वैदिक, पंडित, जोशि, पुराणिक, गोसावी, भारती

रतिच्या नांवानें गर्जती

गायक, वारांगना, आणि नट, नृत्यांगणिं नाचती

श्रीमंतां पोस्तदान मागती

विष्णुकवीच्या पदरचनेवर तुमची असुं द्या निगा ॥ आला० ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## शृंगारविषयक लावण्या

### ( १५७ ) नायिकेची लावणी– पहिली

( चाल : होइल कलह म्हणोनि )

रंगानें झालें मी लाल । नको उडवुं गुलाल ॥ ध्रु० ॥

भरजरि पदराची पैठणि भिजली । उंचीची भिजली शाल ॥ १ ॥

रंगाची पिचकारी उडे हजारी । विझली लाल मशाल ॥ २ ॥

संगित सारंगी पखवाज वाजे । बेताल होईल ताल ॥ ३ ॥

विष्णुकवि म्हणे, मंजुळ गायन । ऐका ख्याल खुशाल ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १५८ ) नायिकेची लावणी– दुसरी

( चाल : श्रीरंग गोपिकोत्संग. )

साजन् कां न ये मंदिरीं, अतां ग सुंदरी, दुरदुर रहातो
पहा माझ्या वाड्यावरून झरझर जातो ॥ ध्रु० ॥
विरहानं केलं घाबरं, वाटेना बरं, जिवाला कांहीं
सख्यावांचुनि क्षणभर मला ग करमत नाहीं
वाटतो जीव हरपला, देह करपला, झालि ग लाही
भेटवा सखा एकदां, जा ग लवलाही
कीं खावि विषाची पुडी, अथवा उडी, भरल्या डोहीं
टाकावी वाटे मला ग याचेपायीं
कर्मानं कपाळीं थोर, लावला घोर, जीव तळमळतो ॥ पहा० ॥ १ ॥
कां माझें घर वर्जिलें, काय बोललें, असें तरि त्याला
निर्वाणिं लाविलें मला वाट पाह्याला
अंगाचा होत संताप, लागलें ताप, सोसायाला
नको शाल-पैठणी मला ग नेसायाला
झोंबला विषारी नाग, लागली आग, बरसायाला
हात-पाय लाविलें मलाचि घासायाला
उभा राहुनि दुरच्या दुरीं, वरच्यावरी, मजकडे पहातो ॥ पहा०॥ २ ॥
गंगेची करुनि आंघोळ, घेउनि तांदूळ, केलें इमान
जाहला परंतु अतां मसीं बेमान
म्यां दीन गाइच्यापरी, मांडीवरी, ठेविली मान
कापाया सिद्ध जाहला मुसलमान
बुडविलें सासर-घर, आणि माहेर, केला अपमान
परिणामीं कळुनी आला मेला दुष्मान
अम्हि मूर्ख स्त्रियांची जात, यास्तव घात, दग्यानें होतो
हा विष्णुकवीचा छंद गुणीजन गातो ॥ पहा ०॥ ३ ॥

## ( १५९ ) नायिकेची लावणी– तिसरी

करमत नाहिं, सखे, नाहीं । अणुमात्रहि चैन पडे ना कांहीं ॥ ध्रु० ॥
हा जिव सारा प्याला वारा, थरकत चंचल पारा ग पारा
रतिपति मंदिरीं–छाळितो सुंदरि
प्राणसख्याविण–यदी भला तूं
सलती कंचुकि, न येचि झोंप मंचकीं मला ॥ करमत० ॥ १ ॥
सुगंध, चंदन, देत आनंद न, गुलाब, गुलछबु चंपक, मरवा
मंडप हिरवा–वाटे न बरवा
प्राणसख्याविण–यदी भला तूं
जीव तळमळतो, शितळ चंद्र पोळतो मला ॥ करमत० ॥ २ ॥
जबर उराला टोंचुनि भाला चोर हातांतुनि गेला गेला
दिवस बुडाला–पक्षि उडाला
प्राणसख्याविण–यदी भला तूं
परत येइना, विरह साहिना, मला ॥ करमत० ॥ ३ ॥
कोठें गळपट केला लंपट कोण असेल परनारी नारी
काशि तिनं मेली–मोहनी घातली
प्राणसख्याविण–यदी भला तूं
विष्णु कवि म्हणे, उघड बोलणें मला ॥ करमत० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६० ) नायिकेची लावणी– चवथी

( चाल : ललिताची–उत्तरराग )

प्रियकर कां येईना ॥ ध्रु० ॥
दोन प्रहर रात्र झाली । गस्त येऊनिया गेली
जागतें मी रंगमहालीं । जिव झोंपीं जाइना ॥ प्रियकर० ॥ १ ॥
किती तरि वाट पाहूं । धीर कोठवर साहूं

एकटी मी कशी राहूं । दर महिना महिना ।। प्रियकर० ।। २ ।।
अंगीं उटी चंदनाची । लाळ सर्प-वदनाची
घडो-घडीं मदनाची । कळ मजला साहिना ।। प्रियकर० ।। ३ ।।
सख्याविण मज बाई । कोठें करमत नाहीं
विष्णुदास म्हणे, कांहीं । मन कविता गाइना ।। प्रियकर० ।। ४ ।।
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६१ ) नायिकेची लावणी– पांचवी

उठा तुम्हि, सदनिं चला हो । असुरगुरुराज उदयिं पोंचला
म्हणुनि धिर खचला हो । मदनशर हृदयांतरिं खोंचला ।। ध्रु० ।।
दिपाच्या पहा ज्योती हो । हिरकणिवत् शुभ्रवर्णे भासती
फुलांचे रस सुकती हो । जाइ, जुइ, चंपक, बकुल, मालती
प्रभंजन मंदगती हो । सुटुनि शरिरासी थंडि वाजति
सुखाची विश्रांती हो । पहा इतुक्यांत रात्र संपती
घडिं-घडीं कळ येती हो । छळी मज फार रतीचा पती
जाहलें विकळ अती हो । तुमाचि परि कांहिं वळेना मती
करूनी विनती किती हो । शहाणे जन बोलति तसे चालती
विलोकुनि न्याय-निती हो । हळदिपरि काय केशर तोलती
तशी मी नसे युवती हो । बटिक जशि धर्म त्यजुनि चालती
( चाल ) लोटली रात्र, बहु झोंप दाटली नयनीं
महाराज प्रार्थितें, उठा, चला सुखशयनीं
लग्नासि उद्यां मुळ मजला धाडिल वहिनी
मग मजसि आठवित बसाल महिनो-महिनीं
( चाल ) कां बसलां मजवर रुसून–अपराध एकहि नसून
मासि बोला एकदां हंसून–किती पहाल कसोटी
कसून, पुढें येईल अनुभव दिसून

( चाल ) शुभवदन कमललोचना !
सुखसदन सुरस कांचना !
रति मदना ! करि याचना
प्रिय सजण ! न करि वंचना
तुमचि कामिना–पुरवा कामना–वाजे ना विणा
विष्णुकविविना–सभासदजनां
पदाचा रस रुचला हो । सख्या भररंग विडा उचला ॥ १ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १६२ ) नायिकेची लावणी, सहावी

जळोनी बाई । जावो तरुणपण हें ॥ ध्रु० ॥
रतिसुखविरहित वनचंदनवत्
धुपतसे सर्पण हें । जळोनी बाई ॥ १ ॥
मुळिंच स्त्रियांचा जन्म पराधिन
दुःखासि कारण हें । जळोनी बाई ॥ २ ॥
ज्याचा त्याचा धाक शिरावर
अब्रुचें दडपण हें । जळोनी बाई ॥ ३ ॥
विष्णुकवि म्हणे, जसें पाऱ्याविण
व्यर्थचि दर्पण हें । जळोनी बाई ॥ ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १६३ ) नायिकेची लावणी–सातवी

हिरव्या बागेंत बंगला नवा । हिरव्या रंगानें रंगवा
करावा पोषाख आज हिरवा । हिरवा हिरवा ॥ ध्रु० ॥
हिरवे-गार पाचुचे खडे । हिरवे आरशे लावा पुढें
हिरवे पडदे द्या चहुंकडे । हिरवी माडी ॥ १ ॥
हिरवी जमीन करा कांचाची । हिरवी शेज रचा मंचकीं

हिरवी घालिते मी कंचुकी । हिरवी साडी ॥ २ ॥
हिरव्या पानाच्या द्या विड्या । हिरव्या हातामधें बांगड्या
हिरव्या पंख्यांत हिरव्या लडया । हिरवी दांडी ॥ ३ ॥
हिरव्या गाद्या आणि गिरद्या ॥ हिरव्या हातीं खड्याच्या मुद्या
हिरव्या माळा गळां राहूं द्या । हिरवी बंडी ॥ ४ ॥
हिरव्या सिणगारावर दिल । हिरवा शिरिं बांधा मंदिल
हिरवा हातामधें कंदिल । हिरवी हांडी ॥ ५ ॥
हिरवी चौंभवतालुन कनात । हिरवी लावा वरतुन बनात
चला जाऊं सजवुन हिरव्या वनांत । हिरवी गाडी ॥ ६ ॥
हिरवा थाट करा बरवा । हेतु हा हिरव्याचा पुरवा
विष्णुकवि बोले, रंग हिरवा । हिरवा हिरवा ॥ ७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६४ ) नायिकेची लावणी—आठवी

किती सांगुं मला रे झोंप आली । आतां जातें सख्या रंगमहालीं ॥ध्रु०
वरुण दिशेकडे परतले तारे । अपरात्र होउन गेली ॥ १ ॥
सुकले सुगंधित हार पुष्पांचे । चंपक, कुंद, चमेली ॥ २ ॥
शीतळ, सुटला मंद प्रभंजन ! अंगांत हुडहुडी भरली ॥ ३ ॥
निद्रेचा अंमल दाटुनि आला । डोळ्यांत पोंचली लाली ॥ ४ ॥
विष्णुकवि म्हणे, थोडयांत गोडी । पाहिजे समज निघाली ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६५ ) नायिकेची लावणी— नववी

कां धरिला मजवर तुम्ही उगीच अबोला
अपराध काय जाहला, खरें मसि बोला ॥ ध्रु० ॥
बेमान जात पुरुषाची, भलि अपगर्जी
केसानं कापिली मान, हरीची मर्जी !

तुम्हि जन्मोजन्मि फेडाल ऋण हें कर्जी
घडोघडीं जोडितें हात करीतें अर्जी
( चाल ) प्रार्थितां तुम्हां राजसा !
जाहला कोरडा घसा
पाषाण होई ना जसा
अंतरीं ओला । कां धरिला ॥ १ ॥
सर्वस्वि घातली माति माझे संसारीं
तोडली आप्तवर्गाची ममता सारी
वावडी उडे ना जसी बीन आधारीं
तसि झाली गत, मी जाउं कुणाच्या द्वारीं
( चाल ) संकटीं पडलें षण्मास
कुणि न ये अतां कामास
शरिराचें खाउनि मांस
पळाला कोल्हा । कां धरिला ॥ २ ॥
शतमूर्ख स्त्रियांची जात उगी नागवती
जळो, आग लागो, या तरुणपणाची नवती
ही द्वाड रांड धोक्यांत जीव घालवती
बैमानि परंतू अशी मर्शी करूं नव्हती !
( चाल ) मारूनि हातावर हात
परिणामिं साधिला घात
लावुनी गळ्याला तांत
मारिला झोला । कां धरिला ॥ ३ ॥
जशि गाय अडकली फासिं, खाइना चारा
उपकार येवढा करा-मला विष चारा
गवताचा मिळे ना पहा फुकाचा भारा
कापितां न येची चर्म शर्म चांभारा

( चला ) भ्रांतिचा पडदा फाडिला
प्रेमाचा दोर तोडिला
म्हणे विष्णुकवी मोडिला
सुखाचा डोला । कां धरिला ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६६ ) नायकाची लावणी–पहिली

शुक्राची चटक चांदणी मयूरांगणिं पडली
दैवाची प्रबल कृती विचित्र ही घडली ॥ ध्रु० ॥
लावण्यखाणी भुजंगवेणी
सुस्वर सुरसुंदरी सुधारस घडली ॥ शुक्राची० ॥ १ ॥
स्वरूपासी लाजती चंद्र-बृहस्पती
ब्रम्ह्यानें तनुला नवी सुंदरता जडली ॥ शुक्राची० ॥ २ ॥
दृष्टिस न पडे स्वर्प्रिहि रुपडें
प्रारब्धहीन मांदिरीं कनकलता गडली ॥ शुक्राची० ॥ ३ ॥
विष्णुकवि म्हणे, बोलति शहाणे
काढावी परी मग ती बळें वेळ आडली ॥ शुक्राची० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६७ ) नायकाची लावणी–दुसरी

पिवळ्या चांप्याची कवळी । केवळ कळी पिवळी ॥ ध्रु० ॥
पिवळी केशरमिश्रित काया । पिवळी सुवर्णालंकृत छाया
पिवळ्या भुजंगाची जाया । पिवळी केतकीची सुरळी ॥ १ ॥
पिवळी जरिपडद्याची गाडी । पिवळ्या रंगें रंगित माडी
पिवळी भरजरतारी साडी । कंचुकि अंगामधें पिवळी ॥ २ ॥
पिवळें कंकण खणखण वाजे । शिरिं मुदराखडि पिवळी साजे
पिवळ्या पुष्पांचे हार ताजे । सुगंधित शेवंतीहि पिवळी ॥ ३ ॥

विष्णुकवीची पिवळी चौकडी । पिवळी शोभे शालुची घडी
पिवळी दुल्लड, बाळी, बुगडी । गुंफित मौक्तिक माणे पंवळीं ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६८ ) नायकाची लावणी– तिसरी

निरभ्र शुभ्र नक्षत्रतुल्य ही ललना कोणाची
चपळ दृष्टि सुविलोल, लोचनीं उपमा हरिणीची ॥ ध्रु० ॥
पद्मवदन पद्मिनी गौरतनु केतकि वर्णाची
ब्रह्मदेवें निर्मिली वाटतें शशिच्या किरणाची
पर्वकाळ, शिवरात्र, शिवार्चन, वेळ पुराणाची
पुष्पहार गुंफीत, हातांमधिं झारि सुवर्णाची
लावण्याकृति पाहुन उडाली भ्रांती प्राणाची
कधीं पडेल ती पडो मंचकीं रजधुळ चरणांची ॥ १ ॥
गजराज मस्तिमधिं मस्त, धुंद ताशि विषयामधिं डोले
शुंडाकृति भुजदंड सरळ, कुच पहात सदा चाले
संपूर्णालंकृत, गुण सुलक्षण, भाषण मृदु बोले
भ्रमर चुंबितां नलिनी ताशि मृगराजकटी हाले
शृंगार, गोफ, पूतळ्या, गळ्यांमधिं दाटि भूषणांची
शालजोडि जरतारि दुहेरी, साडी पैठणची ॥ २ ॥
क्षणमात्र प्राणवल्लभे ! राहुन उभि बोल शशीरमणे !
कृपा करून ही थोडि विनंती ऐक चतुरशहाणे
नको मारूं पंचशरमार, फार अनिवार तुझें पहाणें
जबर हृदायें बिंबलें, सुचेना पुढें मार्ग क्रमणें
अपमान नको करूं जाण, आण तुज गिरजारमणाची
तृप्ति करी मंजूळ बोलुनी क्षणभर कर्णांची ॥ ३ ॥
प्रसन्नवदन बोलली, जहाली प्राणप्रिया राजी

---

१ शुक्र असाही मूळपाठ आहे.

गर्जताचि घन होतो जसा मनिं आनंद मोरा जी
एकांतिं जाहला संग, उडाला रंग इष्कबाजी
निर्धनास धनकुंभ मिळाला अवचित बिनव्याजीं
विष्णुकवींचे छंद उटी सुगंध चंदनाची
विषायि नरा जशि वसंतिं चर्चित तनू ब्राह्मणाची ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १६९ ) नायकाची लावणी– चवथी

तक् धिलांग धिमिकिट धिगथा धिग धिग था
वाजे मृदंग नाचे नार थैथा ॥ ध्रु० ॥
लावुनि सुर सारिगमपधनी
करि गायन सुस्वर वदनीं
म्हणे, सख्या चला सुखशयनीं
मृदुवचनिं लाजवी वनिता–नवनीता ॥ वाजे० ॥ १ ॥
सुर सारंगि, मुरचंग, वाजे
जरिकांठाची कंचुकि साजे
पायिं छुमछुम घुंगुरू वाजे
जशि रणांत चमके पलिता–चंचलता ॥ वाजे० ॥ २ ॥
नार नागपुराहुन आली
दोन दिवस करमणुक केली
सर शेवट टाकुन गेली
कैकांस लागली चिंता–गुणवंता ॥ वाजे० ॥ ३ ॥
बहु सुंदर नादर मुखडा
सर्पाकृति वेणिचा आंकडा
दिला लावुन सभेमधें छकडा
ही विष्णुकवीची कविता–रंग गातां ॥ वाजे० ॥ ४ ॥

---

## ( १७० ) नायकाची लावणी– पांचवी

( आजि म्या ब्रह्म. चाल बदलून )

गोलि निघुनि हरणी-परांगणीं ॥ ध्रु० ॥
कोमळ तनु सडपातळ निर्मळ, चंचळ नव तरुणी ॥ १ ॥
बहु दिवसांची प्रेमरसाची फोडुनि घटभरणी ॥ २ ॥
वनिं खडे, कंटक, दाट तृणांकुर, रुततिल मृदुचरणीं ॥ ३ ॥
पुनरपि आतां कधिं तरि नयनीं पाहिन प्रियकरणी ॥ ४ ॥
विष्णुकवि म्हणे, वाटे गगन, दिशा, धरणी ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७१ ) नायकाची लावणी– सहावी

लाविलिस मला तूं चटपट, झालं तुझं लंपट, मन परदारा
सुंदरि, तूं प्यालिस वारा ॥ ध्रु० ॥
बहु होउनि गेलिस दंग, कुणासी संग, सांग तरि घडला
प्रिय पात्र कोण आवडला
कोण दिसला सुंदर मोहरा, नादर मोहरा, मृदंगीं झडला
प्रिय पात्र कोण आवडला
अनमोल खुषीचा सौदा, कमानी हौदा, हत्तीवर चढला
प्रिय पात्र कोण आवडला
विषयाची लागल्या गोडी, ऐकेना घोडी, भडकली स्वारा
सुंदरि, तूं प्यालिस वारा ॥ १ ॥
तुमचेंची खवळलें चित्त, गोष्ट अनुचित, काय ही घडली
सावली कुणाची पडली
कां होता घडोघडिं लाल, फुगवितां गाल, चाल बिघडली
सांवली कुणाची पडली
जशि भटास पोळी ऊन, तूप, तशि कोण, रूपवति दिसली
सांवली कुणाची पडली

येइना जसा अंजुळिंत, मिसळला धुळिंत, चंचल पारा
सुंदरि, तूं प्यालिस वारा ॥ २ ॥
विरहानें वेधले प्राण, लागले बाण, राघु साहीना
कुण्या वनांत गुंतली मैना
जडलेली प्रीत कातरली, भेट अंतरली, झाला एक महिना
कुण्या वनांत गुंतली मैना
आला बहर सुखाचा सरत, परंतू परत, मंदिरीं ये ना
कुण्या वनांत गुंतली मैना
सखे, पाहिल्यावांचुन तुला, वाटतें मला, गेलिं, युगें बारा
सुंदरि, तूं प्यालिस वारा ॥ ३ ॥
निर्मळ मुखचंद्र वाटोळा, कपाळीं टिळा, भांग निट सरसा
कंकणासि नलगे आरसा
संशयाचें वाढलें बेट, लांबली भेट, वरसा वरसा
कंकणासि नलगे आरसा
म्हणे विष्णुकवि, शृंगार, पदें भंगार, वाढल्या चुरसा
कंकणासि नलगे आरसा
काय भरून खडयाचें पेंव, मनाचा देव, नाहिं देव्हारा
सुंदरि, तूं प्यालिस वारा ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७२ ) नायकाची लावणी–सातवी

( चालः हरि बहु मनाचा खोटा गे )

परनारी तुझी प्रीत लटकी । लटकी ॥ ध्रु० ॥
लावुनि गेलिस कठिण मनाला । तळमळ घटकोघटकीं ॥ १ ॥
वरवर दिसतिस खडिसाखर जाशी । परि अंतरिं कडु कुटकी ॥ २ ॥
जिकडे गेलिस तिकडेच बसलिस । स्वस्थ वाजवित चुटकी ॥ ३ ॥
विष्णुकवि म्हणे, बोधरसानें । भरेना घागर फुटकी ॥ ४ ॥

---

## ( १७३ ) नायकाची लावणी– आठवी

( चाल : विनंति करूनि चित्त वळवा. )

सुंदर नार तूं परघरची । देतों मी शंभर घे खरची
डोळे नको फिरवुं गरगरची ग, मारूं नको वरच्यावर बरची ॥ ध्रु० ॥
नन्नाची वाचुं नको बाराखडी । चोळीवर काढिन तुझ्या खडी
सोन्याची घडविन मुदराखडी ग । एकदां बोल मसि खडाखडी
आतां नको राहूं गडे दुरदुरची । डोळे नको फिरवुं गरगरची ॥ १ ॥
अंगांत नवतीचं फुराण । वाघाचं चुकलं किरण
गोड लागेना पोथी-पुराण ग, काजीनं सोडिलं कुराण
निशिदिनि लागली हुरहुरची । डोळे नको फिरवुं गरगरची ॥ २ ॥
आतां नको बोलुं चालुं उधार । नगदीचा लागुं दे आधार
तुझ्यावर सारी मदार ग, झालों अम्ही जिवावर उदार
तुझी आण वाहतों खरोखरची । डोळे नको फिरवुं गरगरची ॥ ३ ॥
एक वेळ ऐकूनि घे अरजी । होइल प्यादी मात सह बुरजी
विष्णुकवि म्हणे, मार फरजी ग, पहा इतुक्यावर तुझी मर्जी
रतिरंग भरूं दे भरपुरची । डोळे नको फिरवुं गरगरची ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७४ ) नायकाची लावणी– नववी

( चाल : गंगाधर हर स्मर )

प्रियकरणि, चाल सदनाला । किती हात लावुं वदनाला ॥ ध्रु० ॥
विकसित शितकर शुभ्र प्रफुल्लित चंद्रबिंब गगनाला ॥ प्रि० ॥ १ ॥
रचित सुगंधित मालति, चंपक, बकुल, पुष्प शयनाला ॥ प्रि० ॥ २ ॥
तुजविण घडिभर चैन पडेना झोंप नये नयनाला ॥ प्रि० ॥ ३ ॥
विरहशरानळें तप्त जहालों रक्त आलें अधणाला ॥ प्रि० ॥ ४ ॥
विष्णुकवि म्हणे, पुनरपि शंकर भस्म करो मदनमाला ॥ प्रि० ॥ ५ ॥

## ( १७५ ) नायकाची लावणी– दहावी

परतुन येशिल सांग नारि, तूं किति तरि दिवसानं
तुझ्या जाण्यानं अगदिंच माझं खचलं अवसान ॥ ध्रु० ॥
उद्यां सकाळीं जाइल गाडी तुझि गडगड वाटें
अतांच माझा जिव तळमळतो, बहु अवघड वाटे
वाटे, पडती गगन तुटूनी अंगावर गोटे
काय म्हणावें तुला आमुचें मुळिं दैवचि खोटें
आतां कोणतें तरि पावेना दैवत नवसानं ॥ तुझ्या० ॥ १ ॥
वाट पहात तुझी बसुं आम्ही चातक पक्षावाणी
येइ तूं पर्जन्यापरि धांवत संकटिं निर्वाणीं
पहा जातिल बेरंग होउनी रंगाचीं गाणीं
गोड न लागे अन्न तुझ्याविण लागे कडु पाणी
रंगमहाल हा भंगुन जाइल तुझिया नादानं ॥ तुझ्या० ॥ २ ॥
अम्हि चकोरापरि मोजित राहूं घडिघडि बोटानं
तुझ्या नांवाचा जप करूं रात्रंदिवस ओठानं
अम्हि इकडेची विरहनदीच्या वाहूं लोटानं
तूं तिकडेच कुठं लागुन नादीं बसशिल थाटानं
विष्णुकवि म्हणे, अंतर पडतें कोसाकोसानं ॥ तुझ्या० ॥ ३ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७६ ) नायकाची लावणी– अकरावी

ऐक प्राणप्रियकरणी, प्रीतीची डसली सर्पिणी
पडेना चैन मला पापिणी ॥ ध्रु० ॥
मदनज्वर संचरतो । शरिरांत प्रहर-प्रहरीं
उसळति लहरीवर लहरी
नजर बिनकदर तुझी । जशि तनु पडली आहारीं

तापल्या तेलामधें मोहरी
म्हणुनि तुझें तूंच आतां । विषयाचें विष संहरी
तुझ्यावर कृपा करिल श्रीहरी
मुरड मजकडे तूं आतां । नीज येनाची पापणी ॥ पडेना० ॥ १ ॥
चटक मुखचंद्र तुझा । लावण्य बुंद रेखडा
हुबेहुब पद्मिनिचा मुखडा
नाकीं नथ झुमक्याची । मोत्याचा त्यांत चौकडा
दिसासि तूं रत्नाचा तुकडा
दिसतो नारी सहज तुझा । श्रीमंती डौल रेखडा
सदोदीत लाल रंगला विडा
सरळ निळरंग शिरीं । पींळदार वेणिची फणी ॥ पडेना० ॥ २ ॥
सकल धन-तनु-मन हें । अर्पिलें जशीं तोरणें
सोडली लाज तुझ्याकारणें
होइल हितगुज प्रीतिचें । पुढें भेटीअंतीं बोलणें
आतां परि-रतिमंदिरिं चालणें
उचित तनुदान करी । पुढें बहुत काय लिहिणें
कळावें वर्म चतुर शाहाणे
कनकमाणि विष्णुकवी । म्हणे गुंफुं नको गोफणीं ॥ पडेना० ॥ ३ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७७ ) नायकाची लावणी— बारावी

रक्तवर्ण मुखचंद्र जाहला । एवढा कशाचा कोप आला ॥ ध्रु० ॥
एक वेळ तरि बघ मृगनयने, किंचित मजकडे करुनि नजर
एक वेळ माशि बोल सुंदरी, ठेवुनि चित्तांतरिं कदर
पहा तुझि अमुचि बहु दिवसांची प्रीत नको करूं अधर-निधर
हात जोडुनी घडोघडीं मी पसरीतों तुजपुढें पदर
सोड सोड वल्लभे, अबोला ॥ एवढा कशाचा ॥ १ ॥

सोडुनि गजदंतांचा मंचक कां निजलिस वाट तरुस्थळीं
सोडुनि कां तरि उशी परांची, कोपर धरिला उशातळीं
सुटली वेणी, मळति पैठणी, भरजरिपदराची पिवळी
लोळत पडलिस, सुकुनी गेलिस, जशि चांप्याची कळि कवळी
तुटले हार, शृंगार बिघडला ॥ एवढा कशाचा ॥ २ ॥
पापबुद्धिनें वैर धरूनी गैर बोलला कोण तुला
केला असेल जरि वक्र नेत्र तरि हे गजगामिनी, सांग मला
आर्जव करितां जजर झालों, प्राण संकटामधिं भ्रमला
दुर बसण्यानें, या रुसण्यानें, नारि तुझाही जिव दमला
नको धरूंस या दुराग्रहाला ॥ एवढा कशाचा ॥ ३ ॥
बिनपैशाचे आम्ही नौकर नारि, तुझ्या वचनांत हजर
खोटें तरि कधिं नाहिं बोललों, नाहिं केलि हुकुमासी उजर
ऊठ अतां, बहु विलंब झाला, मेहरबानिची करुनि नजर
विष्णुकवि म्हणे, होउनि गेला दोन प्रहरचा पहा गजर
खूप राग सारंग रंगला ॥ एवढा कशाचा० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७८ ) नायकाची लावणी—तेरावी

राहुनी गेलि मनांत । मनाची ॥ ध्रु० ॥
दाखवितां न ये ती मृगनयनी
उघड करूनि जनांत । मनाची ॥ १ ॥
सुवर्णाची खनी मिळाली
घटकाभर स्वपनांत । मनाची ॥ २ ॥
तुजकडे येतां नये, अब्रूची
लाविलि आड बनात । मनाची ॥ ३ ॥
टाकुनि गेलिस कसि खादिराचा
इंगळ शुष्क तृणांत ! मनाची ॥ ४ ॥

विष्णुकवि म्हणे, विषयसुखाच्या
शिरला चोर धनांत। मनाची ॥ ५ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १७९ ) नायकाची लावणी– चौदावी

अधराचा संग खचित भला नाहीं नाहीं
सहसाहि तो नये परि परिणामीं कामीं
गगनाचा रंग खचित भला नाहीं नाहीं ॥ १ ॥
घडि पद्राची वरि वरि दिसे नामी परी
अंतरिंचा ढंग खचित भला नाहीं नाहीं ॥ २ ॥
हार सुमनांचा विकल्पुनि तरि हातीं
धरणें भुजंग खचित भला नाहीं नाहीं ॥ ३ ॥
समरप्रसंगीं म्हणे विष्णुदास, नारी !
सोपटाचा तंग खचित भला नाहीं नाहीं ॥ ४ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८० ) नायकाची लावणी–पंधरावी

विषयाचा नको नारि, पंथ, जाह्लों संत, सोडिलें पाणी
आतां भजन हरहर सदाशिव शूलपाणी ॥ ध्रु० ॥
अंगासि लाविली राख, जाह्लों पाक, बैसलों ध्यानीं
घेतली हातिं जपमाळ कुंडलें कानीं
जाह्ला चित्तिं अनुताप, जळालें पाप, हरीच्या भजनीं
लाविलें लक्ष साजणी ! अम्ही दिनरजनीं
मी साफ सांगतों तुशीं, बोलुं नको मशीं, पहिल्यावाणी ॥ आतां ॥ १ ॥
हें ब्रह्मज्ञान पुरे करा, अहो प्रियकरा ! आहे मज ठावें
नका जाउं भ्रमामधिं, पडाल, मागें पलटावें
पहिल्यानें कसें दाटून, लाळ घोटून, ओठ चाटावे

माझ्या घरचे वरचेवरी केर लोटावे
फिरूं लागलें मन घरघर, काय वरवर, साधुची वाणी ॥ आतां० ॥२॥
जाहल्या पांढऱ्या मिशा, सुटली आशा, सहज विषयाची
आतां उगीच वासना मनीं काय कामाची
तुझ्यापायीं सरशेवटीं, नारि ! नरवटी, हातिं यायाची
भले भले म्हणाति परनार द्वाड पायाची
तुझ्या तरुणपणाचा झोंक, तुला बहु लोक, लावितील लोणी ॥ आतां ०॥३
तुम्हि ऐकुनि घ्या राजसा, जरा खालिं बसा, माझी विनंती
मी नळराजाची जशी सती दमयंती
तुम्हि रामचंद्र मी सीता, महापतिव्रता, थोर कुलवंती
श्रीहरिच्या गळ्यांतिल माळ जशी वैजयंती
आण वाहुनि सांगा मला, डाग लागला, कोणत्या स्थानीं ॥आतां०॥४
नको सहसा येउं अलिकडे, होइ पलिकडे, या घटकेला
घेतला शिवाचा मंत्र, अम्हीं गुरु केला
लागले बाण अंगास, पहा स्वर्गास, रावण गेला
विषयाच्या भरामधिं पडून कीचक मेला
म्हणे विष्णुकवी बिनधोक, सभेमाधिं लोक, गातिल गाणीं ॥आतां०॥५
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८१ ) उमयतांची लावणी– पहिली

केव्हांची मी द्वारीं उभि राहिलें, कडी काढा
उठा महाराज, द्वार उघडा ॥ ध्रु० ॥
खचित मी होतें अस्पर्श दूर बसलें
उगीच कां मजवर तुम्हि रुसले
दिवस अजि चौथा चौरांगीं स्वच्छ न्हालें
पहा तुम्हि केश अजुन ओले
पितांबर चोळी जरि-कांठीं तंग ल्यालें

फुलांचे हार-तुरे केले
बहार नवतीचा शृंगार करून आलें
मदनशरिं व्याकुळ मी झालें
नव्हे रुसण्याची ही वेळ, राग सोडा ॥ उठा० ॥ १ ॥
नको मसि बोलूं, नको येउं रंगमहालीं
अतां तुझी संगत पुरे झाली
परत जा तिकडे जिकडे पानें पिकलीं
कुणिकडे इकडे वाट चुकली
सुखामधिं रजनी तिन प्रहर निघुन गेली
कुण्या मैत्रासि क्रीडा केली
बहुत आवडला वाणिचा नवा हुरडा ॥ उठा० ॥ २ ॥
तुझ्या वचनाचें हृदयांत शल्य सलतें
असें मसि बोलुं नका भलतें
आधिंच विरहाच्या विवरांत पडुन मरतें
नका जड दगड घालुं वरते
रात्र अंधारी, उभि पावसांत, भिजतें
भयानें काळिज थरथरतें
कठिण मदनाचें सोसेना मला भरतें
तुम्हांवर प्राणनाश करतें
निरंतर मग या मंचकीं स्वस्थ पहुडा ॥ उठा० ॥ ३ ॥
ऐकुनि ऐशा गजगामिनिच्या बोला
मनाचा फिटला अबोला
जसा कमळाच्या पुष्पांचा गेंद फुलला
पहातां त्यासि भ्रमर भुलला
आलिंगुनि काया, मुख चुंबुनि कर धरला

१ वऱ्हातील ज्वारीची उत्तम जात. २ पाठभेद–विहिरींत.

रतिसुखसंगा अनुसरला
चंद्र चंद्राशीं मंचकीं लुब्ध झाला
सुरतरंगासि रंग आला
विष्णुकवि बोले, शृंगारबंद तुकडा ॥ उठा० ॥ ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १८२ ) उभयतांची लावणी– दुसरी

बरसत घन चमकत विज गगनीं । सारी रजनी
सुटत पवन धरणीहि न दिसे मजला । सखे नयनीं ॥ ध्रु० ॥
अंधार सारा–न दिसेचि धारा
तटथट भरले नल, पुर वाहती अवनीं ॥ १ ॥
शालहि भिजली–मशालहि विझली
नवतनु भिजली, नार गेली दचकुन मनीं ॥ २ ॥
म्हणे तुजकारितां–मान न धरितां
श्रमलें भ्रमलें आलें स्नेह स्मरुनी सदनीं ॥ ३ ॥
विष्णुकवि म्हणे–जाणाति शहाणे
मृगनयने, तूं नको स्वयें वदुं हें वदनीं ॥ ४ ॥

## ( १८३ ) उभयतांची लावणी– तिसरी

सख्या ! तुम्हि दिसतां अजि भागला
कुणाच्या सुखसदनीं जागला
कशास्तव एवढा वेळ लागला । खरें मसि बोला ॥ ध्रु० ॥
रात्र पहा तिन प्रहर लोटली
कोणती रांड सवत भेटली
तरावट डोळ्यांची दाटली । चढली लाली ॥ १ ॥
कळा मुखिं आली पांढरी फटक
आढळली पुतळी पिवळी चटक
तिची प्रीत जडली, पडली अटक । सहज रंगमहालीं ॥ २ ॥

कपाळि जडला कुंकुमटिळा
डौल आज दिसला मज बेगळा
बोलतां बद्लुन गेला गळा । कशी गत झाली ॥ ३ ॥
मुखामधें लाल विडा रंगला
अनुक्रम निद्रेचा भंगला
सख्या ! व्हा सावध, कां गुंगलां । खरें मसि बोला ॥ ४ ॥
प्राणसखे ! ऐके मृगलोचनी
नको आणुं संशय भलता मनीं
गुंतलों होतों हरिकीर्तनीं । खरोखरि नाहीं ॥ ४ ॥
कथेमधें एक ऐकिली टीका
हरिवर रुसली होती राधिका
हट तिनें धरला तुजसारखा । कोपली भारी ॥ ५ ॥
जाग्रण घडलें जाहला शीण
कथेचि कथाचे मुळ वळखण
खोटें नसे, तुझ्या गळ्याची आण । साक्ष श्रीहरी ॥ ६ ॥
लगबग येतां इकडे मला
देविचा भक्त मधें भेटला
लाविला कुंकाचा टिकला । खरें मसि बोला ॥ ७ ॥
राहुं द्या, गोष्ट असो ही कशी
करिल ती रांड सर्व चौकशी
आतां तुम्हि बोलुं नका जी मशीं । नका करूं बहाणा ॥८॥
नका हात लावूं व्हा पलिकडे
पहा जा, त्या सवतिचें रुपडें
अम्हि काय बटकी तरि तिजपुढें । पायींच्या वाहाणा ॥९॥
आतां तुम्हि अमुचा संग विसरा
जिवाला केला बहु आसरा
तुम्हांविण कोण आहे दुसरा । जगीं नर शाहणा ॥ १० ॥

नारीला संशय दृढ भासला
लावण्या नाहिंत कम असला
विष्णुकवि बोले, क्या मासला। खरें भासे बोला ॥ ११ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८४ ) उभयतांची लावणी– चौथी

( चाल : एक दिन जानारे भाई. )

भला भला मोरिजान् ! खुषीसे यंवकरना दोस्ती
येथ कुणाची नाहिं कुणावर पहा जबरदस्ती ॥ ध्रु० ॥
क्या कहूं तारिफ तेरे बदनकी, अजब् तऱ्हा प्यारी !
जसि कमळाची कळी टवटवित दिसे भर दुपारीं
तेरे प्रेम के खातर आया मैं तो बेपारी
दे तबकामधिं पान-तमाखू, चिकणी सुपारी
ये रस्तेपर क्या खडे रहना, आवेगी गस्ती ॥ येथ कुणाची० ॥ १ ॥
मत् कर मेरेतरफ दिवाने, तेरि नजर पापी
नाहिं लागला डाग मला पर-घरचा अद्यापी
छोड, जाने दे, अब मेरेपर कर इतनी माफी
नको मला तूं समजूं उष्ट्या गांजाची साफी
जान गई तो नहिं चढनेकी मै तेरे दस्ती ॥ येथ कुणाची० ॥ २ ॥
खुपसुरतनकी चटक लगी है मेरे दो नैना
शेज मंचकावर घटकाभर मला झोंप ये ना
चंद्रवदन मृगनयन बिराजे सुन्ने का गहिना
तुजाविण सजणे, पहा घटकाभर जीव कुठें राहिना ॥
हात पकडकर चल बंगलेपर, मत करना सुस्ती ॥ येथ कुणाची० ॥ ३ ॥
बदनामी से डरकर दुनिया में है राहिवासी
हात जोडुनी तुला सांगतें मी सासुरवासी
बुरी बात ये हो जायेगी मालुम लोकांसी
फुकट माझा विपट येईल घरच्या लोकांसी

जा इसवास्ते अब मत करना बे दंगामस्ती ।। येथ कुणाची०।।४।।
दो दिनकी खुषि करना धरना क्यंव हिम्मत कच्ची
नथ मोत्याची तुजला देइन, साडी भरगच्ची
झूट बात ये नही होनेकी तेरि कसम सच्ची
कसेंही कर पण हो म्हण, हो म्हण, गोष्ट तुझ्या हातची
दिल राजी तो क्या करती है स्टेशनकी वस्ती।।येथ कुणाची०।।५।।
आखर दिलकी दिलकू पटगई दो घडिमें अर्जी
खुप रंगाला रंग मिळाला, झाली खुष मर्जी
नादर तुंदर तदार दानी चली इषकबाजी
धिमिकिद् धिमिकिद् धिलांग धा गत वाजे पखवाजीं
विष्णुकवि कहे, हो गई लेना बहु शक्कर सस्ती।।येथ कुणाची०।।६।।

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८५ ) उभयतांची लावणी– पांचवी

( चाल : विनंति करूनि चित्त वळवा. )

ऐक नारी ! अगोदर एक अर्जी । कळेल तसें कर, जा, तुझी मर्जी।।ध्रु०।।
घडुं नये संगत तुझि घडली । दैवबळें चुकुन गांठ पडली
आतां कशि जातिल तीं पुसलीं । अक्षरें ब्रम्हानें लिहिलीं
अरुणोदयवेळ जवळ आली । सखे ! उठ चाल रंगमहालीं
शेजेचीं सर्व फुलें सुकलीं । रात्र सारी रुसण्यामधिं गेली
चल आधीं उडवुं इष्कबाजी । कळेल० ।। १ ।।
अहो, तुम्हि दूर व्हा मग बोला । नका हात लावूं शरिराला
जळो, आग लागो, लोभला । रात्रंदिन टोंचतो उरिं भाला
जहालें कारण शोकाला । सांगतां न ये हें लोकाला
कशाला घेतलें धन कर्जी ? ।। कळेल० ।। २ ।।
पंचशर हृदयामधिं छळतो । वल्लभे ! जीव व्याकुळ होतो
तुजकडे पाहुन मी झुरतों । जबर कड मदनाचा येतो

सर्व चुका पदरामधिं घेतों । खोटिं नव्हे खरि आण मी वहातों
नको करूं मजवर इतराजी ॥ कळेल० ॥ ३ ॥
नका करूं आर्जव, मन आवरा । बिघडल्या स्त्रीला काय नवरा
दुःखामधिं गेला जन्म सारा । सुखाचा लेश नाहिं शरिरा
प्राण करि शरिरीं येरझारा । जसा उन तेलामधिं झारा
पुरुष गडे, मतलबि अपगर्जी ॥ कळेल० ॥ ४ ॥
उगवला सूर्य पहा दृष्टीं । पार्थितां जिव झाला कष्टी
विषयान्ध नर हा लाळ घोटी । श्वान जसें पत्रावळि चाटी
विष्णुकवि बोले, रित खोटी । अयोग्य ही रहाटी उफराटी
बायको पतिवर नसे राजी ॥ कळेल० ॥ ५ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १८६ ) लावणी

( चाल: झाली ज्याची उपवर दुहिता. )

टाकुन गेला सखा मजलागे । काय मी सांगूं दुःख तुजलागे ॥ ध्रु० ॥
न पडेचि मंदिरीं चैनची नारी । जीवचि भारी गजबजलागे ॥ १ ॥
नेत्रीं क्षणोक्षणीं लोटतें पाणी । निर्मळवाणी उर भिजलागे ॥ २ ॥
तरुण वयाच्या नव्या नवतीचा । कोण्या सवतीच्या गृहीं निजलागे ॥ ३ ॥
हा देह सर्वही त्याच्या ग पायीं । चंदन बाई, जसा झिजलागे ॥ ४ ॥
विष्णुकवि म्हणे शृंगारगाणें । गातील शहाणे छंद गजलागे ॥ ५ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ( १८७ ) लावणी[1]

( चाल: प्रीतिस पात्र कोण तुझ्या. )

शीघ्र सांग सांग प्राणवल्लभे मला ।
किमर्थ या ठिकाणीं कोणी गांजिलें तुला ॥ ध्रु० ॥
न कळे कोठें दचकलीस, पद्मनयने ! सुकलीस ।

---

१ उत्कृष्ट वीररस यांत साधला आहे. जयद्रथविडंबनाचे वेळीं हें भाषण अर्जुनास शोभतें.

सुवर्ण चंपकाचे कळीस । कोण झोंबला ॥ १ ॥
सुजले नेत्र झाले लाल । अश्रूपातें भिजले गाल ।
वैर धरुनि गैर चाल । कोण चालला ॥ २ ॥
वाटे टणकती कपोल । प्राणकमळ गेलें खोल ।
वज्रतुल्य कठीण बोल । कोण बोलला ॥ ३ ॥
ताप पावलीस मोठी । कष्टलीस माझेसाठीं ।
मत्त व्याघ्रिणीचे पाठी । कोण लागला ॥ ४ ॥
जेणें अडाविलें वनांत । त्याचे करीन भग्न दात ।
तप्त सर्पिणीस हात । कोणी घातला ॥ ५ ॥
मधु मुखांत रुतलें बोट । दुःखें होत हृदयस्फोट ।
विष्णुदास बोले थोट । कोण माजला ॥ ६ ॥
ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८८ ) लावणी[1]

( चाल: वसंति बघुनि मेनकेला. )

पराधिन बायकोची जाती ।
माय म्हणे आज हरणी माझी सासऱ्यासी जाती ॥ ध्रु० ॥
आपुली परगृहीं मुल गेली ।
कष्ट करुनि आजवर लहानाची मोठी केली ॥
कळा मुखचंद्राची सुकली ।
मूळ आल्यापासूनि येइना डोळ्याला डुकली ॥
निखाऱ्यांमधें पडला मोती ॥ १ ॥
इची कशी व्हावी व्यवस्था ।
घडोघडी जळजळ करिते पोटांतली आस्था ॥
जळो तो सासरचा रस्ता ।
टाकुनि अवघ्या दिल्या माहेरच्या माहेरीं वस्ता ।

---

१ ही लावणी वाचून कोणते गृहस्थाश्रमी स्त्रीपुरुष सहृदय झाल्यावांचून राहतील ?

तिल्यांचा भाव बहु स्वस्ता ।
सासुसासरा ताप लावतील गृहीं उठतां बसतां ।
जाचुनि इची करतील माती ॥ २ ॥
बासरें[1] तान्हीं हंबरती ।
त्यासी पाजिल्यावांचुनि पाणी आपण पीत नव्हती ॥
इचे गुण गंभीर आठविती ।
हिच्यासाठीं घरीं राघुमैना हरणें मोर झुरती ॥
फुटली द्राक्षासी नवती ।
इचा हात लागतां फुलांचीं झाडें टवटवती ॥
अवघ्या जिवाची विश्रांति ॥ ३ ॥
उद्यां जा सकाळीं लवलाही ।
आतां झाली दुपार तापली धुळ फुटली लाही ॥
ऐकेना हटकर जांवाई ।
वायकाचें हें जिणें पराधीन जळो मेलें बाई ॥
चालली आज मृगनयनाही ।
तिजवांचून जिव हुरहुर जाहला कुठं करमत नाहीं ॥
विष्णुकवि म्हणे चंद्रज्योती ॥ माय० ॥ ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १८९ ) लावणी[3]

पडलें मि तुमच्या गळा ॥ सुंदरा ॥ ध्रु० ॥
मजविषयींचा भाव प्रीतिचा, धरूं नये तुम्ही वेगळा ॥ सुंदरा ॥ १ ॥

---

१ मोहऱ्या. २ हें कडवें आर्यकन्येचें सुंदर उठावदार दर्शन दाखवीत असून कण्वाश्रमांतून शकुंतला सासरीं जाण्याचे वेळचा प्रसंग आहे असें सहज लक्षांत आणून देतें. ३ श्रीकृष्णप्रभु आनंदरूप व राधा हें प्रभूचें प्रेमरूप. या आनंद व प्रेमाची एक वर्षभर ताडातोड केली होती. नंतर प्रथमदर्शनांतील भाव यांत फारच उठावदार आले आहेत. यांतील दृष्टांत फारच सरस आहेत. उच्च प्रेमभाव यांत आला आहे.

बहु दिवसाचा तुमचा प्रेमा,– प्राणाहुनि आगळा ॥ सुंदरा ॥ २ ॥
लहरी समुद्रा अथवा चंद्रा,– सोडुनि जाइना कळा ॥ सुंदरा ॥ ३ ॥
तुटतो परंतु बळकट झटतो,– गुळ पाहुनि मुंगळा ॥ सुंदरा ॥ ४ ॥
विष्णुकवि म्हणे पापड फुटतो,– चिकटतो परि इंगळा ॥ सुंदरा ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १९० ) लावणी[1]

( चाल : प्रीतिस पात्र कोण. )

होतों मी काय रमणी रम्य स्वर्गभूवनीं ।
अधरामृतपान तुझें सतत सेवुनी ॥ ध्रु० ॥
आनंदसिंधुचा तरंग रंग दाटला ।
त्या मंदिरांत इंद्र मला तुच्छ वाटला ॥
वर्षास एक दिवस गणुनि काळ लोटला ।
सरलें पुण्य म्हणुनि पडलों शून्य आवनीं ॥ १ ॥
दैवाची काय सांगुं गति विचित्र ही ।
काढूं न पाहूं देची नारी चित्रही ॥
तुंबुनी अश्रुबिंदु होती मंद नेत्रही ।
तळमळतो जेवी मीन तप्त जीवनीं ॥ २ ॥
मसी बोल बोल एक वेळ प्राणवल्लभे ।
प्रत्यक्ष रूप स्वप्नीं तुझें राहतें उभें ।
आलिंगितांची मृगजळाचि भ्रान्ति दुर्लभे ।
रुदती देव बघुन मजसी शोकदहनीं ॥ ३ ॥
मृदु अंगरंग वदन नयन कच समुहतो ।
त्या तुल्य ध्यावयासी अनुभव मी चाहतों ।
शीर्षाचें पुष्प चंद्र हरण मयुर पाहतों ।
परि भरतीस येत अधिक शोकवाहिनीं ॥ ४ ॥

---

१ या लावणींत स्त्रीदाक्षिण्य आहे. राजा भर्तृहरीनें पद्मिनी स्त्रीबद्दल तिचे पश्चात् केलेल्या विरहाचें वर्णन येथें दिसत आहे.

कां दाविलासी चंद्रवदने, भाव वेगळा ।
कां तोडिलासी पद्मनेत्रे, प्रेम आगळा ।
कां कापिलासी गजेंद्रगमने, सांग तूं गळा ।
विष्णुदास बोले भ्रमतें मन वनोवनीं ॥ ५ ॥

## ( १९१ ) लावणी

( चाल : नरजन्मा मधि )

कृपा असों द्या आतां तुमच्यापासुन उद्यां चाललें ।
मला सासरचें आज मुळ आलें ॥ ध्रु० ॥
मोहबत सोडून तोडून जाणें विषवत मज वाटतें ।
प्रीतिवर मी मातां लोटतें ।
शब्द न उमटे मुखीं बोलतां रडें हृदयीं दाटतें ।
माझें दुःखानें उर फाटतें ॥
हसणें बसणें चालणें बोलणें सारें येथुन खुंटतें ।
आज शेवटचें तुम्हां भेटतें ॥
निर्मळवाणी तुम्हांवर पाणी तीन अंजुळी ओतलें ।
मला सासरचें आज मुळ आलें ॥ १ ॥
आण गळ्याची तुला नको रडुं घे दुखण्याचें मिस ।
रहा नको जाऊं कां भीतीस ॥
चिखल सारा आहे रस्त्यानं वर पडतो पाऊस ।
तुझा जीव होईल कासाविस ॥
अंतर पडुं नये म्हणुन शिवाला आम्ही करितों नवस ।
असा कधीं येइल पुढें दिवस ॥
चुकवून जावें कोठें दैवाचे खोटें आड पडलें ।
मला सासरचें आज मुळ आलें ॥ २ ॥
आज्ञा तुमची मान्य मला परि संकट आलें केवढें ।
हट्ट हा चालेल कसा पतिपुढें ॥

मुळ परतावें वास्तव जेवढे यत्न करीन तेवढे ।
परंतू न चुके जाणें घडे ॥
आठवण असुं द्या माझी आतां तुम्ही प्राणापलिकडे ।
शेवटील भेटा या अलीकडे ॥
राग आणुं नये, आजवर संगतीं बरें वाईट बोललें ।
मला सासरचें आज मुळ आलें ॥ ३ ॥
काय जाणार तूं उद्यां सुंदरी शोक मला देउनी ।
आहे, तुम्हां संशय काय अझूनी ॥
संशय नाहीं दुःखें बोलतों भ्रमीत मन होउनी ।
स्वस्थ रहा नको दाखवुं बोलुनी ॥
स्वस्थचि राहतों परतुन लवकर भेट पुन्हा येऊनी ।
बरें आतां जातें निरोप घेऊनी ॥
विष्णुकवींचें पद सुरसाचें पाहून जन भुलले ।
मला सासरचें आज मुळ आलें ॥ ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ( १९२ ) श्रीविष्णुदास कवींची आरती

जय जय श्रीगुरु पुरुषोत्तमानंद सरस्वति स्वामी हो ।
तद्दर्शनिं सुखि झालों सहकुळ आलों निजसुखधामीं हो ॥ ध्रु० ॥
जयजय ब्रह्मानंदा, चित्सुखकंदा, विधिहरिहरा हो ।
अनंत जन्मोजन्मींचें मम पातक तें परिहरा हो ।
अशी न विनंति करितां जैसें उरिं धरि आइ लेंकरा हो ।
तैसें भवपुरीं बुडतां ताराया मज धरिलें करा हो ।
श्रीगुरुदास म्हणे आज अक्षय झाली मजसी अरामी हो ॥ १ ॥
अंत न लागे कवणा तुझिया स्वरुपाचा सर्वथा हो ।
सहस्राननादि थकले, धरुनि बैसले मौनावस्था हो ।
चारी वाणी मेल्या गेल्या, वेदा न कळे व्यवस्था हो ।
अज्ञानी म्हणुनि मुक्यानें चरणांवरती ठेवुनि माथा हो ।

श्रीगुरुदास म्हणे आज अक्षय झाली मजसी अरामी हो ॥ २ ॥
जय जय त्रिगुणातीता त्रैमूर्ती तूं तरि निर्गुणा हो ।
अनंत ब्रह्मांडांच्या आंत बाहेर तव व्यापकपणा हो ।
अनंतरूपिं नारायण असांसि परंतु न दिससी कुणा हो ।
कृपा तुझी होइल तेव्हां तरीच कळतिल तुझिया खुणा हो ।
श्रीगुरुदास म्हणे आज अक्षय झाली मजसी अरामी हो ॥ ३ ॥
कोटी कोटी फेरे लक्ष चौऱ्यांशीं फिरुनि श्रमलों हो ।
तुझिया कृपाप्रसादें अवचित तरि जन्मा आलों हो ।
पतित मी पापी असतां बिनसेवेनें पावन झालों हो ।
करुणामृत घनधारा प्राशुनि चातक अखंड धालों हो ।
श्रीगुरुदास म्हणे आज अक्षय झाली मजसी अरामी हो ॥ ४ ॥

## ( १९३ ) शेवटची विनवणी

ऋतुशिल जलवृष्टी, तुष्टि-पुष्टी असो दे
सुखमय करि सृष्टी दुःख दृष्टीं नसो दे
हरिहर परमेष्ठी पृष्ठिं रक्षोत मागें
जय जय जय वंदे मातरं-मातरं गे ॥ १ ॥
हरिशिल भय चिंता, संकटें, माउली ! तूं
करिशिल स्वकरांची सर्वदा साउली तूं
म्हणवुन गुण गायी विष्णुस्वामी अभंगे
जय जय जय वंदे मातरं-मातरं गे ॥ २ ॥
शक्ती असो जग-हितास्तव अंगिं बाकी
याबीण कांहिं नलगे मजलागि बाकी
हें विष्णुदास विनवी मृगराज यानी
तूं एक वेळ तरि दर्शन दे भवानी
बोल भवानी की जय ! श्री दत्तमहाराज की जय !

श्रीसदगुरुनाथार्पणमस्तु

ॐ तत्सत्

# पदांची अकारविल्हे सूचि

